मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ३३ वे.

# हा रामाचा अयोध्या!

श्रीयुत चण्डिचरण सेन यांच्या बंगाली कादंबरीवरून

## श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र,

यांनीं लिहिली.

[ प्रथमावृत्ति. ]

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

गिरगांव, मुंबई.

किंमत १-०-०.

सर्व हक्क स्वाधीन.

[ जानेवारी १९०

# अनुक्रमणिका.

# ही रामाची अयोध्या!

## प्रकारण १ लें.

## प्राक्कथन.

* The number, influence and enormous amount of the salaries, pensions and emoluments of the Company's servants, Civil and Military, in the Vizier's service now became an intolerable burden upon the Revenue (of Oude.)

—*Warren Hastings.*

अयोध्या ही ईस्ट इंडिया कंपनीला जणू एक सोन्याची नगरीच सांपडली होती! कंपनीच्या गव्हर्नर जनरलाला वारंवार पैशांची गरज लागावयाची; त्यानें बिनदिक्कत वजिराकडे मागणी करावयाची; आणि कधीं त्याचे आर्जव करून तर कधीं युक्तिप्रयुक्ति लढवून आणि कधीं कधीं तर बिचाऱ्या दुर्बल वजिराला धाकदपटशा दाखवून त्याच्याकडून सारखे पैसे उकळावयाचे, असा बरींच वर्षे अव्याहत क्रम चालला होता. सारांश, अयोध्येच्या खजिन्याला ईस्ट इंडिआ कंपनीची सारखी तुंबडी लागली होती. कंपनीची गरज भागवितां भागवितां आणि तिचें कर्ज फेडतां फेडतां वजिराच्या नाकीं नऊ येत होते; परंतु अखेरपर्यंत कंपनीची गरज ह्मणून केव्हांहि भागली नाहीं, आणि कर्जहि कांहीं केल्या फिटलें नाहीं! बोलून-चालून व्यापारी ईस्ट इंडिया कंपनीचें कर्ज! तें का कधीं फिटावयाचें आहे? वजिरानें कंपनीच्या जेवढया जेवढ्या गरजा भागविण्याचा आणि कर्ज फेडण्याचा प्रयत्न करावा, तेवढया तेवढया तिच्या गरजा अधिकाधिक वाढतच चालल्या; आणि मौजेची गोष्ट ही कीं, कर्जाचीहि पण मारुतीच्या शेपटासारखी एकसारखी वाढच होत गेली; आणि त्या वाढत जाणाऱ्या कर्जाबरोबर बिचाऱ्या निरपराध अयोध्येच्या

---

* नबाबाच्या नोकरीस राहिलेल्या कंपनीच्या दिवाणी आणि लष्करी नोकर-लोकांची संख्या, त्यांचा वगवशीला, महत्त्व, पगाराची, नजरनजराण्याची वगैरे अवाढव्य रकम, ह्या सर्वांचा अयोध्येच्या महसुलावर शक्तीच्या पलीकडे बोजा पडला होता. —वारन हेस्टिंग्ज.

प्रजेचे हालहि भयंकर रीतीनें वाढूं लागले. कारण, कंपनीला पैशांचा पुरवठा करण्याकरितां वजीर रयतेचा भयंकर छळ करित होता. जमिनीचा महसूल त्यानें दुप्पट तिप्पट वाढविला होता; क्षुल्लक अपराधावरून व कधीं कधीं तर अपराधहि नसतां रयतेची मालमत्ता तो जप्त करित होता; नाना प्रकारचे जुलमी कर त्यानें बसविले होते; घरांत खाण्याचे वांधे, अंग झांकण्यास फाटक्या चिंध्याहि नाहींत, अशा स्थितींत पोटाला चिमटा घेऊन, थंडी उन्हाचा ताप सहन करून, एवढेंच नव्हे, तर प्राणाहूनहि प्रिय अशा आपल्या संतानांचाहि विक्रय करून गरीब बिचारी आयोध्येची प्रजा नबाबाच्या खजिन्याची भरती करित होती व इकडे खजिन्यांत कांहीं रकम जमतांच ईस्ट इंडिया कपनी युक्तीप्रयुक्तीने ती नेत होती. वाल्मिकीनें वर्णन केलेल्या रामराज्याचे अयोध्येंत सांप्रत नांवहि उरलें नव्हतें. रामराज्याचे वेळीं अयोध्येत घरोघर ऐकूं येणाऱ्या मंगलध्वनिऐवजीं सांप्रत भयंकर आक्रोशरवांनीं दशदिशा कांपित होत होत्या.

परंतु आमच्या कथानकास आरंभ करण्यापूर्वी अयोध्येच्या अर्वाचीन इतिहासाकडे विहंगमदृष्ट्या अवलोकन करण्याची आवश्यकता आहे. मोंगलीं सत्तेच्या ऱ्हासकाळीं हिंदुस्थानांत दक्षिणेत हैदराबाद आणि उत्तरेस आयोध्या हीं दोन मुसलमानीराज्यें स्थापन झालीं होतीं, ही गोष्ट इतिहासवाचकांस विदितच आहे. मराठ्यांनीं या वेळीं अटकेपर्यंत झेंडे रोवून हिंदुस्थानभर आपला दरारा बसविला होता. उत्तरेकडील अयोध्या आणि दक्षिणेंतील हैदराबाद ह्या दोन बलिष्ठ मुसलमानी राज्यांचा ह्या वेळीं मराठ्यांच्या सत्तेस अडथळा झाला नसता, तर हिंदुस्थानचा इतिहास आज निराळ्याच रीतीनें लिहावा लागता; परतु ह्या दोन्हीं राज्यांनीं मराठ्यांस हिंदुस्थानांत अविछिन्न सार्वभौमत्व भोगूं दिलें नाहीं; उलट त्यांच्या सत्तेस व्यत्यय आणिला व इकडे इंग्रजांस प्रबल होण्यास संधि दिली; एवढेंच नव्हे, तर ह्या दोन राज्यांच्या योगानेंच इंग्रजास महाराष्ट्रसत्तेचा विध्वंस करतां येऊन हिंदुस्थानांत आपलें सार्वभौमत्व स्थापितां आलें, असें म्हटल्यासहि अतिशयोक्ति होणार नाहीं.

अयोध्येची गादी सादतखान नांवाच्या सरदारानें स्थापन केली होती. मुसलमान लोकांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून तेथें आपला पूर्ण अंमल बसविल्यावर इराण, अफगाणिस्थान, तुर्कस्थान वगैरे देशांतून आपलें नशीब अजमावण्यासाठीं जीं कित्येक मुसलमानी घराणीं इकडे आलीं, त्यांतच या सादतखानाचे पूर्वज

होते. सादतखानानें दिल्लीच्या बादशहाची मर्जी संपादून अयोध्येची सुभेदारी मिळविली व पुढें तो प्रांत तो स्वतःच बळकावून बसला. सादतखानाच्या मागून त्याचा जांवई आणि पुतण्या मनसूर अल्ली सफदरजंग हा अयोध्येचा नबाब झाला. हा सफदरजंग पुढें १७४८ साली दिल्लीचा वजीर झाला होता, म्हणून अयोध्येच्या नबाबांस वजीर ही संज्ञा प्राप्त झाली. सफदरजंगामागून सुजा-उद्-दौला हा अयोध्येचा अधिपति झाला आणि या सुजा-उद्-दौलाच्या कारकिर्दीतच इंग्रजांनीं अयोध्येंत प्रवेश केला.

या वेळीं दिल्लीचे बादशहा अगदीं दुर्बळ झाले होते. मराठे आपली सत्ता अधिकाधिक वाढवित होते. गिलच्यांनीहि याच संधीस हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्याचा तडाखा लाविला होता व व्यापारी ईस्ट इंडिया कंपनीहि याच वेळीं आपल्याला कोठें भुसभुशीत जागा आढळते व तींत बीळ पाडतां येऊन त्या बिळांत आपण पटकन् घुसतों, अशी तीक्ष्ण दृष्टि लावून अगदीं टपून बसली होती. सुजा-उद्-दौला घटकेंत मराठ्यांच्या पक्षाला, तर घटकेंत रोहिल्यांकडे, अशी चाळवाचाळव करित होता. याच संधीस इंग्रजांनीं पदच्युत केलेला बंगालचा नबाब कासीम अल्ली हा पाटणा येथें इंग्रजांची कत्तल करून सुजा-उद्-दौला याच्या आश्रयास येऊन राहिला. सुजा-उद्-दौला यानें आपल्याला बंगालप्रांत पुनः मिळवून दिल्यास त्याला स्वारीच्या खर्चासाठीं म्हणून दररोज एक लक्ष रुपये, सारा पाटणा प्रांत आणि ३० लक्ष रुपये रोख देऊं, असें कासीम अल्लीनें बोलणें लाविलें. सुजा-उद्-दौला यानें ती गोष्ट मान्य केली व दिल्लीच्या नामधारी बादशहास आपल्या कटांत ओढून घेतलें. याप्रमाणें दिल्लीचा बादशहा शहाआलम, अयोध्येचा नबाब वजीर सुजा-उद्-दौला आणि बंगालचा पदभ्रष्ट नबाब कासीम अल्ली या तिघांनीं मिळून बक्सार येथें ता. १६ आक्टोबर इ. स. १७६४ रोजीं इंग्रजांशीं लढाई दिली. दुर्दैवानें या युद्धांत वरील त्रिकुटाचा पराजय होऊन इंग्रजांना विजयश्रीनें माळ घातली. पुढे इंग्रजांनीं दिल्लीच्या बादशहाला आपल्या पक्षास मिळवून घेऊन दिल्लीचे सार्वभौम बादशहा ह्या नात्यानें त्याच्याकडून ता. २९ दिसेंबर १७६४ रोजीं एक सनद लिहून घेतली. त्या सनदेंत शहा आलम यानें बंगाल, बहार आणि ओरिसा ह्या तीन प्रांतांचें स्वामित्व इंग्रजांस दिलें. इंग्रजांनीं युक्तीनें या सनदेंत सुजा-उद्-दौला याची सर्व जहागीरहि गोंवून घेतली, व त्याच्या मुलुखापैकीं अलहाबाद आणि कोरा हे दोन जिल्हे बादशहास बक्षिस दिले! याप्रमाणें दिल्लीच्या नामधारी बादशहाचें

राजरोस फर्मान मिळवून इंग्रजांनीं सुजा–उद्–दौला याला आपला मांडलिक बनविला. पुढें सुजा–उद्–दौला व इंग्रज यांच्यामध्यें अनेक लहान लहान चकमकी होऊन शेवटीं कोरा येथें ता. ३ मे १७६५ रोजीं इंग्रजांनीं सुजा-उद्-दौला याचा पराभव करून त्याला तह करण्यास भाग पाडलें; परंतु कंपनीच्या अधिकाऱ्यांचें हें करणें इंग्लंडांतील कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांना पसंत पडलें नाहीं. त्यांनीं हुकूम पाठविला कीं, "अयोध्या हा सुजा–उद्–दौला याचा प्रांत असून तो दिल्लीच्या बादशहाच्या मार्फत आपल्या ताब्यांत घेणे अहितकारक आहे. यासाठीं मराठ्यांच्या स्वाऱ्यांपासून कंपनीच्या मुलुखाचे संरक्षण करण्याकरितां तो प्रांत सुजा–उद्–दौला याच्याच ताब्यांत असूं द्यावा." डायरेक्टर्सच्या या हुकुमाप्रमाणें कंपनीचा मुख्य अधिकारी लॉर्ड क्लाइव्ह ह्यानें १६ आगष्ट १७६५ रोजीं सुजा–उद्–दौला याच्याशीं दोस्तीचा तह केला. ह्या तहांत सुजा–उद्-दौला यानें युरोपिअन लोकांस आपल्या राज्यांतून घालवावें व लढाईच्या खर्चाकरितां इंग्रजांस ५० लक्ष रुपये द्यावे, ह्या मुख्य अटी होत्या.

इकडे रोहिले आणि मराठे यांचें युद्ध चाललें असतां सुजा–उद्–दौला यानें रोहिल्यांस सहाय्य करण्याचें कबूल करून त्यांच्याकडून ४० लक्ष रुपये घेतले. इंग्रजांस बलिष्ठ मराठ्यांपासून आपलें रक्षण करून घेण्यासाठीं सुजा–उद्–दौला याच्यासारखा कोणी तरी दोस्त पाहिजेच होता व ह्मणूनच तो हातीं आला असतांहि त्याला सोडून देऊन आपला दिलजान् दोस्त बनवून इंग्रजांनीं त्याला अगदीं आपल्या तंत्रांत ठेविलें होतें. विश्वासघातकी सुजा-उद्-दौला यानें इंग्रजांशीं अतिशय दोस्ती ठेवून ज्या रोहिल्यांस सहाय्य करण्याचें कबूल केलें होतें त्यांच्याशींच इंग्रजांच्या सहाय्यानें युद्ध केलें. मराठ्यांशीं लढण्यासाठीं रोहिल्यांला सहाय्य करण्याचें सुजा–उद्–दौला यानें पूर्वीं कबूल केले होतें; ह्या गोष्टीचा मराठे सूड उगवितील व आपल्याला दाक्रांत करतील, अशी भीति त्याला वाटत होती; ह्मणून मराठ्यांपासून आपलें रक्षण करण्यासाठीं त्यानें इंग्रजांशीं अतिशयच दोस्ती ठेविली व त्यांच्या सैन्याची मदत घेऊन आपली जय्यत तयारी केली. सुजा–उद्–दौला याच्या मनांत रात्रंदिवस डंवचत असलेली ही मराठ्यांची भीति इंग्रजांच्या चांगलीच पथ्यावर पडली. त्या संधीचा लाभ घेऊन त्यांनीं सुजा–उद्-दौला याला नवीन तह करण्यास भाग पाडलें. मागें बक्सारच्या लढाईचे वेळीं कौशल्य लढवून दिल्लीच्या नामधारी बादशहाकडून बंगाल, बहार व ओरिसा या प्रांतांच्या स्वामित्वाची

सनद पटकावून इंग्रजांनीं हलवायाच्या दुकानावर ब्रह्मार्पण करून सुजा–उद्–दौला याच्या राज्यापैकीं अलाहाबाद आणि कोरा हे दोन जिल्हे शहा अलमास बक्षिस दिले होते, ह्मणून सांगितलेंच आहे; हे दोन जिल्हे पुढें दिल्लीच्या बादशहानें मराठ्यांस दिले होते. परंतु सुजा–उद्–दौला याचे हे दोन जिल्हे मराठ्यांस देण्याचा दिल्लीच्या बादशहाला मुळींच अधिकार पोहोंचत नाहीं, असें ठरवून इंग्रजांनी ५० लक्ष रुपये घेऊन सुजा–उद्–दौला यालाच ते विकत दिले. त्याचप्रमाणें मराठ्यांपासून सुजा–ऊद्–दौला याचें रक्षण करण्यासाठीं ह्मणून इंग्रजांचें जें लष्कर त्याच्या राज्यांत ठेविले होतें, त्याच्या खर्चाची भानगड पडूं नये ह्मणून दरसाल २५ लक्ष रुपये सुजा–उद्–दौला यानें इंग्रजांस रोख द्यावे व त्याच्या दरबारीं इंग्रजांचा वकील रहावा, इत्यादि कलमें या नवीन तहांत ठरलीं व इ. स. १७७३ त इंग्रजांचा रेसिडेंट अयोध्येच्या राज्यांत दाखल झाला

सुजा–उद्–दौला याच्या मागून त्याचा मुलगा असफ–उद्–दौला हा गादीवर बसतांच ईस्ट इंडिया कंपनीनें सुजा–उद्–दौला याच्याशीं केलेला तह रद्द करून नवा तह केला. या तहांत मुख्यत्वेंकरून पुढील कलमें होतीं:—

नबाबानें कंपनीच्या संमतीवांचून युरोपियन लोक नोकरीस ठेवूं नयेत. आपल्या राज्यापैकीं २३ लक्षांचा मुलुख कंपनीस द्यावा. सुजा–उद्–दौलायाच्या करारापैकीं जें कांहीं देणें असेल तें सर्व द्यावें. पूर्वी इंग्रजी सैन्याच्या खर्चासाठीं दरसाल २५ लक्ष रुपये देण्याचें ठरले होते, ती रकम ३१ लक्ष करावी.

हा तह ता. २१ मे १७७५ रोजीं झाला व ह्या तहानेंच कंपनीचें अयोध्येस जें परमनट ब्रिगेड ह्मणून सैन्य होतें तें कायम राहून त्याशिवाय आणखी टेंपररी ब्रिगेड ह्मणून जादा सैन्य अयोध्येवर लादण्यांत आलें.

ह्यानंतर पांचसहा वर्षेपर्यंत ह्मणण्यासारखी निदान बाहेरून तरी कांहीं गडबड झाली नाहीं. परंतु इकडे नबाबाच्या लष्करांत इंग्रज अधिकाऱ्यांचा अतिशय भरणा करून आणि अंतर्व्यवस्थेंतहि मनसोक्त ढवळाढवळ करून इंग्रजांच्या रेसिडेंटानें फारच धुमाकूळ उडवून दिला होता. एतद्देशीय लष्कराला, किंवा राज्यांतील दुसऱ्या कामगारांनां पगार देण्यास अयोध्येच्या खजिन्यांत पैसे राहिले नाहींत. शेवटीं एतद्देशीय सैन्य बेदील होऊन त्यानें बंड केलें. ह्या सगळ्या भानगडींत इंग्रजांच्या वाढत जाणाऱ्या सैन्याचा खर्च आणि कंपनीची बाकी एकसारखी फुगत चालली. निरनिराळ्या कलमांखालीं कंपनी नबाबाकडे आपली दोन कोटी दहा लक्ष

रुपये बाकी मागूं लागली. नबाब भांबावून गेला. स्वतःच्या नोकरांचे पगार देण्यास व राज्यांतील महत्त्वाच्या कामीं खर्च करण्यास त्याच्या खजिन्यांत पैसा राहिला नाहीं. एवढेंच नव्हे, तर राजवाड्यांतील स्त्रियांचीहि भयंकर उपासमार होऊं लागली. अशी खुद्द नबाबाची स्थिति होती; परंतु रेसिडेंटाच्या शिफारशीनें वसुलाच्या कामावर नेमण्यांत आलेले इंग्रज अधिकारी प्रांताचा वसूल राज्याच्या खजिन्यांत न पाठवितां स्वतःच्या खिशांत भरून आपला तळिराम गार करित होते. मार्शमनच्या इतिहासांत कर्नल हॅने ह्याच्या बाबतीत पुढील उल्लेख आहे:—

इ. स. १७७८ ते १७८१ पर्यंत कर्नल हॅने याला बाहरैच, गोंडा व गोरखपुर ह्या प्रांतांच्या जमाबंदीच्या कामावर नेमलें होतें. वरील अल्प मुदतीत ३० लक्ष रुपये गिळंकृत करून स्वारी चालती झाली ! तो पुनः अयोध्येस येणार, ही बातमी ऐकतांच नबाबाचे धाबें दणाणून गेले व ह्या कर्नेलाला कृपा करून पुनः न नेमण्याविषयीं त्यानें वारन हेस्टिंग्जची अत्यंत लीनतेनें प्रार्थना केली. कर्नेल हॅने जर पुनः अयोध्येस आला, तर आपण राज्यांत न राहतां गव्हरनर जनरलाच्या पायाजवळ येऊन राहू, असेहि त्याने निक्षून लिहिले होते! नबाबाच्या ह्या गमतीच्या पत्राचा उतारा मि. आयर्व्हिन यानें आपल्या 'गार्डन ऑफ इंडिया' नामक पुस्तकांत पुढीलप्रमाणें दिला आहे:—

Colonel Hannay is inclined to request your permission to be employed in the affairs of this quarter. If, by any means, any matter of this country dependent on me should be entrusted to the colonel, I swear by the Holy Prophet, that I will not remain here, but will go from hence to you. From your kindness, let no concern dependent on me be entrusted to the Colonel.

—Garden of India, page 90.

सारांश, स्वेच्छाचारी इंग्रजांचा या वेळीं अयोध्येंत भयंकर सुळसुळाट होऊन त्यांनीं वाटेल तसा पैसा उकळला व बिचाऱ्या निरपराध प्रजेला अवर्णनीय हाल भोगावे लागले.

इकडे याच संधीस कंपनीचा खजिना कोरडा ठणठणीत झाला. वारन हेस्टिंग्जची पैशामुळे फारच त्रेधा उडूं लागली. 'लागेल ती व्यवस्था करा. परंतु पाऊण कोट

रुपये तावडतोब द्या, ' असा त्यानें नबाबास हुकूम पाठविला. वारन हेस्तिंग्जनें काशीचा राजा चेतसिंग याचा अतिशय छळ केल्यामुळें इ. स. १७८१ च्या आगष्ट महिन्यांत काशी येथें बंड झालें. अयोध्येच्या बेगमांपाशी रग्गड पैसा आहे ही गोष्ट वारन हेस्तिंग्ज याला ठाऊक होती व त्याला तर पैशाची अत्यंत निकड होती. तेव्हां बिचाऱ्या निरापराध वृद्ध बेगमांचा अर्थाअर्थी कांहींएक संबंध नसतां, बादरायण संबध जुळवून, त्यानें आपला मित्र सर इलाजया इम्पे ह्याच्या सहाय्यानें खोटा पुरावा जमवून, सदहु काशीच्या बंडांत बेगमांचें अंग आहे असें ध्वनित केलें, व फैजाबाद येथें गोमतीच्या काठीं आपल्या आयुष्याचे शेष दिवस कंठित असलेल्या त्या वृद्ध बेगमांवर हल्ला करून, त्यांच्या जहागिरी जप्त करण्याचा घाट घातला. ह्या अन्यायाच्या कृत्यांत वारन हेस्तिंग्ज याला सहाय्य करण्यास हैदरखान बेग नांवाचा एक मुसलमान कुलांगार तयार झाला व या घरभेद्याच्या सहाय्यानेंच शूर इंग्रज सेनापतीनें त्या पडदानशीन वृद्ध अबलांवर व त्यांच्या नोकरचाकरांवर भयंकर अत्याचार करून त्यांच्यापासून ७६ लक्ष रुपये पिळून काढले ! या राजस्त्रियांची वारन हेस्तिंग्जनें केलेली भयंकर विटंबना, मानभंग, अंगावर शहारे आणणारे असे केलेले त्यांचे हालहाल, यांचें वर्णन पार्लमेंटपुढे वाचस्पति बर्क यांनीं करून वारन हेस्तिंग्जची फटफजिती केली, तें इतिहासवाचकांस अविदित नाहीं. वारन हेस्तिंग्जचें हे इंग्रजांच्या नांवास काळीमा लावणारें भयंकर कृत्य हिंदुस्थानच्या इतिहासांत अमर होऊन राहिलें आहे. असो.

आसफ-उद् दौला याच्या पश्चात् वजीर अल्ली नांवाचा त्याचा पुत्र आणि कायदेशीर वारस गादीवर बसला; परंतु इंग्रजांच्या मेहरबानीनें अयोध्येच्या प्रधानपदावर आरूढ झालेला तफझुल हुसेन ह्याच्या मनांत सुजा-उद्-दौला याचा दुसरा मुलगा सादत अल्ली याला गादीवर बसविण्याची स्फूर्ति होऊन त्यानें एकदम गव्हर्नर जनरलाशीं संधान बांधिलें. गव्हर्नर जनरलानेंहि तत्क्षणीं ती विनंति मान्य करून गादीचा खरा वारस वजीर अल्ली याला पदच्युत केलें व सादत अल्लीला गादीवर बसविलें ! या मेहरबानीबद्दल सादत अल्ली व ईस्ट इंडिया कंपनी यांच्यामध्यें पुढील आशयाचा तह ठरला:—

" नबाबांस कोणी शत्रु होईल तर त्याचें पारिपत्य करण्यासाठीं व मुलुखाचें संरक्षण करण्यासाठीं, इंग्रजांना फौज वाढवावी लागली आहे. त्याच्या खर्चाकरितां नबाबांनीं ७६ लक्ष रुपये दरसाल द्यावे. पूर्वीचे कित्येक रुपये बाकी राहिले आहेत

ते नबाबांनीं द्यावे. अयोध्येमध्यें इंग्रजांची फौज दहा हजार राहील, कदाचित् तेरा हजार ठेवावी लागेल. तो जास्ती खर्च नबाबांनीं द्यावा. इंग्रजांस ठाण्यास अयोध्येंत किल्ला नाहीं. नबाबांनीं इंग्रजांचे दोस्तीचा विश्वास धरून अलाहाबाद किल्ला सरंजामसुद्धां व घाट मैदान जमीन भोवतालचीसुद्धां द्यावा. सदर्हु किल्ल्याची डागडुजी करण्यासाठीं आठ लक्ष रुपये द्यावे, व फत्तेगड किल्ला बांधण्यास तीन लक्ष रुपये द्यावे. नबाबाच्या मुलुखाचा अधिक बंदोबस्त व्हावा ह्यासाठीं कदाचित् कानपुर व फत्तेपुर येथील इंग्रजांची फौज त्या ठिकाणांहून दुसऱ्या एखाद्या अधिक उपयोगी जागीं हालवावी लागल्यास त्या बाबतींत येणारा सर्व खर्च नबाबांनीं द्यावा. नबाबांस गादीवर बसविण्यास इंग्रजांनां बहुत श्रम झाले, त्या श्रमांबद्दल बारा लक्ष रुपये नबाबांनीं बक्षिस द्यावे. कंपनी सरकाराचें व नबाबाचें राजकारण एकच आहे; ह्मणून नबाबांचे व परक्या मुलुखांचें राजकारण जाबसाल करावे लागल्यास ते नबाबांनीं इंग्रजांच्या संमतीनें करावे नबाबांचे मुलुखांत इंग्रजी सौदागिरी नीट चालावी. अठरा टोपीवाल्यांपैकीं नबाबांनीं कंपनीच्या मर्जीशिवाय कोणालाहि आपल्या चाकरीवर नेमूं नये, अगर कोणालाहि आपल्या राज्यांत राहूं देऊं नये."

हा तह १७९८ च्या फेब्रुवारीच्या २१ व्या तारखेस झाला होता. वरील तहांतील कलमें बरीच कडक होतीं; परंतु या तहाप्रमाणेंच जरी प्रामाणिकपणानें इंग्रजांनीं नबाबाशीं वर्तन ठेविलें असतें, तर तक्रार करण्यास फारशी जागा राहिली नसती. इ. स. १८०० सालीं अहमदशहा अबदालीचा मुलगा जमानशहा हा उत्तर हिंदुस्थानावर स्वारी करणार, अशी भूमका उठल्यामुळें इंग्रजांचा गव्हर्नर जनरल लॉर्ड वेल्स्ली यानें लखनौ हें उत्तरकडील प्रातांचें नाकें ठरवून तेथील बंदोबस्त करण्यासाठीं अयोध्येंत एकदम आपलें लष्कर पाठविलें व सादत अलीस त्याचें ८० हजार लष्कर कमी करण्यास सांगून त्या ऐवजीं इंग्रजांचे सैन्य ठेवण्यास व अर्थातच त्याचा खर्च अयोध्येच्या खजिन्यांतून देण्यास हुकुम फर्माविला. सादत अलीनें पूर्वीच्या तहाप्रमाणें आपल्यावर आणखी ब्रिटिश सैन्य लादणें अन्यायाचें आहे; शिवाय, एवढया मोठ्या सैन्याचा खर्च आपल्याला झेपावयाचा नाहीं, वगैरे मिनतवारीनें पुष्कळ सांगून पाहिलें; परंतु इंग्रजांच्या केवळ मेहरबानीमुळेंच अयोध्येची गादी प्राप्त झालेल्या नबाबाच्या या विनंतीचा लॉर्ड वेल्स्लीला अर्थातच राग आला. " ज्याला लष्कराचा खर्च देण्यास सामर्थ्य नाहीं, तो राज्य

चालविण्यासहि असमर्थ होय!" असा युक्तिवाद लढवून "एकतर नबाबांनीं इंग्रजांचें ह्मणणें मान्य करावें, अगर गादीवरून दूर व्हावें," असा स्पष्ट आणि अखेरचा खलिता त्याच्याकडे पाठविला! अखेरीस, सत्तेपुढें शहाणपण व्यर्थ होऊन सादत अलीला इंग्रजांशीं नवीन तह करणें भाग पडलें व इंग्रजांस या सैन्याच्या खर्चाकरितां आपल्या राज्यांतील एक कोटि पस्तीस लक्ष महसुलाचा मुलुख ह्मणजे आपलें अर्धें राज्य अर्पण करावें लागलें!

हा तह १० नोव्हेंबर १८०१ रोजीं झाला. ह्या नंतर कंपनीनें. कोणत्याहि प्रकारें नबाबाशीं पैशाची मागणी करावयाची नाहीं, असें उभयतांमध्यें स्पष्ट ठरलें होतें; अशा प्रकारें सादत अलीनें आपल्या मतें कंपनीचें कर्ज एकदाचें कायमचें फेडून टाकिलें. पुढें त्यानें १८१४ पर्यंत मोठ्या दक्षतेनें आणि प्रजेस सुख देऊन राज्य केलें. सादत अलीने मरतेसमयीं खजिन्यांत १४ कोटींवर रुपये शिल्लक ठेविले होते. त्याच्यामागून त्याचा मुलगा गाझी उद्दीन हैदर हा गादीवर आला.

कोणत्या अशुभ मुहुर्तावर नेपाळाशीं इंग्रजांचा संबध घडला कळत नाहीं! लवकरच उभतांमध्यें लढाई जुंपली. नेपाळावर चाल करून जाण्यास गव्हर्नर जनरल लॉर्ड मॉयरा यानें अयोध्येंतून आपलें सैन्य नेले. पुनः अयोध्येवर शनीची वक्रदृष्टि पडली. या स्वारीच्या वेळीं गव्हर्नर जनरलानें सवडींत सवड काढून मुद्दाम गाझी उद्दीनाची भेट घेतली. या भेटीवेळीं उभय राज्यांच्या दोस्तीचें अघळ पघळ प्रदर्शन झालें. गाझी उद्दीन राजकारणांत मोठासा कुशल नव्हता. त्याचप्रमाणें राज्यकारभाराकडे तो विशेषसें लक्ष्यहि पुरवित नसे. सदासर्वदा कुराण पढण्यांत आणि आपल्याला एक बडे मुल्ला ह्मणवून घेण्यांत त्याला मोठा अभिमान वाटे. शिष्टाचाराच्या बाबतींत मुसलमान लोक मोठे दिलदार असतात. गाझी उद्दीनाच्या अंगीं तर हा गुण विशेषच होता. डावपेच, व्यापारी भाषा, हीं त्याला बिचाऱ्याला स्वप्नांतहि ठाऊक नव्हतीं. आपला बडा दोस्त लॉर्ड मॉयरा याच्या पाहुणचाराच्या भरांत '**मेरा माल और जांन आपके वास्ते**!' असें एक वेळ तो सहज बोलून गेला; परंतु लॉर्ड मॉयरा हा व्यापारी कंपनीचा मुख्य अधिकारी असल्यामुळें, नबाबाच्या त्या कर्णमधुर शब्दांनीं त्याचा तहानेलेला जीव गारीगार होऊन तत्क्षणीं त्यानें नबाबाचे ते शब्द—नव्हे करार—आपल्या स्मरणवहींत नोंदून ठेविले व पोलिटिकल डिपार्टमेंटचे सेक्रेटरी मि. स्विन्टन आणि कौन्सिलचे मेंबर मि. अॅडाम यांच्याकडून त्या करारावर साक्षी घालविल्या.

'**मेरा जान और माल**' ह्याचा अर्थ व्यापारी लॉर्ड मॉयरा यानें फक्त एक कोट रुपये केला ! कारण, त्याला सध्यां एक कोटीची अत्यंत जरुरी होती. एक कोट रुपये कर्ज देण्याचा त्यानें नबाबास हुकूम पाठविला ! गव्हर्नर जनरलाचा सेक्रेटरी मि. रिकेट ह्यानें अयोध्येच्या रेसिडेंटाला कळविलें " आपण मोठया दक्षतेनें एक कोट रुपये कर्जाऊ घेण्याचा प्रयत्न केला आहे; परंतु आणखी एक कोट रुपये पाहिजेतच ! नबाबाच्या खजिन्यांत सध्या भरपूर पैसे आहेत. इ. "

On December 10th, 1814, Mr. C. M. Ricketts, Secretary to Government, writes to Lieutenant-Colonel Baillie, Resident at Lucknow, praising his "admirable skill in negotiation" and suggesting its employment in extracting the second crore of rupees which "you mentioned, I think" the Nawab would readily advance "since his treasury was full."

—The Spoliation of Oude, page 64.

आणखी वीस दिवसांनीं रेसिडेंटास दुसरें पत्र आलें कीं " क्षणाचाहि विलंब न करितां आणखी एक कोटीचें कर्ज मिळण्याची व्यवस्था करावी."

On January 2nd, 1815, Mr. Ricketts again writes to Colonel Baillie—"Lose no time in commencing this negotiation with the Nawab for a further supply of cash."

—Ibid.

कर्नल बेलीनें उत्तर पाठवून कळविलें कीं " गाझी उद्दीनानें दोन कोट रुपये देण्याचें माझ्यासमक्ष कबूल केलेलें मला तर मुळींच आठवत नाहीं. बोलूनचालून तो मुसलमान. शिष्टाचाराच्या प्रदर्शनाच्या भरांत सहज बोलून गेला असेल कीं, '**मेरा जान और माल आपके वास्ते!**' आपण लिहितां कीं, गाझी उद्दीनानें माझ्यासमक्ष गव्हर्नर जनरलाला एक कोट रुपये नजर करण्याचें कबूल केलें होतें; परंतु त्याच्या लखाणांत तसा उल्लेख कोठेंहि व्यक्त होत नाहीं. मोठया मुष्किलीनें एक कोटीचें कर्ज द्यावयाला तो तयार झाला होता. एक कोटीहून अधिक देण्याचें त्यानें केव्हांहि कबूल केलें नव्हतें."

Colonel Baillie in reply writes—"I have no recollection of the circumstance of His Excellency's former offer

of a second crore of rupees. It was certainly not made to me nor to His Lordship distinctly in my presence. The Nawab made a general observation, in the true oriental style, that his *Jan mal* (life and property) were at His Lordship's command, and an expression to the same effect was contained in one of the papers of requests which he recalled. You told me, I also remember, and so did Swinton and Adam, that at a conference from which I was absent, His Excellency had offered the first crore as a gift instead of a loan, and as much more as might be wanted : but His Excellency's written offer to me of a crore was expressed in by no means so liberal terms, and as the paper is still by me, I insert a translation of it here:—"You mentioned yesterday the necessity of a supply of cash for the extraordinary charges of the Company. As far as a crore of rupees I shall certainly furnish by way of loan, but beyond that sum is impossible, and a voucher for this sum must be given."

—The Spoliation of Oude, pages 64-65.

रिकेट साहेबानें निक्षून लिहिलें " दोन कोट रुपये पाहिजेतच ! "

On the 18th February, however, Mr. Ricketts is still pressing Colonel Baillie-"as without another crore Government may experience the most serious embarassment."

—The Spoliation of Oude, page, 65.

रेसिडेंटानें यावर लिहिलें " वजीर दोन कोट रुपये देण्यास मुळींच संमत होत नाहीं. पुष्कळ प्रयासा अंतीं आणखी पन्नास लक्ष रुपये देण्यास तो कबूल झाला आहे.

On the 23rd, we find from another letter of Ricketts that the Vizier is offering only an additional fifty lakhs instead of the required crore ; and in his letter he ( the Wizier ) makes us apparently blow hot and cold in one breath, for he says " that we decline the offer of his troops because the urgency of the case did not require it, but

that we solicit pecuniary aid because a necessity has occurred of raising troops ; " in fact, if we understand the Wizier's difficulty, he conceived that we were reverting to the plan of subsidies under another denomination. Never-the-less, the second crore of rupees was obtained before long, whether by allurements or menaces, or by the spontaneous good will of the Wizier, it is in vain now to enquire ; and the Governor General expressed his high approbation of the ability and address with which Colonel Baillie had conducted the negotiation to this result.

—The Spoliation of Oude, page 65.

तथापि गव्हर्नर जनरलानें नबाबास कांहीं सोडलें नाहीं. त्याच्यापासून दोन कोट रुपये कर्ज चोपून घेतलेंच !

हें अयोध्येस भोवलेलें नेपाळचें युद्ध सपवून लॉर्ड मॉयरा स्वदेशीं गेला व त्याच्या जागीं लॉर्ड आमहर्स्ट हा कंपनीचा गव्हर्नर जनरल होऊन आला. लवकरच ब्रह्मदेशाशीं सूतोऽवाच होऊन दोन्हीं राजांचीं सैन्यें रणांगणावर उभीं राहिलीं. वरील युद्ध आटोपल्यावर इ. स. १८२५ सालीं गाझी उद्दीनाला गव्हर्नर जनरल लॉर्ड आमहर्स्ट याच्याकडून पुढील आशयाचे पत्र आले होतें:—

" ब्रह्मदेशाच्या लढाईंत मनस्वी खर्च झाला. त्या आणीबाणीच्या प्रसंगीं आपण एक कोट रुपये कर्जाऊ देण्यास कबूल होऊन आपल्या दोस्तपणास साजेसे वर्तन केल्याबद्दल रेसिडेंटसाहेबांमार्फत मी आपल्याला धन्यवाद देतो. आपल्याकडून होणाऱ्या ह्या सहाय्याबद्दल आह्मी आपले अत्यंत ऋणी आहों. ईस्ट इंडिया कंपनीचे दोस्त राजांमध्यें आपणच सर्वांपेक्षां आपल्या निष्कपट प्रेमाचे प्रत्यंतर दाखविल्यामुळें अर्थात्, त्या सर्वांत श्रेष्ठत्वास प्राप्त झालां आहां. आपल्या आणि आमच्यामधील परस्पर मित्रत्वाची सदा नयनाल्हादक अशी उद्यानभूमि आज फलपुष्पांनीं विशेषच गजबजल्यासारखी व सुशोभित झाली आहे. या अवर्णनीय मैत्रीचा लाभ आणि परिणाम या देशांत त्याचप्रमाणें इंग्लंडांत सर्व ठिकाणीं इंग्रज लोकांच्या हृत्पटलावर सदोदित कोरलेले राहतील. आपला हा स्नेहभाव केव्हांहि आणि कोणीहि इंग्रज गृहस्थ विसरणार नाहीं. रणसंग्रामाच्या वेळीं सिंहाप्रमाणें असलेले, राज्याचा समस्त भार वाहणारे व राज्याचे स्तंभरूप असलेले, असे जे,

साऱ्या पृथ्वीचे सार्वभौम बादशहा आणि अयोध्येचे नवाब गाझी उद्दीन हैदर यांचे अत्यंत राजनिष्ठ सेवक नवाब महमद मुख्त्यार उल्–मुल्क यांनीं आपल्या एकंदर आचरणानें माझें अंतःकरण मोहित केलें आहे. ”

Translation of a Khureeta ( letter to a prince ) from Lord Amherst, Governor—General of India, to His Majesty Gazee-Oodeen-Hyder, King of Oude, dated 14th October 1825.

After the usual compliments—“ It is now some time since I conveyed to Your Majesty, through the Resident, Mr. Mordaunt Ricketts, my cordial thanks for the instance you have given me of your friendship, by advancing, upon certain conditions by way of loan, the sum of one crore of rupees ( £ 1,000,000 sterling ) in case of extreme emergency and need, the Burmese war having cost enormous sums of money.

“ This your offer has proved of essential service, and at the same time manifests your unfeigned attachment, as well as the interest you take in the welfare of the British Government from among all the allies of which, I have further to assure you Your Majesty has carried off the Golden Ball of Superiority.

“ The ever verdant and blooming garden of our mutual friendship has been refreshed and embellished, while the benefits and fruits of our amity, which have existed from the days of yore, are impressed upon the heart of every Fnglishman both here and in Europe, as indelibly as if they had been engraven upon adamant, nor will lapse of time or change of circumstances efface from the memory of the British Nation so irrefragable a proof so irresistible an argument, of the fraternal sentiments of Your Majesty.

" I have also to express my entire approbation of the conduct and fullest satisfaction with the efficiency of your prime minister, illustrious son and sincere friend, Nawab Matmood Dowlah Muktear ool Moolk, lion in the battle-field, commander—in—chief, pillar of the state, for ever devoted to the King of the world, Gazee-ood-Deen Hyder, Padshah of Oude, and who has exerted himself most efficiently in this matter gaining thereby my unqualified commendation."

—The Spoliation of Oude, page 68.

गाझी उद्दीनाच्या मागून त्याचा मुलगा नासिरुद्दीन हैदर हा अयोध्येचा राज्यकर्ता झाला. इंग्रजांच्या वैभवाला, चालीरीतीला हा अगदींच भाळून गेला होता. इतका कीं, मिस वाल्टर्स नामक एका इंग्रज स्त्रीला मुक-अद्-दर औलिया असें नांव देऊन यानें तिचे प्राणिग्रहण केलें होते. दिल्लीच्या बादशाहाजादीशींहि याने लग्न करून तिचें नांव ताजमहाल असें ठेविलें होतें. या सौदर्यलतिकेच्या रूपगुणांत कोणाला आधिक्य द्यावे, हे खरोखर त्यावेळीं लोकांस एक मोठें कोडें पडलें होतें. ताजमहाल बेगमेसारखी रूपसंपन्न आणि सद्गुणी राजस्त्री त्यावेळी साऱ्या हिंदुस्थानांत एकहि नव्हती. हिचा पोषाख आणि रत्नालंकार इतके मूल्यवान आणि प्रेक्षणीय असत कीं, पाहणारा दंगच होई. मिस फॅनी पार्क या आंग्ल युवतीनें एका ठिकाणीं लिहिलें आहे:—

" Her dress was of gold and scarlet brocade, and her hair was literally strewed with pearls, which hung down upon her neck in long single strings, terminating in large pearls, which mixed with and hung as low as her hair, which was curled on each side of head in long ringlets, like the Charles the Second's beauties. On her forehead she wore a small gold circlect, from which depended large pearls interspersed with emeralds. Above this was a paradise plume, from which strings of pearls, were carried over the head. She wore enormous gold earrings, to which strings of pearls and emeralds were attached, each

pearl larger than the one above it. She had a nose-ring also with large round pearls and emeralds; and her necklaces were too numerous to be described. She wore long sleeves open at the elbow, and her dress was a full petticoat with a light body attached, and open only at the throat. She had several persons to bear her train when she walked and her women stood behind her couch to arrange her head—dress, when, in moving, her pearls got entangled in the immense robe of scarlet and gold she had thrown around her. "

वरील वर्णनावरून या विलासी नबाबाच्या वैभवाची वाचकांस थोडीशी कल्पना होईल. या ताजमहाल बेगमेच्या आणि मुक-अद्-दर औलिया या आंग्ल युवतीच्या लावण्यास आणि वैभवास दिपवून टाकण्यासारख्या अफजल महाल, मलिका-झमानी, कुदसिया सुलतान प्रभृति अनेक बेगमा व या बेगमांहूनहि रूपवान् अशा अनेक विलासदासी नासिरुद्दीनाचा रंगमहाल प्रकाशवित होत्या.

या नासिरुद्दीन हैदराच्या कारकिर्दीच्या काळांतच आमच्या कथानकास आरंभ होत असल्यामुळें नासिरुद्दीनाच्या चरित्राविषयीं येथें थोडासा उल्लेख करणें आवश्यक आहे. नासिरुद्दीनाच्या बापाच्या वेळींच अयोध्येंत अंत:कलह, फितुर, स्वार्थपरायणता, भ्रष्टाचार यांचें बीजारोपण झालें होतें. नासिरुद्दीन गादीवर आला त्यावेळीं त्याच्या खजिन्यांत बारा कोट रुपये शिल्लक असून तो ऐन उमेदींत ह्मणजे पंचविशीच्या घरांत होता. तो विलासप्रिय, दिलदार, भोळ्या स्वभावाचा आणि अप्रबुद्ध राजा असल्यामुळें, खुशामती, स्वार्थसाधु, हलकट अशा मंडळींनें त्याला भारून टाकलें. वुल्यम नाईट नामक त्याच्याच पदरच्या एका चित्रकारानें 'Private life of an Indian King' नामक पुस्तकांत या राजविलासी व चैनी नबाबाच्या अनेक विलक्षण गोष्टी वर्णन केल्या आहेत. आपले केंस विंचरण्यासाठीं व स्मश्रु करविण्यासाठीं नासिरुद्दीनानें रेसिडेन्सींत नांणावलेल्या De Russett नांवाच्या एका न्हाव्यास पदरीं बाळगिलें होते ह्या न्हाव्यावर हुजुरांची पुढें इतकी बहाल मर्जी झाली कीं, त्याच्याशिवाय नासिरुद्दीनास क्षणभरहि चैन पडत नसे. 'सर्फराजखान' अशा मोठ्या मानाची पदवी देऊन त्यानें या फिरंगी हजामाला दरबारांत अग्रस्थानीं नेऊन बसविलें. ह्या हजामाशिवाय

नबाबाला चित्रकला आणि गायनकला शिकविण्यास Mauntz, लायब्ररीची व्यवस्था ठेवण्यास Croupley, इंग्रजी रीतिभाती शिकविण्यास Wright, आणि आणखी असेंच कांहीं सटरफटर काम करण्यास Capton Magness, या नांवांचे चार फिरंगी दोस्त असत. ह्या आंग्ल पंचायतनानें नबाबास अगदीं भारून टाकिलें होतें. त्यांत वरील हजामाचें वर्चस्व सर्वांत जास्त होतें. अशा हलकट व नीच मनुष्यांच्या हातांतलें बाहुलें बनून राहिल्यामुळे नबाब सर्वांस अप्रिय होऊन बसला होता. त्यानें प्रत्यक्ष आपल्या शहाजाद्यासहि राजवाड्यांतून काढून लाविलें होतें.

नासिरुद्दीन जरी विलासी, चैनी, आणि उधळ्या स्वभावाचा होता, तरी रयतेचे कल्याणाकडे त्याचें पूर्ण लक्ष्य असे. आपल्या राज्यांतील अंदाधुंदी दूर करण्यासाठीं त्यानें मेहेद अल्ली हकीम नांवाच्या एका राजनिष्ठ आणि प्रजाहितपर सरदाराची मुख्य प्रधानाच्या जागीं नेमणूक केली होती. या स्वामिनिष्ठ निमकहलाल प्रधानानें उत्तम व्यवस्था लावून अयोध्येच्या प्रजेस पुनः आबादानीचे दिवस दाखविले होते. मि शोर नामक एक युरोपियन ह्मणतो "अयोध्येमध्यें सर्वत्र शांतता होती; रयत आबाद होती; परंतु रोशन उद्-दौला नांवाच्या एका नीच, कपटकारस्थानी व De Russett नांवाच्या एका युरोपियन न्हाव्याच्या हातांतील नबाब बाहुलें होऊन बसल्यामुळें आणि रेसिडेंसींतील अधिकाऱ्यांकडून या गोष्टीला आळा पडण्याऐवजीं उलट अधिकाधिक उत्तेजन मिळत गेल्यामुळें मेहद अल्ली याला प्रधानपद सोडणें भाग पडून त्यामुळें अयोध्येची अगदीं दुर्दशा झाली"

नासिरुद्दिनाच्या झनानखान्यांत एकापेक्षां एक लावण्यवती अशा ताजमहालप्रभृती बेगमा असून शिवाय आणखी बऱ्याच विलासदासीहि असत, हें वरती सांगितलेंच आहे. या विलासदासींत धानिया मेहरी आणि दलवी मेहरी ह्या नबाबाच्या अत्यंत प्यार होत्या. या विलासदासींचा थाट आणि वैभव बेगमांपेक्षांहि जास्त असे. एका विनोदी लेखकानें लिहिलें आहे कीं, "ह्या विलासदासी मरण पावल्यावर त्यांना पुरलेल्या कबरेंतील त्यांच्या शवांच्या नाकांमधून परमळत असलेला अत्तरांचा घमघमाट कैक वर्षेंपर्यंत कबरेच्या आसमंतांतील भाग सुगंधानें दरवळून टाकित होता!"

यांतील अतिशयोक्तीचा भाग सोडून दिला तरी वरील वर्णनावरून या विलासी नबाबानें भोगिलेल्या चैनीची आणि राजविलासांची वाचकांस साधारण कल्पना होईल. तथापि नासिरुद्दीन सुखी नव्हता. आणि कसा असेल? भोगविलासांत मग्न झालेल्या

राजाचें रयतेच्या कल्याणाकडे, सुखदु:खाकडे आणि न्यायनीतिकडे लक्ष्य पोहोंचणें असंभवनीय आहे. नासिरुद्दीनाच्या कारकिर्दीत हजारों कुलस्त्रिया भ्रष्ट झाल्या होत्या, हजारों पतिव्रता राजाला शाप देत होत्या, व जिकडेतिकडे सैतानपुरी माजली होती. आपली अब्रु कधीं भ्रष्ट होईल, जीवित, मालमत्ता कधीं नष्ट होईल याची कोणालाच शाश्वती नव्हती. अयोध्येत अमुक एक गोष्ट घडणें म्हणजे अशक्य आहे, असे यावेळीं कोणालाच वाटत नव्हतें. बेब्रदनगरी आणि झोटिंगपादशाहीचें साम्राज्य सर्वत्र पसरलें होतें.

नासिरुद्दिनास ग्रासणाऱ्या नीच ग्रहांत रोशन-उद्-दौला हा प्रमुख होता या काळसर्पानें नासिरुद्दीनाची आई बादशहा बेगम हिनें नासिरुद्दीनाला विषप्रयोग करण्याची गुप्त मसलत केली आहे असे नबाबाच्या मनांत भरविलें व मायलेकरांत भयकर कलहाग्नि पेटवून दिला. आपल्याला विषप्रयोग होईल, याची नासिरुद्दीनाला पुढे पुढे इतकी भीति वाटूं लागली की, त्यानें जेवण्याखाण्याचें साफ वर्ज्य केलें व आपल्या एका अत्यंत विश्वासू हुजऱ्यामार्फत बाजारांतून गुप्तपणें चणेफुटाणे आणवून त्यांच्यावर तो जीव जगवूं लागला. पण असे अन्नपाण्याशिवाय किती दिवस काढणार ? त्याची प्रकृति अगदीं बिघडून गेली, हातापायांस सूज आली व अन्नावर त्याची फारच वांच्छा गेली. निरुपाय होऊन एके दिवशीं त्याने आपल्या अत्यंत प्रीतींतल्या आणि विश्वासू बेगमेच्या महालांतून जेवण तयार करवून आणविलें. तो जेवून उठतो, तोंच त्याला सारखे जुलाब होऊं लागले व तो घायाळ पडला. तृषेने त्याचा जीव फारच व्याकुळ झाला, तेव्हां त्यानें प्यावयासाठीं थोडें पाणी मागितलें. यावेळीं त्याची प्यारी विलासदासी धनिया मेहरी ही त्याच्याजवळ होती. तिनें कालिंगडाचें पाणी त्याला पाजलें. तत्क्षणीं त्याचें प्राणोत्क्रमण झालें. त्या पाण्यांत विष होतें, असा जनापवाद आहे.

खुद्द नबाबाची जेथें ही स्थिति, तेथें बिचाऱ्या दुर्बळ रयतेच्या हालांस काय विचारावें ! त्याची नुस्ती कल्पनाच केली पाहिजे ! पण कल्पना तरी कां, चला आपण अयोध्येंत जाऊन तो प्रकार प्रत्यक्ष पाहूं.

## प्रकरण २ रें.
## योग्याचा आश्रम.

* There are more things in heaven and earth, *Horatio*,
than are dreamt in your philosophy. —*Hamlet*.

पाश्चात्य ज्ञानसूर्याच्या तेजकिरणांनीं हिंदुस्थानांतील लोकांच्या डोळ्यांवरील भ्रमपटल बरेच दूर झालें आहे. लोकांतील अज्ञान, भ्रामक समजुतीं, अंध श्रद्धा देवसेंदिवस कमीकमी होत असून युक्तीला न पटणारी, तर्काशी न टिकणारी आणि प्रत्यक्ष प्रमाणांनीं सिद्ध न होणारी गोष्ट लोक सहसा ग्रहण करीनातसे झाले आहेत. पूर्वीचे ते श्रद्धावान् गुरु, तो श्रद्धायुक्त शिष्यवृंद व श्रद्धा असलेली तीं शास्त्रें सर्व अंतर्धान पावून त्यांच्या जागीं, युक्ति, प्रमाण, तर्क यांचा पूर्ण पगडा बसला आहे, आणि त्यामुळेच सांप्रत आपल्या देशांत नानाविध धर्म, नानाविध आचार, नानाविध मतें प्रचारांत येऊन लोक आपापल्या मताप्रमाणें वर्तन करित आहेत. अशा या पूर्ण मतस्वातंत्र्याच्या कालांत युक्ति प्रमाण, तर्क इत्यादिकांस घटकाभर गुंडाळून ठेवून केवळ श्रद्धेनेंच एखाद्या गोष्टीचें अवलोकन करूं सांगणारा-र पुष्कळांचा विश्वास बसणार नाहीं हें साहजिक आहे; परंतु या मंडळीने थोडासा सूक्ष्म विचार केल्यास आपलें अज्ञान त्यांच्या तत्क्षणीं ध्यानांत येईल. या विशाल विश्वामध्यें प्रत्यहीं अतर्क्य, अलौकिक असे असंख्य प्रकार आपल्या दृष्टीस पडत असतात कीं, त्यांच्यापुढें मानवीज्ञान गर्व, ताठा सारें विरून जाऊन आपण अगदीं मतिमंद बनतों. आपला तर्क चालत नाहीं, युक्ति लगडी पडते, बुद्धि कुंठित होते ! फार लांब कशाला, आपल्या जन्ममृत्यूचीच गोष्ट घेऊं. आपण कोठून येतों व इहलोकचा वास पुरा झाल्यावर कोठें जातों, याची यथार्थ कल्पना कोणाला आहे काय? अंधकारावस्थेतूनच आपण जन्मास येतों व अंधकारावस्थेंतच पुनः विलीन होतों. सारांश, चिरांध अशा अवस्थेंतच आपण या सृष्टींत विचरण करित असतों. ही प्रत्येकाच्या नित्य अनुभवांतील गोष्ट असल्यामुळें युक्ति, प्रमाण, तर्क यांच्या कसोटीस न उतरणारी एखादी गोष्ट एकदम खोटी आहे असें म्हणण्याचें साहस विचारी वाचक सहसा करणार नाहीं. ती अतर्क्य आहे, अथवा तींत बरीच

---

* होरेशियो ! तुझ्या तत्वज्ञानांत ज्याची कल्पनाहि नाहीं, अशा किती तरी गोष्टी या मर्त्य भूमींत आणि स्वर्गांत आढळून येतात. —हॅमलेट

अतिशयोक्ति आहे, अगर आपली मति या बाबतींत कुंठित होत, असे पाहिजे तर तो ह्मणो; परंतु ती साफ कल्पना आहे, असें ह्मणण्याचें धाडस त्याच्यानें करवणार नाहीं, हे निःसंशय आहे.

अत्यंत शीतल अशा हिमतुषारांनीं सदर सर्वकाळ आवृत असलेल्या नगाधिराज हिमालयावर ऋषीमुनींचे अनेक आश्रम आहेत, व आपल्या त्या पवित्र, शांत, एकांत आश्रमांत भगवच्चिंतनांत निमग्न होऊन राहिलेले योगीमुनी वास करित आहेत हें वाचकांना ठाऊकच असेल. या योग्यांपैकीं कित्येक महात्मे योगबलानें आपल्या जडदेहाचा त्याग करून सूक्ष्मदेह धारण करून इच्छामात्रें करून जगतीतलावर सर्वत्र भ्रमण करित असतात, हेंहि पुष्कळांनीं ऐकलें असेल. जगतामध्यें शांति नांदावी, दुःखाचा नाश व्हावा, धर्माची उन्नति व्हावी, लोक सदाचारसंपन्न व्हावे, हाच कायतो याच्या तपश्चरणाचा उद्देश असतो, व त्यांच्या जीविताचें कर्तव्यहि हेंच असतें. असें जरी आहे, तरीहि बाह्यजगतामध्यें कोणतीहि गोष्ट करण्यास ते उत्सुक नसतात. क्षुधिताला अन्नदान करणें, तृषार्ताची तृषा शमविणें, दरिद्र्याला धनवान् करणें, अशा ऐहिक गोष्टींकडे सहसा ते लक्ष्य पुरवित नाहींत. तर अंतर्जगतांतलि दुःखांचा नाश करण्याविषयींच त्यांचा सारा प्रयत्न असतो. ज्यांच्यापासून आधिदैविक, आधिभौतिक सुखदुःखांची उत्पत्ति आहे, अशा अध्यात्मिक आधीव्याधींचा जगांतून समूळ नाश करण्याकडेच यांचें सदासर्वदा लक्ष्य असतें. वासना आणि कामना टाकूनच हे परहिताविषयीं झटत असतात. अर्थात् कोणत्याहि एका देशाचा, जातीचा, अगर शास्त्राचा, यांना अभिमान नसून जगांतील सर्व देश, सर्व जाती, सर्व धर्मशास्त्रें यांनां सारखींच आदरणीय असतात, अशा प्रकारच्या एका महात्म्याच्या दर्शनास आज आमच्या वाचकांस नेण्याचा आमचा मानस आहे.

वाचक हो! ते पहा, त्या समोरच्या रमणीय आश्रमांत दोघे सत्पुरुष कांहीं बोलत बसले आहेत. त्यांच्या एकंदर व्यवहारावरून त्यांतील एकजण गुरु व दुसरा शिष्य असावा, हें आपण ताडलेंच असेल. हिमालयांतील ह्या कडक थंडीच्या निवारणासाठीं शिष्यानें आपलें सर्वांग एका जाड कामळीनें गुरफटून घेतलेलें आहे त्यावरून व त्याची एकंदर चालचर्या पाहून त्याला अद्यापि दिव्यशरीर प्राप्त झाल्याचें दिसत नाहीं. तथापि या भस्मचर्चित गुरूकडे पाहतांच व त्याची ती तेजोमय मूर्ति अवलोकन करतांच त्याला शीतोष्णाची बाधा यत्किंचितहि होत नसावी असें

स्पष्ट दिसत आहे. शिष्य अद्यापि चर्मचक्षूंनीच पहात आहे; परंतु गुरूच्या चर्येवरून त्याला अंतर्दृष्टि प्राप्त झाल्याचा स्पष्ट बोध होत आहे. आतां आपले हें तर्कवितर्क क्षणभर आपल्याशींच ठेवूं व ते काय बोलतात तें ऐकूं.

" बेटा, हृदयांतील दुःख दूर करून, परमेश्वराचे चिंतन कर. सुखदुःख हे मानवीमनाचे विकार होत. ह्या सुखदुःखामुळेच मानव अधोगतीला जातो. ज्याप्रमाणें शीतोष्णादि विकार शरीरावर परिणाम करून त्यापासून देहामध्येंहि नाना रोगांचा उगम करितात, त्याप्रमाणेच हें सुखदुःख मानसिक उपाधी उत्पन्न करित असतें."

" प्रभो, परंतु मनांतील दुःख काहीं केल्या शांत होत नाहीं."

" तर मग तूं स्वदेशीं जा. ह्या अत्यत बिकट अशा योगमार्गाचे तुझ्याने अवलंबन करवणार नाहीं."

गुरूच्या तोंडून हे उद्गार ऐकतांच शिष्याचे डोळे भरून आले. सजल नयनांनीं गुरूच्या मुखाकडे पहात तो स्तब्ध राहिला. गुरुच पुढे म्हणाले " तूं आतां येथें राहूं नको, एकदम आपल्या देशीं जा. तुझ्या हृदयांतील मोहांधकार अद्यापि दूर झालेला दिसत नाहीं."

गुरूची ही निकराची आज्ञा ऐकतांच शिष्याने तत्क्षणी गुरुचरणांवर मस्तक ठेवून म्हटलें " माझा असा म्हणायला मला देश तरी कोठे आहे? आतां स्मशान ह्राच माझा देश आणि ह्या भागीरथीचें पात्र हेंच मला मातेचा अंक होय! मला अनाथ बालकाला मातेच्या अंकावरून दूर कां लोटितां प्रभो?"

गुरु किंचित् हास्य करून म्हणाले 'घोर अशा पातकापासून तुझा उद्धार करण्यासाठीं!"

" तर तग माझी प्रार्थना पूर्ण करा."

" ते सामर्थ्य मला नाहीं."

" आपण मनांत आणाल तर करूं शकाल."

" तूं अगदीं मूर्ख दिसतोस! अरे, योगबलानें प्राप्त झालेली शक्ति का कोणाला दुसऱ्याला देतां येणार आहे? योगबलानेंच ती प्राप्त करून घेतली पाहिजे."

" किती वर्षांनीं ती मला प्राप्त होईल?"

" तें तुझ्या मानसिक स्थितीवर अवलंबून राहील. वेळीं पन्नास वर्षांनींसुद्धां तूं ती प्राप्त करूं शकणार नाहींस!"

" मग माझी वासना सफल होणार नाहींच ? "

" वासना कामना विवर्जित झाल्याशिवाय का कोणी कधीं योगी होऊं शकणार आहे ? "

" माझ्या स्वतःच्या सुखाच्या वासनेचा तर मीं केव्हांच त्याग केलेला आहे. माझी वासना केवळ जगाच्या कल्याणाविषयींच आहे. "

" स्वतःसंबंधीं असो वा जगासंबंधीं असो, ह्या वासनेचा पहिल्यानें त्याग केला पाहिजे. निष्कामबुद्धीनेच तपश्चर्या केली पाहिजे. "

शिष्य चकित मुद्रेने ह्मणाला " प्रभो ! आपलें ह्मणणें माझ्या बरोबर लक्ष्यांत आलें नाहीं. जगताच्या कल्याणाविषयींच्या कामनेचाहि त्याग केला पाहिजे ! आपण तर सर्वदा जगाच्या मंगलाची चिंता करितां ! "

" परमेश्वराची मंगल इच्छा पूर्ण होवो, हीच माझी कामना असते. "

" ही भयंकर झोटिंगपादशाही नाहींशी व्हावी, अशी परमेश्वराची इच्छा नाहीं?"

" प्रभुची इच्छा असल्यास एका क्षणांत तसें होईल !

" तर मग आज अयोध्येंत दिवसाढवळ्या जे घोर अत्याचार होत आहेत, हे परमेश्वराच्या इच्छेनेंच का होत आहेत ? "

" बेटा ! जगताचीं ही सर्व निगूढ तत्वें तुला बरोबर कळावयाचीं नाहींत. जुलूम, अत्याचार, विपत्ति, संकटें हीं सर्व समाजाच्या दुष्कर्मांचीं फळें होत. दुष्कर्मे करतांना मनुष्याला कांहीं वाटत नाहीं, पण त्यांचीं फळें भोगतांना मात्र त्याला ब्रह्मांड आठवते ! त्यांत ईश्वराचा काय अपराध आहे बरें ?

शिष्य कांहीं वेळ विचार करित स्तब्ध राहिला. नंतर ह्मणाला " बरें, मग काय करूं ह्मणतां ? "

" तूं ताबडतोब अयोध्येस जा. "

" अयोध्येस जाऊन मी काय करूं ? तेथील तीं घोर दुष्कर्मं आणखी माझ्यानें पहावणार नाहींत ! "

" पण असा अत्याचार सदैव चालावयाचा नाहीं.

" किती दिवसांनीं दूर होईल ? "

" समाजाच्या नैतिक आणि अध्यात्मिक उन्नतीबरोबर राज्यांत माजलेली ही अंदाधुंदी आणि बंडाळी ऱ्हास पावेल. "

" हा जुलूम दूर होण्याला याशिवाय दुसरा कांहींच का उपाय नाहीं ? "

" नाही ! हा जुलूम केव्हांहि नाहींसा होणार नाहीं. कर्माचीं फळें भोगल्याविना सुटावयाचीं नाहीत ! "

" असें जर आहे, तर मग त्या पापी राज्याचा त्याग करणेंच श्रेयस्कर आहे. म्हणजे आपोआप सर्व दुःखांचा अंत होईल. "

" बेटा ! संसारांतील या भयंकर आधीव्याधींनीं तुला हिताहित ज्ञानशून्य करून टाकिलें आहे तूं कर्तव्यपथाचा अवलंब कर. "

" नरकसमान अशा त्या नबाबाच्या महालांतून मानकुमारीचा उद्धार करण्यास समर्थ झालों नाहीं, तर खात्रीनें मी प्राणत्याग करीन ! "

" बेटा, तूं चिंता करूं नको, मानकुमारीचें रक्षण मी करीन. "

" कसें कराल ?

" त्याची तुला काळजी नको ! सिंहाच्या गुहेंतून, वाघाच्या जबड्यांतून ती निर्भयपणे परत घरीं येईल. "

" प्रभो, आपलें भाषण केव्हांहि मिथ्या होणार नाहीं. तथापि ह्या गोष्टी-विषयीं संशय येतो ! मानकुमारी सुरक्षितपणे घरीं येण्याचा संभव आहे ? त्या इंद्रियासक्त, पातकी नासिरुद्दीन हैदराच्या रंगमहालांत राहून आपल्या पातिव्रत्याचें रक्षण करण्यास ती बिचारी कोमल बालिका समर्थ होईल ? "

गुरु हंसून म्हणाले " रावणाच्या घरीं सीता देवीनें सतीधर्माचे रक्षण केलें नाही काय ? "

" आपण काय म्हणतां तें मला कळत नाहीं. त्या सुकुमार बालिकेला आत्मरक्षण करण्याचें यत्किंचितहि सामर्थ्य नाहीं. "

" बेटा, असा भांबावूं नकोस ! मनुष्यावर आलेले घोर संकट हाच त्याच्या उद्धाराचा सर्वोत्कृष्ट मार्गदर्शक होय. संकट हें अबलांनां सबल करतें, अप्रबुद्धांनां प्रबुद्ध करतें, हतवीर्यांनां पराक्रमी करतें. मी खात्रीनें सांगतों ह्याच बालिकेच्या मुळामुळें दर्शनसिंहाचा कुळक्षय होईल. दुरात्म्या नासिरुद्दीनाचाहि संहार होईल. "

" राजा दर्शनसिंहाच्या बायकामुलांचाहि नाश होईल ? बिचाऱ्या त्याच्या निरपराध स्त्रीपुत्रांचा प्राणनाश व्हावा, अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. परंतु चांडाळ दर्शनसिंहाला मात्र हालहाल होऊन मरण यावें, अशी रात्रंदिवस मी परमेश्वराची प्रार्थना करित आहें. त्या दुष्टाच्या घोर दुष्कर्मांमुळेंच

मानकुमारीची ही दशा झाली आहे. त्या पिशाचामुळेंच हजारों कुलस्त्रियांनी सतीत्वापासून भ्रष्ट व्हावें लागलें आहे."

"प्रयत्न करशील तर मृत्यूच्या मुखांतून त्याच्या स्त्रीपुत्राचें तूं रक्षण करूं शकशील."

"मी कशा रीतीनें समर्थ होईन?"

"योग्य वेळीं तें तुझें तुलाच कळून येईल. आतां तूं विलंब न करितां अयोध्येस जा. काल तुला जें सांगितलें आहे त्याप्रमाणें वर्तन कर."

गुरुचरणांला कृतज्ञबुद्धीनें प्रणाम करून शिष्य सजल नयनांनीं निघून गेला.

## प्रकरण ३ रें.

# जनापवाद.

* This 'greatest of his friends' was a former resident with whom the King had been on very intimate terms; let us call him Mr. Smith; that name will do as well as any other. Mr. Smith had a very captivating wife; and scandal did say that the King was fonder of Mrs. Smith than of her husband.

—*W. Knighton.*

इसवी सन १८२७ सालीं गाझी उद्दीन हैदर मरण पावला व त्याचा दिवट्या पुत्र नासिरुद्दीन हैदर हा अयोध्येचा अधिपति झाला. गाझीउद्दीनाच्या मृत्यूपूर्वीच अयोध्येचा खजिना कोरडा ठणठणीत झाला होता. बापाने सांठविलेले कोडो रुपये ईस्ट इंडिया कंपनीला अर्पण करून गाझी उद्दीनानें इंग्रजांमार्फत 'अयोध्येचे सार्वभौम बादशहा' अशी मोठ्या मानाची पदवी प्राप्त करून घेतली होती गाझीउद्दीनापूर्वीचे नबाबांस 'नबाब वजीर' एवढीच पदवी होती. ते जरी स्वतंत्रपणें राज्यकारभार करित असत, तरीहि दिल्लीच्या सार्वभौम बादशहाचें मांडलिकत्व कायदेशीर रीतीनें त्यांनां सुटलें नव्हतें. ईस्ट इंडिया कंपनीनें गाझीउद्दीनाकडून कोट्यवधि रुपयांचें कर्ज घेतलेलें; अर्थात्, गाझीउद्दीनाचे इंग्रजांवर अगणित उपकार झाले होते. ह्या उपकारांची फेड केल्याविना त्यांनां स्वस्थता न वाटणें साहजिकच होते. इंग्रजांनीं गाझी उद्दीनास लिहिलें कीं "नबाब वजीर ही पदवी धारण करून आपल्या तोंडानें दिल्लीच्या बादशहाचें मांडलिकत्व कबूल करण्यासारखें आहे यासाठीं तुह्मीं बादशहा ही पदवी धारण करावी, ह्मणजे दिल्लीच्या बादशहाचे मांडलिकत्वाचा दोष राहणार नाहीं !" गाझीउद्दीनास ही सल्ला फारच पसंत पडली. इंग्रजांच्या ह्या आभाराबद्दल त्यांनां सर्व कर्ज माफ करून त्यानें मोठ्या समारंभानें आपल्याला

* हा पूर्वीचा रेसिडेंट नबाबाचा अगदीं दिलजान दोस्त असून त्याच्याशीं नासिरुद्दीनाची अत्यंत सलगी होती. आपण त्याला स्मिथ असें कल्पित नांव देऊं, खऱ्या नांवाशींच आपलें काय अडलें आहे? ह्या स्मिथची बायको अत्यंत चित्ताकर्षक होती. आणि नबाब मि० स्मिथपेक्षां मिसेस स्मिथवरच अधिक भाळला होता, असा जनापवाद होता. —डब्ल्यु नाईट.

'अयोध्येचे सार्वभौम बादशहा' म्हणवून घेतलें. परतु बिचारा गाझीउद्दीन हा सार्वभौमत्वाचा मान भोगण्यास फार वर्षे जगला नाहीं बापानें संठवून ठेविलेले एवढे मोठे पैसे गेले ह्याचें त्यानें दुःख घेतलें व त्या द्रव्यशोकांतच बापड्याचा अकालीं अंत झाला.

सादतअल्ली हा अतिशय कडक, कार्यदक्ष आणि मोठा काटकसरी स्वभावाचा होता. पैसा पैसा जमवून त्यानें मरतेवेळीं खजिन्यांत चौदा कोट रुपये सांठविले होते. गाझीउद्दीन बापासारखा कार्यदक्ष जरी नव्हता, तरी विलासी नव्हता; परंतु प्रस्तुतचे अयोध्यापति नासिरुद्दीन हैदर ह्याचा स्वभाव आजाच्या आणि बापाच्या स्वभावाच्या अगदींच विरुद्ध होता. बाळपणापासूनच सर्व व्यसनांचें याला बाळकडू मिळाले होतें. नाना प्रकारांच्या भ्रष्टाचारांचें आगरच अशा नबाबाच्या झनान्यांत तो वाढला होता; लाज, भीति, पापपुण्य याना जलाजली वाहिलेल्या, सुरासक्त, पशूदेहधारी फिरगी आणि एतद्देशीय कुलांगारानीं ज्याला सदासर्वकाळ वेढलेलें, तो आपल्या तारुण्यांत कशा प्रकार वागत असावा, ह्याचा वाचकांनीं आपल्या मनाशींच तर्क करावा. त्याच्या दुश्चरित्राचे वर्णन करून लेखणी विटाळण्याचे पातक आह्मी करित नाहीं.

नासिरुद्दीन हा दुराचारी व हलकट अशा कित्येक फिरंगी लोकांच्या संगतीला लागून अगदीं बहकून गेला आहे असे पाहून त्याच्या बापाने त्याला राजभ्रष्ट करण्याचा प्रयत्न केला होता. एकदा तर त्याला ठार मारून टाकण्यासहि तो प्रवृत्त झाला होता. परंतु गाझीउद्दीनाच्या मुख्य बेगमनें मोठ्या कौशल्यानें यावेळीं नासीरचे प्राण वांचविले. गाझीउद्दीनचा तो हेतु तडीस जाता, तर अयोध्येच्या प्रजेवर एवढा जुलूम झाला नसता; परंतु असें ह्मणणेंहि व्यर्थ आहे. भवितव्यता कोणाला चुकवितां येणार आहे !

गादीवर बसतो न बसतो तोंच ह्या दिवट्या बादशहाने खजिन्यांतल्या दोन कोट रुपयांचा फडशा उडविला. अर्थात्, खजिन्यांत जी कांहीं थोडीबहुत शिल्लक होती नव्हती ती सर्व फस्त झाली. एवढ्या अल्प अवधींत दोन कोट रुपये कशा प्रकारें खर्चण्यांत आले, तें कोणाला समजलें नाहीं. त्या वेळच्या लखनौच्या रेसिडेंटच्या बायकोला हे रुपये अर्पण करण्यांत आले, असाच लोकांचा सर्वसाधारण समज आहे.

उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानांच्या काय, हिंदूच्या काय, स्त्रिया पडदानशनि असतात. मोठ्या घराण्यांतील स्त्रियांचें नखाग्रहि कोणाच्या दृष्टीस पडावयाचे नाहीं, असा तिकडे सर्वसाधारण रिवाजच आहे. मुसलमानी राजांच्या अमदानींत तर हे पडद्याचें बंड विशेषच होतें. इंग्रज लोकांचे आचारविचार, त्यांच्या समाजाच्या चालरीति, आपल्या लोकांच्या आचारांविचारांहून कितीतरी भिन्न आहेत. आपल्या महाराष्ट्रांत ब्राह्मणादि उच्च वर्गांतील स्त्रियांस पडदा नाहीं खरा, तथापि स्त्रियांविषयींची मर्यादा आमच्यांत कमी नाहीं. बोलणेचालणें दूर राहो, परपुरुषाच्या वाऱ्यासहि आमच्या स्त्रिया कधीं उभ्या रहावयाच्या नाहींत ! जेथें पडदा नाहीं, तेथें ही स्थिति, मग जेथें अद्यापिहि पडद्याचा कडक रिवाज आहे, आणि मुसलमानी राजांच्या कारकिर्दींत अर्थातच तो आजच्याहूनहि कितीतरी कडक होता, त्यावेळीं मुसलमान स्त्रियांची मर्यादा किती असेल, याची सहज कल्पना होण्याजोगी आहे. परतु इंग्रजांच्या स्त्रियांची स्थिति त्या वेळींहि आजच्यासारखीच स्वतंत्र होती. परपुरुषांबरोबर बोलण्याचालण्यास, त्यांच्याबरोबर हिंडण्याफिरण्यास, एवढेंच नव्हे, तर परपुरुषांबरोबर एकांतांत बसून गप्पागोष्टी करण्यास त्यांना आजहि पूर्ण स्वातंत्र्य आहे व त्या वेळींहि होतें. अशा प्रकारचे व्यवहार त्यांच्या समाजांत सर्वसाधारण असल्यामुळें या गोष्टीचें त्यांच्या स्त्रियांना काय अथवा पुरुषांना काय कांहींच महत्व वाटत नसते; परंतु आपल्या देशांतील लोकांस ही गोष्ट अद्यापिहि सहन होऊं लागलेली नाहीं. कोणी तरुण स्त्री कोणा पुरुषाशीं बोललीचालली, अगर त्याच्याबरोबर फिरावयास गेली, कीं तो प्रकार आह्मांला अगदीं चमत्कारिक वाटतो व तत्क्षणीं नानाप्रकारच्या कंड्या पिकूं लागतात. आमच्या लोकांचा हा स्वभावच बनून गेला आहे. युरोपियन लोकांएवढे पवित्र आमचे डोळे अद्यापि झाले नाहींत ह्मणा पाहिजे तर, परतु त्या देशाचाराबद्दल आह्मांला दोष लावणें रास्त होणार नाहीं. आमच्या लोकांस ही गोष्ट अगदीं कशीशीच वाटत असते.

लखनौच्या त्या वेळच्या रेसिडेंटाची स्त्री अत्यंत मधुरभाषिणी, बुद्धिमान् आणि लावण्यवति होती. शिवाय, आजकालच्या युरोपियन स्त्रियांप्रमाणें ती एतद्देशीयांचा तिरस्कार करित नसे; अथवा आजच्यासारखी तिरस्कार करण्याजोगी अगर तिरस्कार केल्यास तो पचुन जाण्याजोगी त्या वेळची स्थिति नव्हती, असेंहि ह्मणतां येईल. तें कांहीं असो, एतद्देशीयांचा तिरस्कार न करितां ती सर्वांशीं

आदरानें वागत असे. त्यांतहि मोठमोठे अमीर उमराव, सरदार दरखदार यांच्याशी तर ती फारच आदरसंमान दर्शवित असे. नबाबासारख्यांशी अर्थातच तिचें वर्तन फारच अदबीचें आणि प्रेमाचें असे. सांगावयाची गोष्ट एवढीच कीं, ती एतद्देशीय लोकांबरोबर मोकळया मनानें बोलत असे आणि तिचें मधुर भाषण श्रवण करावयास लोकहि उत्सुक असत. तिच्या ह्या प्रेमळ स्वभावामुळें नासिरुद्दीनाला या आंग्ल सुंदरीचा फार कळा लागला होता. तो वरचेवर तिच्या भेटीस जाई आणि तीहि मधून मधून नासिरुद्दीनास भेटत असे.

ही पतिव्रता इंग्रज स्त्री नासिरुद्दीनाला वरचेवर एकांतांत भेटत असल्यामुळे लखनौ येथील हिंदु काय, मुसलमान काय, आपसांत नाना प्रकारचे तर्क वितर्क करूं लागले. विशेष स्नेह आणि आत्मीयता प्रदर्शित करतांना इंग्रज स्त्रिया नवऱ्याखेरीज इतर पुरुषाचेंसुद्धां चुंबन घेतात आणि त्यांनांहि आपलें चुंबन घेऊं देतात, हा त्यांच्यांत एक रिवाजच आहे. त्याप्रमाणे रेसिडेंटच्या पत्नीनें आपल्या निष्कपट स्नेहाचें निदर्शक ह्मणून भोळ्या भावानें नासिरुद्दीनाचें कधीं चुंबन घेतलें असेल, अगर त्याला आपले चुंबन घेऊं दिलें असेल; परंतु अयोध्येच्या लोकांस एवढीच गोष्ट पुरे झाली. त्यांनी तिच्यावर वाल्मिकीप्रमाणें मोठें थोरलें रामायण रचिलें! मुखचुंबन झाले तेव्हां अर्धा निका लागला, असेंच ते ह्मणू लागले. इंग्रजी आचारविचाराप्रमाणे पहातां मुखचुंबनाचें विशेषसें महत्व नाहीं, हें त्या बेव्या गांवढळांना काय ठाऊक? लखनौ येथें कंडी उठली कीं, बादशहानें रेसिडेंटास दोन कोटी रुपये दिले. रेसिडेंट साहेबानें आपली बायको नबाबास विकत दिली आहे साहेब लवकरच विलायतेस जाणार आहेत व दुसरी बायको करणार आहेत. ही कंडी पहिल्यानें नबाबाच्या महालांतील हलक्या नोकरांत उठली व त्यांनींच ती गांवभर केली. सुमारें एक महिनापर्यंत आहम्मक उल्ला, बक्सू रहीम, आजिम अली, नियामत खां, आणि नबाबाचा बबर्ची रोशन अली हे बाजारांत "देखो मिर्जा, यह बात किसीकू कहना मत!" असें ह्मणून भेटेल त्या प्रत्येकाला गांठून ही सारी गोष्ट त्याच्या कानांत सांगत होते व ही बऱ्या घरची गोष्ट कोणापाशींहि न बोलण्याविषयीं प्रत्येकाला तीन तीनदा अगदीं निक्षून बजावित होते. हां हां ह्मणतां ती गुप्त बातमी ज्याच्या त्याच्या तोंडीं झाली. त्यावेळीं आजच्यासारखी वर्तमानपत्रें नव्हतीं; आजच्या वर्तमान पत्रांत तारायंत्राच्या द्वारें अगदीं ताज्या बातम्या प्रसिद्ध होऊन क्षणार्धांत

त्या हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत पसरण्याचें साधन अत्यंत सुलभ झालें आहे तसें साधन मुळींच नव्हतें; तथापि त्या वेळच्या गपाटा गॅझेटने ही वर्तमानपत्रांची आणि तारायंत्राची उणीव लोकांनां मुळींच भासूं दिली नव्हती. एवढेंच नव्हे, तर हें गपाटा गॅझेटचें काम इतक्या उत्तम प्रकारें आणि शीघ्रगतीनें चालत असे कीं, त्यापुढं आजचीं वर्तमानपत्रे आणि तारायंत्रें रद्द होत, असें झटल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं !

लखनौ येथील मुख्य मौलवी मीर केरामत अल्ली खां एक दिवस मौलवी हुसेन अल्लीखांबरोबर, अलीकडे ज्याच्या त्याच्या तोंडीं झालेल्या अयोध्येच्या बादशहाच्या त्या 'निक्या'बद्दल कुराणांतील बरेच शास्त्राधार पाहत बसला होता. कुराणांतील बरेच आधार काढून केरामत अल्ली ह्मणाला 'हा निका लागण्यापूर्वी मेमने कलमा झटला पाहिजे; मुसलमानीधर्माची दीक्षा घेतली पाहिजे. कलमा म्हटल्याशिवाय आणि मुसलमानीधर्माचा स्वीकार केल्याशिवाय काफरांशीं मुसलकानाचा निका लागूं शकणार नाहीं !"

यावर हुसेन अल्ली म्हणतो "कलम म्हटला कीं पडदा त्याच्याबरोबर आलाच ! पण ही विलायती मेम पडद्यांत का रहाणार आहे ?"

हुसेन अल्लीचे हें भाषण ऐकतांच मौलवी साहेब ही ही करित म्हणाले "शोबान अल्ला ! बेगम झाल्यावर बेपडदा कां रहातां येईल ?"

एके दिवशीं बादशहाचा मुख्य खानसामा रोशन अल्ली बाजारांत पीर महमद खांच्या दुकानांत हुक्का पीत बसला होता हां हां म्हणतां पांचपन्नासजणांनीं त्याला येऊन घेरलें व सर्वजण उत्सुकतेनें त्याच्यापासून कांहींतरी नवी बातमी कळेल या उमेदीनें त्याची खुशामत करूं लागले. एकाने त्याला नम्रतेनें विचारलें "मिर्जा, बड्या साहेबांच्या मेम साहेबांबरोबर बादशहांचा निका केव्हां लागणार?"

इतक्यांत दुसराच एकजण म्हणाला "तुला नाहीं का ठाऊक ? निका ह्या महिन्यांत लागण्याचें नक्की ठरलें आहे !"

यावर मौलाबक्ष ह्मणतो "होय, ह्या महिन्यांत निका लागावयाचा आहे खरा, परंतु दहा कोट रुपयांची जहागीर दिल्याशिवाय मेमसाहेब नबाबांशीं निका लावणार नाहीं. बोलूनचालून विलायती मेम, तें कांहीं लहानसान प्रकरण नव्हे !"

रोशन अल्ली केव्हांपासून तरी या निक्यासंबंधीं कांहीं तरी नवीन बातमी (गप्प) सांगून लोकांना प्रसन्न करण्यास उत्सुक झाला होता. परंतु मौलाबक्ष,

ादर मियां, समजानखान, मिरजां बेग प्रभृति एकामागून एकेक वक्ते आपापल्या वीन नवीन बातम्या सांगूं लागून त्यांनीं त्या बापड्यास आतांपर्यंत तोंड उघडण्यास ावकाशच मिळूं दिला नाहीं. तेव्हां संतापून रोशन अल्ली मिरजां बेगच्या अंगावर ोरडून मध्येंच ह्मणाला " मिर्जा चूप रहो ! ये सब बडे घरकी बातां हय. ह्मारे इसके साथ क्या निसबत हय ? "

रोशन अल्लीचे दरडावणींचें भाषण ऐकून वृद्ध हुसेन खां ह्मणाला " मिर्जो, ा लखनौ शहरांत नबाव आसफ–उद्–दौला याच्या वेळेपासून मी व्यापारउदीम रित आहें. या धंद्यांतच माझी दाढी सफेद झाली आहे. एवढ्या अवकाशांत ां पुष्कळ पाहिलें आहे आणि पुष्कळ ऐकिलें आहे, शोबान अल्ला! त्या बंद्यानें यांतील एक शब्दहि उच्चारला नाहीं ! "

हुसेन खांचें हे पुराण बरेंच लांबलें असतें, परतु इतक्यांत तेथें फाटकी पगडी, ुटका अंगरखा आणि मळका पायजमा पेहेरलेला मुलारामसिंग नांवाचा नबाबाच्या महालांतील एक शिपाई येऊन दाखल झाला. त्याला पहातांच गर्दीतून एकजण मोठ्यानें ओरडला "आइये जनाब ! कुछ मिजाज तो अच्छी है ? "

दुसरा एकजण म्हणाला "स्वारीचां अवतार पहा ! मळका पायजमा, जुना अंगरखा, फाटकी पगडी—"

मुलारामसिंग कष्टी मुद्रेनें म्हणाला " भाई ! दो बरस हुवा, एक पैसाभी तलब नही मिला. यह नौकरी बी छोड देना होगा नबाब बडे साबकी मेमको दररोज लाख्खो रुपिया देते हय, लेकिन नौकरलोगको तलब नहीं मिलता ! "

यावर एकजण म्हणाला " अजून तीन वर्षे नोकरलोकांना पगार मिळणार नाहीं. नबाब ज्या बड्या साहेबांच्या मडमेशीं निका लावणार आहेत; तिला दहा कोट रुपये दिले पाहिजेत. "

दुसरा म्हणाला ' दहा कोट रुपये ! अ-ब-ब-ब-ब ! एक लाख रुपये खर्चि- ल्यास अशा पंचवीस मेम पायां पडत येतील ! जख्खड थेरडी मेम अन् तिला दहा कोट रुपये ? "

तिसरा म्हणाला " भाई, तूं गोरागोमटा आहेस, तेव्हां कधीहि दिल्लीवाली मेम तुला माळ घालील ! तुझा सुंदर चेहरा पाहूनच कितीतरी मेम तुझ्यावर आसक्त होतील ?

चौथा म्हणाला "केवळ गोऱ्या कातडीला विलायती मेम भाळन नसते बरें ! तिला पैसा लागतो पुष्कळसा पैसा !"

पांचवा म्हणाला "मोठे तेवढे सारे खोटे म्हणतात तें उगाच नव्हे ! ह्या नबाब, अमीर उमरावादि लोकांस कांहींच का कळत नाही ? ह्या जख्खड थेरडीवर नबाब साहेब एवढे कशाला भाळले आहेत अल्ला जाणे !"

यार महमदाच्या दुकानांत हे गपाटागँझेटचें काम मोठ्या झपाट्यानें चाललें आहे, इतक्यांत कांहीं अंतरावरील एका दुकानासमोर एकच गडबड उडून गेली. यार महंमदाच्या दुकानात जमलेली गर्दी क्षणार्धांत मोडली. सारेजण तिकडेच धावले. जाऊन पाहतात, तों एक वृद्ध स्त्री एका हत्तीच्या माहुताला शिव्यांची लाखोली वहात आहे, आसपासचे लोकहि त्या स्त्रीचा पक्ष घेऊन माहुतावर तुटून पडले आहेत व एकच हलकल्लोळ माजला आहे. माहुत म्हणाला "बाई, सतत तीन दिवस हत्तीला कांहींएक खायला मिळालें नाहीं. रस्त्यांत फळांची टोपली पहातांच भुकेनें व्याकूळ झालेल्या हत्तीनें फळें खाल्लीं, त्याला मी काय करूं ?"

म्हातारी म्हणाली "मेल्या, तुझं जळलं लक्षण ! तूंच मेल्या हत्तीकडून माझीं फळं खाववलींस अन् माझ्या पोराबाळांचं अन्न नाहीसं केलंस, तुझं निसतान होईल मेल्या !"

आणि ती स्त्री एवढी कातावून गेली होती, ती उगीच नव्हे. त्या बिचारीच्या कुटुंबाची सारी पोटगी त्या मस्त माहुतानें हत्तीकडून बुध्या नष्ट करविली होती. जाणूनबुजूनच हत्तीकडून त्यानें तीं फळें खावविलीं होतीं; परंतु या त्याच्या कृतीबद्दल त्याला तरी दोष कां द्यावा ? अलीकडे वर्ष दीड वर्षांत हत्तीखान्याच्या खर्चाचा पैसा नियामितपणें असा कधींहि मिळत नव्हता. तेव्हां दुसरा कांहीं मार्गच नसल्यामुळें एकेक माहुत दोनतीन दिवसांच्या अंतरानें आपापल्या हत्तीला बाहेर फिरवून अशा रीतीनें त्याच्या खाण्याची व्यवस्था करित होता.

याप्रमाणें लखनौच्या बाजारांत दररोज मारामारी, तकरारी, आणि दंगामस्ती चालली होती. आणि असें होण्याचें कारण बड्यासाहेबांची मेमच होय, असें मानून सारेजण तिची बिचारीची एकसारखी निंदा करित होते. लोकांच्या जिभेला हाड नसतें म्हणतात तें खोटें नव्हे, लखनौची हवालदील प्रजा, रेसिडेंटच्या मडमेसंबंधीं काय बोलत होती आणि काय नाहीं, त्याचें वर्णन करवत नाही ! ही सटवीच नबाबाचा खजिना लुटित आहे; ह्या सटवीनें मोहनी घालून नबाबास वेडा केलें

आहे; इच्यामुळेंच राज्यांतील नोकरचाकरांस पगार मिळत नाहीं; हत्तीघोडे भुके मरत आहेत. वगैरे वगैरे, सांगतां सोय नाहीं!

इकडे राज्यांतील निरनिराळे कर वसूल करतांना अधिकारी लोक प्रजेवर जो अत्याचार करित होते, तो विचारूं नये. साऱ्या लोकांनां त्राहिभगवान झालें होतें. रेसिडेंट साहेबांच्या मडमेला नबाब दररोज एक लाख रूपये देत असतात, ही गप्प कर्णोपकर्णी सर्वांनां कळल्यामुळे तर वास्तविक कांहींएक तथ्य नसलेल्या ह्या गोष्टीवर सर्वांचा विश्वास बसला व बिचाऱ्या या निरपराध इंग्रज युवतीच्या नांवानें अयोध्येची सारी प्रजा खडे फोडूं लागली.

रेसिडेंट साहेब राज्यांतील खडान् खडा बातमी मिळविण्यांत अत्यंत दक्ष असत. या कामासाठीं त्यांनीं मुद्दाम कित्येक डिटेक्टिव नेमिले होते. हे डिटेक्टिव सर्वत्र फिरून प्रत्येक लहानसहान गोष्ट रेसिडेंटाच्या कानांवर घालित असत. तथापि खुद्द आपल्या घरांतली बातमी रेसिडेंट साहेबांस नव्हती, असेंच म्हटलें पाहिजे. त्यांच्या मडमेविषयीं लोकांत काय कंड्या पिकल्या आहेत हे बिचाऱ्यास कांहींच ठाउक नव्हते. कारण, ती हकीगत जर त्याना ठाउक असती तर त्यांनीं याच संधीस आपल्या तिजोरीचें कुलुप कां उघडलें असतें? लोकांत राजरोसपणें त्यांच्या पत्नीविषयीं नाहीं नाहीं ती चर्चा चालली होती व इकडे याच संधीस रेसिडेंट साहेबांनीं आपल्या संग्रहांतील पैशांतून पाऊणकोट रुपये बाहेर काढले. या पाऊण कोट रुपयांचे त्यांनीं कंपनीचे कागद विकत घेतले कीं हे रुपये त्यांनां विलायतेंत पाठवून दिले, तें आह्मांला निश्चितपणें सांगतां येत नाहीं; तथापि रेसिडेंटानें पाऊण कोट रुपयांहूनहि जास्त पैसे संग्रहीं केले होते हें जगजाहीर झालें.

या वेळीं लॉर्ड वुइल्यम बेन्टिक हा गव्हर्नर जनरल असून मेटकाफ साहेब त्याच्या कौन्सिलचा मेंबर होता. हे दोघेहि गृहस्थ मोठे पापभीरू असल्याबद्दल यांची ख्याति आहे. लखनौच्या रेसिडेंटानें पाऊण कोट रुपयांची पुंजी केली आहे, ह्या गोष्टीची लोकांत उघड उघड चर्चा चालली आहे अशी गुणगुण यांच्या कानीं येतांच खाडकन् यांचे डोळे उघडले व धाडकन् कौन्सलहॉलचे दरवाजे बंद करून यांनीं चौकशीस सुरुवात केली. आपल्याविषयीं गव्हर्न्मेंटचें मन सशयी झाले आहे हें रेसिडेंट साहेबांस कळतांच त्यांनीं ताबडतोब आपल्या नोकरीचा राजीनामा पाठविला; परंतु लॉर्ड वुइल्यमनें रेसिडेंटसाहेबांचा हा राजीनामा मंजूर केला नाहीं. रेसिडेंट साहेब या गोष्टीनें अर्थातच चिडून गेले. अशा अन्यायी सरकारची करु

घटकाभरहि नोकरी करणें नतर त्यांनां रूचलें नाहीं. गुपचूपपणें ते गलबतांत बसून स्त्रीसहवर्तमान हिंदुस्थान देशास कायचा रामराम ठोकून इंग्लंडास चालते झाले.

सरकारांतून चाललेल्या या चौकशीची फलनिष्पति काय झाली हें अखेरपर्यंत कोणालाच कळलें नाहीं. चौकशीच्या वेळीं कौन्सिलहालचे दरवाजे बंद असत. अर्थात्, अशा गुप्त चौकशीचा निकाल परमेश्वराशिवाय दुसऱ्या कोणास कळणार आहे? आतां हिमालयांत वास करणारे योगी महात्मे आपल्या अंतर्दृष्टीच्या दिव्य सामर्थ्यानें अशा गुप्त गोष्टी जाणूं शकतात खरे; परंतु त्यांना कळलें तरी ते कोणापाशीं कांहींहि बोलावयाचे नाहींत! कौन्सिलहालच्या बंद दरवाजांच्या सूक्ष्म फटींतून, किल्लीच्या भोंकांतून वगैरे प्रवेश करून कित्येक विलायती आणि गांवठी भुतें ह्या गुप्त गोष्टी चवाठ्यावर आणित असतात; परंतु बोलूनचालून तीं भुतेंच, त्यांच्या कांहींच्या बांहींच बडबडीवर कोणाचा विश्वास बसणार आहे ?

या रेसिडेंट साहेबाविषयींच्या गुप्त चौकशीचा निकाल काय झाला हें चारपांच वर्षेंपावेतों वरील भूतांनां तर काय पण त्यांच्या काकोझांनांसुद्धां कळलें नाहीं. चारपांच वर्षांनंतर म्हणजे इ. स. १८३५ च्या जुलई महिन्याच्या ९ व्या तारखेस' मिरत अब्झरव्हर ' ' Meerat Observer 'मध्यें भुताची पहिली आरोळी ऐकू आली. लगेच २३ व्या जुलईला कलकत्ता येथे एका वेताळानें संचार केला व पहिल्या भुताच्या आरोळी विरुद्ध यानें आरोळी ठोकली व अद्वातद्वा बडबड सुरू केली. तें कांहीं असो, लखनौच्या रेसिडेंटास लॉर्ड वुइल्यम बेन्टिक यानें बडतर्फ केलें होतें, ही गोष्ट निर्विवाद आहे.




“मोज बरें हिशेब किती गज लांब आहे तो।” ( पृष्ठ ४५. )

## प्रकरण ३ रें.

# नापितराज सर्फराजखां.

* Engaged in every species of debauchery, and surrounded by wretches, English, Eurasion, and Natives, of the lowest description, his whole reign was one continued satire upon the subsidiary and protected system.

—*Calcutta Review. Vol. III.*

कालाचा काय हा विलक्षण प्रभाव ! एका काळीं जें स्थान स्वर्गांतील नंदनवनासहि लाजवित होतें, तेंच आज नरकपुरी बनलें आहे! ज्या अयोध्येच्या सिंहासनाला श्रीरामचंद्रासारख्या जितेंद्रिय, प्रजावत्सल राजपुरुषांनी एका काळीं भूषविलें होतें, त्याच अयोध्येच्या सिंहासनाला इंद्रियासक्त, विलासप्रिय, नासिरुद्दिन आज कलंकित करित आहे. अयोध्येचा दुसरा बादशहा नासिरुद्दीन हैदर याच्या चरित्राचें स्वतंत्रपणें वर्णन करण्याचें प्रयोजन नाहीं. एखाद्याचें चरित्र कसें आहे हें जाणण्याची जर कोणाला इच्छा असेल, तर तो कोणत्या लोकांशीं विशेष स्नेहभाव ठेवतो, त्याचे जिवश्चकंठश्च स्नेही कोण आहेत हें पहावे ह्मणजे झालें. त्याच्यासभोंवार असलेल्या मडळींत त्याच्या चरित्राचें प्रतिबिंब पडलेंच पहिजे ! यास्तव बादशहाच्या संवगड्यांच्या चरित्रासंबंधीं एकदोन गोष्टी सांगितल्या ह्मणजे बादशहाच्या चरित्राचीहि वाचकांस साधारण अटकळ करतां येईल.

नासिरुद्दीनाचे पांच दिलजान फिरंगी दोस्त होते, हें पूर्वी सांगितलेच आहे. या दोस्त पंचायतनांत नापितराज De Russett. याचें महात्म्य विशेष असे. आमच्या कथानकांतील बऱ्याच गोष्टींशीं या नापितराजाचा संबंध पोहोंचत असल्यामुळें याचें संक्षिप्त चरित्र या प्रकरणांत कथन करण्याचें आह्मीं योजिलें आहे

लंडन शहरांतील एका इंग्रज स्त्रीच्या पोटीं या न्हाव्याचा जन्म झाला. इंग्लंडांत ज्या मुलांनां बापाचें नांव ठाऊक नसते—आणि अशीं मुलें तिकडे पुष्कळ असतात—

---

* तो हरएक प्रकारच्या दुर्व्यसनांत गढल्यामुळें आणि हलक्या कुळांतील इंग्रज, युरेजिअन आणि देशी दुर्जनांनीं त्याला सदैव घेरल्यामुळें त्याच्या संपूर्ण राज्यांत ' संरक्षण पद्धति ' दाखल करण्यांत आली. —कलकत्ता रिव्ह्यु, पुस्तक ३ रें.

नीं आईच्या नांवानेंच ओळखलीं जातात. ह्या न्हाव्याच्या बापाची लोकांस माहिती नव्हती. अमुक स्त्रीचा हा मुलगा ह्मणून त्याला ओळखित असत. बाळपणीं इंग्लडांत यानें वस्तरा हातीं धरून हजामगिरीचा धंदा पत्करला. पोटापुरते दोन पैसे त्याला तेथें मिळत असत, परतु ह्याची हांव मोठी होती. ईस्ट इंडिया कंपनी हिंदुस्थानांत राज्य करित असून तिकडे जाणारे लोक परत येतांना लाखों रुपये स्वदेशांत घेऊन येतात, हें त्याला, हा हजाम असल्यामुळें आणि हजामाचा नेहमीं लहानमोठ्यांशीं संबंध येत असल्यामुळें कळून आलें, व आपणहि असेंच हिंदुस्थानांत जाऊन लाखों रुपये मिळवावें,अशी अनिवार महत्त्वाकांक्षा त्याच्या मनांत उत्पन्न झाली;परतु हजामगिरीशिवाय अंगांत दुसरें कांहींएक कसब नाहीं; हिंदुस्थानांत आपला प्रवेश व्हावा कसा?ही अडचण उपस्थित झाली. इतक्यांत हिंदुस्थानांतून नुक्तीच आलेल्या एका गृहस्थाकडून " कलकत्त्यांत एकहि इंग्रज न्हावी नाहीं, तेथें न्हाव्याचें दुकान उघडल्यास तें चांगलें चालण्यासारखें आहे," इत्यादि हकीगत याला समजली व यानें तत्काल हिंदुस्थानांत जाण्याचा निश्चय केला. परतु जहाजांच्या भाड्याच्या पैशांची अडचण आली. कलकत्त्यास जाणाऱ्या जहाजांतील खलाशांची मिन्नतवारी करून यानें त्यांच्या सैंपाक्यांत आपली नेमणूक करून घेतली व याप्रमाणें बिनभाड्यानें स्वारी एकदा हिंदुस्थानांत येऊन पोंचली. कलकत्त्यास येतांच त्यानें एक 'हेअर कटिंग सलून' (हजामाचें दुकान) उघडून धंद्यास सुरुवात केली. लवकरच दोन पैसे संग्रहीं केले.जवळ थोडीशी पुंजी जमतांच ह्यानें मग हजामाचे दुकान बंद केलें वइंग्रजी सुगंधी द्रव्यें विकण्याचा व्यापार आरंभिला. याप्रमाणें ही स्वारी हजामाची व्यापारी बनून हिंदुस्थानांत भ्रमण करू लागली. या वेळीं लखनौचे रेसिडेंटसाहेबांच्या डोक्याला टक्कल पडलें होतें. परंतु गव्हर्नर जनरलाचें मस्तक केसांनीं आच्छादिलेलें असे. मोठ्या लोकांच्या क्षुल्लक गोष्टींचेहि अनुकरण करण्याची प्रत्येकाची इच्छा असते. मोठे लोक जसा पोषाख करतील तसा आपण करावा, ते जसे बोलतात, चालतात, हंसतात नव्हे जांभई देतात, शिंकतात तसेंच आपण हुबेहुब करावें, ह्मणजे लोक आपल्यालाहि मोठे समजतील, अशा वेडानें पुष्कळांस पछाडलेलें असतें. रेसिडेंट साहेबांसहि अशाच वेडानें पछाडून गव्हर्नर जनरलासारखे केश आपल्या मस्तकावर ठेवावे असा मोह उत्पन्न झाला इतक्यांत फिरत फिरत वरील न्हावबुवा लखनौ मध्यें आले त्यांची व रेसिडेंट साहेबांची मुलाखत होऊन आपल्या सुगंधी केशवर्धक तैलांच्या सहाय्यानें न्हावीबुवांनीं रेसिडेंटची पुष्कळ दिवसांची इच्छा परितृप्त केली.

न्हावीबुवांवर रेसिडेंटची स्वारी खुष झाली. लगेच त्यांनीं नासिरुद्दीनाकडे ह्या न्हाव्यासंबंधीं प्रशंसा करून त्याने आपल्या न्हाव्यादाखल याची नेमणुक करावी अशी त्याला शिफारस केली. देशी राजेरजवाड्यांनां रेसिडेंटची शिफारस ह्मणजे गव्हर्नर जनरलच्या हुकुमापेक्षांहि जास्त असते! नासिरुद्दीनानें तत्क्षणीं याला आपल्या तैनातीस ठेविलें. अल्प काळांतच हें नापितराज बादशहाचे दिलजान दोस्त बनले. बादशाह ह्या न्हाव्याबरोबर एका टेबलावर बसून आहार करूं लागला, आणखी काय राहिलें! ह्या न्हाव्याचें नांव ऐकतांच कोणीहि याला हा कुलीन घराण्यांतला आहे असें मानित नसे. कारण, बापा ऐवजीं हा आईच्या नांवानेंच प्रसिद्ध होता. अर्थात् अशा हीनकुलोत्पन्नाबरोबर एका टेबलावर बसून भोजन करण्यास बादशहाचे दुसरे फिरगी दोस्त वेळोवेळीं आपली अनिच्छा प्रदर्शित करूं लागले. ही गोष्ट बादशहाच्या ध्यानीं येतांच ह्या भानगडीचा निकाल करण्यासाठीं त्यानें याला मुसलमान उमरावाची 'सर्फराजखां' अशी बहुमानाची पदवी देऊन उच्च पदास चढविलें.

या प्रमाणें हा फिरंगी न्हावी मुसलमान उमरावाच्या पदवीस चढल्यामुळें आतां त्याला बादशहाबरोबर उघडपणे एकाच टेबलावर बसून खाण्यापिण्यास कसलीच हरकत राहिली नाहीं. दारूच्या निशेत हास्यविनोद करतांना हा केव्हां केव्हां नासिरुद्दीनाच्या चुलत्याची पगडी थट्टेने उडवित असे! मुसलमान लोकांना त्यांच्या पगडीस कोणी हात लाविला तर मोठी चीड वाटते. त्या अपमानाबद्दल ते अपमानकर्त्याचा खून करण्यासहि मागेंपुढें पहावयाचे नाहींत! परंतु हा फिरंगी न्हावी खुद्द बादशहाच्या चुलत्याची व दुसऱ्या बड्या बड्या मुसलमान उमरावांची अशा प्रकारची थट्टा-अपमान-हरहमेश करित असे. सारांश, रेसिडेंटाशिवाय साऱ्या अयोध्येंतील लहानथोर व्यक्ति या न्हाव्याला थरथर कांपत असत. त्या वेळीं तो करील ती पूर्वदिशा आणि बोलेल तें वेदवाक्य, अशी स्थिति होती.

नासिरुद्दीनचा पिता गाझीउद्दीन हैदर याचा आचारविचार एखाद्या धर्मशील मुसलमानाप्रमाणें होता. तो कट्टा मुसलमान असल्यामुळें इंग्रजांच्या आचारा-विचारांचा अर्थातच तिरस्कार करी; परंतु त्याच्या चिरंजीवाची गोष्ट बापाच्या आचारविचारांच्या अगदींच विरुद्ध होती. आपले रीतिरिवाज सोडून देऊन प्रत्येक बाबतींत इंग्रजांच्या रीतिरिवाजाचें नासिरुद्दीनानें अनुकरण केलें होतें. इंग्रजां-प्रमाणें तो टेबलावर खातपीत होता व या टेबलखर्चाची व्यवस्था पहाण्याची कामगिरी त्यानें आपला दिलजान दोस्त सर्फराजखां याच्यावर सोंपविली होती.

सर्फराजखां कलकत्त्याहून कधीं एखाद्या महिन्याला पन्नास हजारांची तर एखाद्या महिन्याला साठ सत्तर हजारांची इंग्रजी दारू आणवित होता व युक्तिप्रयुक्तीनें बादशहाचा खजिना कोरडा करित होता.

या वेळीं नबाब मत–मुद्–उल्–दौला हा नासिरुद्दीनाचा मुख्य प्रधान असून अयोध्येच्या दिवाणगिरीवर राजा रामदयाळ सिंह हा होता. गुदस्त सालीं अयोध्येच्या दुर्बल प्रजेवर घोर अत्याचार करून या दोघांनीं जो महसूल वसूल केला होता, तो सर्व खलास होऊन अयोध्येचा खजिना सांप्रत कोरडा ठणठणीत होऊन पडला. अधिकाऱ्यांच्या या भयंकर छळास कंटाळून अनेक परगण्यांतील प्रजा घरादारांचा त्याग करून नेपाळांत पळून गेली. हजारों शेतकरी आपलीं पिढीजाद शेतकीचीं कामें सोडून ठग, दरवडेखोर, यांच्या टोळींत सामील झाले व साऱ्या अयोध्येंत चोर, लुटारू, ठग, पुंड इत्यादि लोकांची बंडाळी सुरू झाली.

वर्ष बहुतेक खलास झालें. फाल्गुननाचा महिना चालू होता. दुकानदार, कंत्राटदार आपापल्या हिशोबाच्या वह्या बगलेत मारून दिवाण राजा रामदयाळ सिंह ह्याच्या कचेरींत येरझारा करूं लागले. एकेकाचा हिशेब तपासून दिवाणसाहेब त्यांना मुख्य प्रधानाकडे पाठवूं लागले. प्रधान साहेब मोठ्या फिकिरीत पडले. हुजुरांनीं मागविलेल्या वस्तु पुरविणारांची बाकी वर्षाचे शेवटींसुद्धां चुकती केली नाहीं, तर त्याबद्दल हुजुरांच्या कानावर कागाळी गेल्याशिवाय राहणार नाहीं; परंतु त्यांना पैसा द्यावयाचा कोठून ? खजिन्यांत तर कवडीहि शिल्लक नाहीं. शिवाय, हुजुरांचा दररोजचा लाखो रुपयांचा खर्च चालूच आहे ! ह्या खर्चाची व्यवस्था न झाल्यास हुजुरांची आपल्यावर इतराजी होऊन खात्रीनें आपल्यास पदच्युत व्हावें लागेल ! आतां करावें तरी काय ? प्रजेवर जो भयंकर अत्याचार चालू होता व साऱ्या राज्याची जी राखरांगोळी होत होती तिकडे मुख्य प्रधानाचें किंवा दिवाण साहेबांचें यत्किंचितहि लक्ष्य नव्हतें. आपापली नोकरी कशी शाबूत राहील, व आपल्या पोळीवर तूप कसें ओढतां येईल या स्वार्थाच्या विचारानेंच राज्यांतील लहानमोठ्या अधिकाऱ्यांस चिंताव्याकुल करून सोडलें होतें. स्वार्थपरायण होऊन आपापल्या नोकरीच्या शाश्वतीसाठीं प्रत्येक लहान मोठा अधिकारी रयतेच्या सुखदुःखांची तिळभरहि पर्वा न करितां अनन्वित कृत्यें करून खजिन्याची भरती करित होता. तथापि निश्चित मनानें कोणालाच झोंप येत नव्हती. हुजुरांची मर्जी केव्हां खप्पा होईल व आपण कधीं नोकरीस मुकूं ही भीति प्रत्येकाच्या सदैव डोळ्यांपुढें असे.

फाल्गुन महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात एके दिवशीं सकाळीं नऊ वाजण्याच्या सुमारास छोटी हजिरी उरकून बादशहाची स्वारी राजवाड्यांतील एका दिवाणखान्यांत एकटीच बसली होती. या वेळीं बादशहाच्या आंग्ल पंचायतन दोस्तांपैकीं चौघेजण छोटी हजिरी खाऊन घोड्यावर बसून रपेट करण्यासाठीं शहरांत गेले होते. अकरा वाजेपर्यंत ते परत येणार नव्हते. अशी संधि साधून सर्फराजखां हातांत हिशोबाचा कागद घेऊन तेथें आला. त्याला पाहून नासिरुद्दीन हास्य मुद्रा करून ह्मणाला "हां, खांसाहेब! खर्चाचा हिशेब आणला वाटतें?"

सर्फराजखां मस्तक लववून ह्मणाला "मुलके जामानिया! ह्मटलें, गेल्या महिन्याच्या खर्चाचा आंकडा खाविंदांच्या कानावर घालावा."

सर्फराजखांचा हिशेब इंग्रजी दुकानदारांच्या बुकाप्रमाणें अगर देशी व्यापाऱ्यांच्या चोपडीप्रमाणें बुकांत अगर चोपडींत लिहिलेला नव्हता. जन्मपत्रिकेचा लांबच लांब गुंडाळी केलेला जसा कागद असतो, तशा एका भली मोठी गुंडाळी केलेल्या कागदावर त्यानें आपला हिशेब मांडला होता. नासिरुद्दीनानें हिशेबाचें नांव काढतांच सर्फराजखाने गुंडाळीचें एक शेवट हातांत धरून ती टेबलावर सर्कन् सोडून दिली. गडगडत गडगडत तिनें सारें टेबल व्यापिलें, तरीहि शेवटचा भाग गुंडाळलेलाच राहिला होता! नासिरुद्दीन ही ही करित ह्मणाला "मोज बरे हिशेब किती गज लांब आहे तो!"

सर्फराजखांनें ताबडतोब फूट घेऊन कागद मोजला तों तो पांच यार्ड, दोन फूट, आणि साडेतीन इंच भरला. कांहीं गुंडाळी सुटावयाची राहिली होती ती उलगडून सर्फराजखां मोजावयास जात होता. परंतु त्याचा हात धरून नासिरुद्दीन ह्मणाला "बस, पुरे कर. एवढा मोठा हिशेब आणला आहेस? बरे, मला सांग एकंदर किती रुपये झाले?"

सर्फराजखां ह्मणाला "नव्वद हजार रुपये मुलके जामानिया!"

"इतर महिन्यांपेक्षां बरीच जास्त रकम दिसते रे!"

"मुलके जामानिया! इतर महिन्यापेक्षां गेल्या महिन्यांत थोडासा अधिक खर्च झाला आहे. कांहीं नवीन चिनीमातीची भांडीं, दोन काबुली मांजरें व एक बुलडॉग विकत घेतला त्यामुळें हा खर्च थोडासा वाढला आहे. बुलडॉग कसा आहे पण! तुमच्या हिंदुस्थानांतील दोन हत्तींचा समाचार घेईल!"

"आच्छा!" नासिरुद्दीन म्हणाला "नबाब मत-मुद्-उल्-दौलाला हा कागद दाखवून पैसे मागून घे." असें म्हणून बादशहाने सर्फराजखांच्या हिशोबाच्या कागदावर सही केली.

बादशहाची सही मिळतांच सर्फराजखां तडक मुख्य प्रधानापाशीं गेला. तो आंकडा पहातांच बिचारा प्रधान हतबुद्धच झाला! बादशहानें कागदावर सही केली आहे. पैसे आतांचे आता दिलें पाहिजेत, न दिल्यास बादशहाचा हुकूम मोडल्यासारखे होईल! इकडे खजिन्यांत तर कवडी नाहीं! तरी त्याने तिजोरीवर हुकूम पाठविलाच!

संध्याकाळी प्रधानाने बादशहाची मुलाकत घेऊन त्याला नम्रतेनें म्हटले "मुलके जामानिया! सर्फराजखां सरकारची तिजोरी सारखी लुटित आहे! एवढा खर्च मुळींच झालेला नाहीं!"

नासिरुद्दीन संतापून म्हणाला "चूप रहो! मी त्याला बडा उमराव करणार आहे. एवढा खर्च झालेला नाहीं हे मी जाणतों; तुम्हाला त्यांत तोंड घालण्याची जरूर नाहीं!"

आतांपर्यंत नासिरुद्दीनाच्या विवाहित अशा तीनच बेगमा होत्या. त्याच्या विलासदासी पुष्कळ असत व रोज त्यात नवी नवी भरती होतच असे. ह्या विलासदासींपैकी एका नर्तकी कचनीला बेगमपदावर आरूढ करण्याची एक दिवस बादशहाला लहर लागली. झालें, मनांत येण्याचा उशीर, त्याप्रमाणें घडलेंच पाहिजे! नासिरुद्दीन हा अयोध्येचा सार्वभौम बादशहा होता. त्याला जगांत अशक्य असे काय होतें! आणि त्याने योजिलेल्या एखाद्या कामांत व्यत्यय आणण्याचें कोणाचे सामर्थ्य होते! लगेच मौलवी बोलावून त्या वेश्येशीं त्याने धर्मशास्त्राप्रमाणें विवाह करून तिला बेगमपदावर नेऊन बसविली. या बेगमेचा भाऊ पूर्वी वेश्यांच्या साजिंद्यांपैकीं एक सारंगी वाजविणारा होता; आतां त्याच्या बहिणीच्या भाग्योदयाबरोबर त्याचाहि भाग्यसूर्य उदयास येऊन तो उमरावाच्या पदवीस चढला व अमीर उद्-दौला या नांवानें लोकांत प्रसिद्ध झाला, बादशहाने आपल्या नव्या बेगमेस विवाहानिमित्त दरसाल चोवीस हजार उत्पन्नाची एक जहागीर करून दिली होती व त्या जाहागिरीच्या वसुलाची कामागिरी या अमीर उद्-दौलावर सोंपविली होती. या स्वारीने जहागिरीचा जो वसूल आला तो सारा उडवून टाकला, बेगमेला कवडीहि दिली नाहीं. बोलूनचालून प्रिय बेगमचा

भाऊ! त्याच्याकडे कानाडोळा करणें बादशहाला भाग पडलें. आपल्या आवडत्या बेगमेला पैसा न पोंचल्यामुळें तिला तेवढी रक्कम खजिन्यांतून देण्याचा प्रधानास हुकूम झाला. इकडे याच संधीस सर्फराजखानें बादशहाच्या पशुशाळेंत ठेवण्यासाठीं कांहीं जनावरे खेरेदी केलीं, त्याबद्दल बरीच रक्कम देण्याविषयीं बादशहाचा हुकूम सुटला. मुख्य प्रधान आणि दिवाण आपापल्या नोकरीच्या रक्षणासाठीं फार भिऊन गेले व त्यांनीं एकंदर तालुकदारांस सक्तीचे हुकूम सोडून अमुक अमुक पैसा चैत्र महिना संपण्याच्यापूर्वीं पाठविलाच पाहिजे, असें निक्षून कळविलें. ज्यांच्याकडून वरील मुदतींत पैसा येण्यांत अंतर होईल, त्यांना एकदम बडतर्फ केलें जाईल, असेंहि त्यांनीं सर्व तालुकदारांस बजाविलें होतें. काय करतात बिचारे! सगळे पोटाचे दास! वरिष्ठांचा असा हुकूम येतांच त्यांच्यांत मनुष्यपणाचा जो कांहीं यत्किंचित् अंश होता तोहि नष्ट झाला व प्रत्येकानें राक्षसी स्वभाव धारण करून रयतेवर घोर अत्याचार आरंभिला. बरोबर लष्करी लोकांची तुकडी घेऊन एकेक तालुकदार आपापल्या प्रांतावर स्वारी करावयास निघाला! गांवांचीं गांवें, शहरांचीं शहरें त्यांनीं जाळूनपोळून बेचिराख केलीं. हजारों निरपराध्यांचे हाल हाल केले, हजारों लोकांनां राखेचे तोबरे चारिले, तुरुंगांत पाठविलें, कित्येकांचे प्राणहि घेतले! जेणेंकरून पैसा उत्पन्न होईल असें कोणतेंहि घोर कर्म करण्यास त्या अधमांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. त्यांनीं श्रीमंत जमीनदारांच्या, सावकारांच्या घराला वेढा द्यावा, त्यांच्या बायकामुलांस पकडावें व अमुक अमुक रकम द्या ह्मणजे तुमच्या बायकामुलांनां सोडतो, नाहीतर त्यांनां भ्रष्ट करतो अशी धमकी देण्याचा क्रम आरंभिला. अयोध्येच्या प्रजेमध्यें हिंदूंचा भरणा विशेष होता, आणि हिंदुलोकांनां आपल्या बायकांची अब्रू म्हणजे प्राणापेक्षांहि प्रिय असते हे सांगावयास नकोच. बिचारी असहाय, दुर्बल प्रजा घरांत होतें नव्हतें तेवढें त्या सरकारी अधिकारीरूपी मांगांच्या हवालीं करून आपल्या स्त्रिया—भगिनी-मुलींची अब्रू बचावूं लागले. ज्या जमीनदारांपाशी, जहागिरदारांपाशीं थोडेसे शिपाईप्यादे होते व ज्यांचीं घरें किल्ल्यांप्रमाणे मजबूत होतीं ते या तालुकदारांवर उठून त्यांच्याशीं लढूं लागले व कित्येकांस त्यांच्या पापाचें प्रायश्चित्त भोगण्यासाठीं यमसदनास पाठवूं लागले. मोहामदी, सीतापुर वगैरे जिल्ह्यांत तर भयंकर बंडाळी सुरू झाली.

साधारण सुखवस्तु लोकांची आणि बलिष्ठ जमीनदार सरदारांची ही स्थिती झाली. परंतु दुसरे जे हजारों लोक राहिले त्यांच्या हालांस सीमाच नव्हती. त्यांच्या स्थितीचें वर्णन आमच्यानें मुळींच करवत नाहीं, आणि तें करण्याचें आमच्या लेखणीच्या अंगीं सामर्थ्यहि नाहीं. या बिचाऱ्यांजवळ सरकारी अधिकाऱ्यांशीं दोन हात करण्यास—त्या अधिकाऱ्यांच्या दृष्टीनें सरकाराविरुद्ध बंड करण्यास म्हणा पाहिजे तर—शिपाईप्यादे नव्हते; आपली स्त्री, भगिनी, कन्या यांच्या अब्रूचें रक्षण करण्यासाठीं त्या नरपशूंस द्यावयाला त्या बिचाऱ्यांपाशीं पैसाहि नव्हता. अर्थात्, त्यांच्यावर घोर अत्याचार होऊं लागला. लज्जा, अपमान, त्वेष, मनःपीडा इत्यादि मनोवृत्तींनीं जळून जाऊन बिचारे हजारों दुर्बळ, अनाथ स्त्रीपुरुष गंगेमध्यें उडी घेऊन जीवन्मुक्त झाले !

अशा भयंकर अत्याचारानें, अशा असह्य बाल-स्त्री-नर हत्यांनीं सारे भरतखंड पापपंकांत बुडून गेलें, भरतखंडांत निवास करणारे योगीमहात्मे, सिद्ध पुरुष, ह्या स्मशानवत्, पापानें भरलेल्या, पतित देशाचा त्याग करून हिमालयाच्या शांत पवित्र गुहांत जाऊन बसले. परंतु पुण्यसलीला, संतानवत्सला भारतधात्री सुरधुनी गंगा, संतानस्नेह परित्याग करण्यास असमर्थ होऊन अत्याचारानें गांजलेल्या आपल्या सहस्त्रावधि पुत्रकन्यांनां हृदयाशीं घेऊन अश्रुपात करित राहिली.

## प्रकरण ५ वें.

# दोघे मुख्य प्रधान.

" अजब आपकी बादशाही
तमाम खलकतकी ताबानी. "

सौभाग्याची चचलता, अधिकार–वैभवादिकांची अनित्यता, त्याचप्रमाणें संसाराची असारता, ह्यांची प्रतीति अयोध्येच्या इतिहासांतील प्रत्येक घटना अयोध्येच्या हतभाग्य लोकांस क्षणोक्षणीं आणून देत होती. मागील प्रकरणांत सांगितलेल्या गोष्टी घडल्याला एकदोन महिने लोटण्यापूर्वीच अयोध्येचे मुख्य प्रधान नबाब मत–मुद–उल्–दौला आणि दिवाण राजा रामदयाळ सिंह हे उभयतां कारागृहां-तील भयंकर हालअपेष्टा अनुभवित होते. त्यांचे वाडे, हवेल्या, जमीनजुमला, सारी संपत्ति बादशहाच्या हुकुमाने जप्त झाली होती. फरक्काबादहून मन्ताजिम –उद्–दौला लखनौला येऊन प्रधानगिरीचें काम पाहूं लागला होता. ह्यालाच हकीम मेहद अली खां असें ह्मणत असत.

अयोध्येचा इतिहास लिहिणारांचें ह्मणणें आहे कीं, नबाब मत–मुद–उल–दौला आणि दिवाण राजा रामदयाळ यांनीं सरकारी पैशाचा अपहार केल्याच्या आरोपा-वरून नासिरुद्दीनानें त्यांनां तुरुगांत टाकिलें होतें; परंतु नबाबी अमलाच्या वेळीं अयोध्येंतच काय, साऱ्या हिंदुस्थानांत सरकारचे लहानमोठे अधिकारी आपली तुंबडी भरण्यांत मोठे प्रवीण असल्याबद्दल त्या सर्वांची फार ख्याति आहे ह्मणून, केवळ वरील अपराधामुळेंच बादशहाची त्यांच्यावर इतराजी झाली, असें निदान आम्हांला तरी वाटत नाहीं. अयोध्येचा बादशहा नासिरुद्दीन हा फिरंगी हजाम सर्फराजखां ह्याच्या अगदीं ओंजळीनें पाणी पीत होता. या सर्फराजखांच्या कुशाग्र बुद्धीचा अल्प परिचय मागील प्रकरणांत वर्णिलेल्या त्याच्या संक्षिप्त चरित्रा-वरून वाचकांस झालाच आहे ह्या नापित महाराजांनीं बादशहाच्या झनान्यांतील खोजा मंडळीचा पूर्ण स्नेह संपादून त्यांच्या सहाय्यानें नासिरुद्दीनाच्या अंतःपुरांत आपलें पूर्ण वर्चस्व स्थापित केलें होतें. ह्या न्हाव्याचा अंतःपुरांत प्रत्यक्षपणें जरी प्रवेश होत नव्हता, तरी तेथील सर्व सूत्रें हालविणारा हाच होता. नबाब मत–मुद–उल्–दौला आणि राजा रामदयाळ यांनां पदभ्रष्ट व्हावें लागून तुरुंग

वासाचे कष्ट अनुभविण्याचें त्यांचें दैवीं येण्यास ह्या नापितराजांचीं कृष्णकारस्थानेच कारणीभूत झालीं असावीं. पांचसहा महिने बिचाऱ्यांनीं तुरुंगातील भयंकर हालअपेष्ट सहन केल्यावर रेसिडेंटाच्या मेहरबानीनें त्यांची मुक्तता झाली. तुरुंगांतून सुट-ल्यावर मग ते क्षणभरहि अयोध्येस राहिले नाहींत. मत–मुद–उल्–दौला कानपुरास जाऊन राहिला व इ. स. १८३१ च्या मे महिन्यांत बिचारा मरण पावला ह्या हतभाग्य प्रधानामागून हकीम मेहद अलीखां याला अयोध्येच्या मुख्य प्रधानाचीं वस्त्रें मिळालीं होतीं, हें वरती सांगितलेच आहे हा प्रधान मोठा राजकारणकुशल होता. आपल्या धन्याशीं हा अगदीं नम्र असे, प्रजेला कर्दनकाळ वाटे, पाताळयंत्रांत मोठा प्रवीण होता व इंग्रज रेसिडेंटाशीं तर अगदीं दासानुदासारखा वागत होता. हा नवीन प्रधान मोठया चातुर्यानें राज्यशकट हाकूं लागला.

एक दिवस हकीम मेहद अलीखां राज्यासबंधीं कांहीं महत्वाचे कागदपत्र चाळित आपल्या कचेरींमध्यें बसला होता. इतक्यांत बादशहाची स्वारी अकस्मात् तेथ आली व लगेच निघून गेली. मेहदअलीनें बादशहास पाहिलें नाहीं, तो आपल्या कामांत अतिशय गढला होता. बादशहा निघून गेल्यावर त्याला कळलें कीं, मुलके जामानिया कचेरींत येऊन गेले व आपण कामांत गढलो असल्यामुळें त्यांना सलामी देण्याचें राहून गेलें. आपल्या या अक्षम्य अपराधाबद्दल मेहदअलीला अत्यंत पश्चात्ताप झाला. प्रत्यक्ष बादशहा कचेरींत येतो व आपण त्याला सलाम करित नाहीं म्हणजे काय ? त्या स्वामीनिष्ठ सेवकानें खाड्दिशीं वीस हजार मोहरा आपल्याला दंड करण्याचा हुकूम केला ! अहाहा ! केवढी ही न्यायप्रीति ! केवढा निःपक्षपात ! वजीर खुद्द स्वतःलाहि क्षमा करूं शकला नाहीं ! अशा प्रकारचा नीतीचा पुतळा ज्या राज्याला मंत्री लाभला, तें रामराज्य नव्हे असें कोण म्हणेल ? धन्य ती अयोध्येची प्रजा कीं, तिला असा नीतीचा पुतळा लाभला होता !

हकीम मेहदअलीखांची प्रधानाच्या जागीं नेणूक झाल्यावर लवकरच अयोध्येच्या सेनापतीच्या जागीं राजा दर्शनसिंह हे नियुक्त झाले. अयोध्या ही पूर्वी-पासून इंग्रजी सैन्याच्या रक्षणाखालीं होती, हें वाचकांस ठाऊकच आहे. तेव्हां त्यांची साहजिकच कल्पना होईल कीं, राजा दर्शनसिंह हे त्या इंग्रजी सैन्याचे सेनापति असतील. पण तसें नव्हे ! राज्याचा महसूल वसूल करण्यासाठीं, त्याचप्रमाणें शहरांतील बंदोबस्त पहाण्यासाठीं जे थोडेसे शिपाईप्यादे असत, त्या सैन्याचा राजा दर्शनसिंह हा सेनापति होता. नांव मात्र सेनापतीचें, परंतु काम पोलिस सुपरि-

न्टेन्डन्टाचें ! सांप्रत हिन्दुस्थानांत डिस्ट्रीक्ट सुपरिन्टेन्डन्ट जें काम करित असतात तेच सेनापति राजा दर्शनसिंह त्यावेळीं अयोध्येंत करित होता. सांप्रत आपले उदार ब्रिटिश सरकार, अगदीं बुद्धिहीन, दुसऱ्या कोठेंच उपयोग होण्यासारखा नसलेल्या परंतु दिसण्यांत तरतरीत अशा आपल्या जातभाईची पोलिसखात्यांत वर्णी लावून त्यांच्या पोटापाण्याची सोय करितें, असे कित्येक युरोपियनांचें ह्मणणे आहे–तें खरे असो अगर खोटें असो, त्याशीं आपल्या कथानकाचा कांहींच संबंध नाहीं,—त्याचप्रमाणें अयोध्येचा बादशाह नासिरुद्दीन हैदर यानें आपल्या प्रीतीतल्या राजा दर्शनसिंहाचा वर्णी लावण्यासाठींच त्याला ही सेनापतीची जागा दिली होती. त्या जागेला तो पात्र होता कीं नाहीं, हें पाहण्याचें अर्थातच बादशहाला प्रयोजन नव्हतें व प्रजेला तर नव्हतेंच नव्हतें !

सेनापति राजा दर्शनसिंह नासिरुद्दीन हैदरच्या गळ्यांतलि ताईत होता. दर्शनसिंहासारखे अनेक सच्चरित्र, साधुपुरुष नासिरुद्दीनाचे दिल्‌जान दोस्त असत नासिरुद्दीनाला हे सर्व जरी प्रिय असत तरी त्यांची परपस्परांत आंतून नेहमीं पस्पर्धा चाललेली असे. बादशहावर सर्वांत जास्त पगडा कोण बसवितो, यासाठीं रात्रंदिवस ज्याची त्याची धडपड चाललेली असे फिरंगी न्हावी सर्फराजखां ह्यानें ह्या बाबतींत सर्वांस पराभूत केले होतें. त्या सर्फराजखांवरहि कडी करण्याचा राज दर्शनसिंहाचा अट्टहास सुरू होता. सर्फराजखांची जागा आपण बळकवावी ह्मणून तो जंगजंग पछाडित होता. परंतु बिचाऱ्याला यश येईना. दुपारीं भोजनाचे वेळीं नासिरुद्दीन आपल्या फिरंगी सवंगड्यांनां घेऊन खानपानाची गर्दी उडवित असे. दुर्भाग्येकरून या भोजनसमारंभाचे वेळीं राजा दर्शनसिंहाला तेथें प्रवेश करतां येत नसे. कारण, या वेळीं टेबलावर गोमांस असे. गोमांसाच्या उग्र दर्पानें ती सर्व जागा दुमदुमून जाई. दर्शनसिंह हिंदु. त्याच्या अदृष्टांत त्या उग्र गंधाचा आस्वाद घेण्याचें विधात्यानें लिहिलें नव्हतें.

परंतु सेनापति दर्शनसिंह कांहीं एवढ्यानें निराश होणारांपैकीं नव्हता ! तो मनांत ह्मणे, बादशहाच्या भोजनाच्या दगलींत आपल्याला सामील होतां येत नसलें ह्मणून काय झालें ! दुसऱ्या अशा हजारो गोष्टी आहेत कीं, ह्या विलायती न्हावगंड्याच्या बापदादाच्यानेंहि त्या व्हावयाच्या नाहींत ! हा पठ्ठा त्या करून बादशहाला खूष खूष करील व न्हावगंड्यापेक्षां बादशहाची मर्जी आपल्यावर अधिक बसेल ! आणि दर्शनसिंहाला स्वतःच्या कर्तबगारीचा जो एवढा विश्वास वाटत होता तो

उगाच नव्हता. खरोखरच त्याच्या अंगीं तशी अपूर्व करामत होती. त्याच्याच प्रयत्नामुळें आणि त्याच्याच अलौकिक कर्तबगारीमुळें विलासी नासिरुद्दीनाचें अंत:पुर रोज नव्यानव्या रमणीरत्नांनीं विभूषित होत होतें.

राजा दर्शनसिंहाची प्रशंसा केल्यावर आह्मांला प्राजलपणें हेहि कबूल करावें लागत आहे कीं, नापितराज सर्फराजखांचेहि बादशहाच्या अंत:पुराची शोभा वृद्धिंगत करण्याचे बाबतींत कमी प्रयत्न चालू नव्हते. दर्शनसिंहाच्या कार्याचें क्षेत्र संपूर्ण अयोध्याभर पसरलें होतें, व नापितराज लखनौ शहराच्या चतु:सीमेच्या आंत काम करित असत, एवढाच कायतो उभयतांच्या कामांत फरक होता. अंत:पुरांतील देशी सुंदरींनां विलायती मडमांच्या पोषाखांत सज्ज करून नाचरंग करण्याची बादशाहाची वेळोवेळीं तब्यत लागे व ह्या बाबतींत ह्या फिरंगी न्हाव्याचें बादशहाला पुष्कळच सहाय्य होई. शिवाय, त्यानें बादशहाच्या झनानखान्यांत चारपांच आंग्ल परिचारिका ( नर्सीस ) हि ठेवल्या होत्या. असा एकंदर प्रकार असल्यामुळें सर्फराजखांपेक्षां बादशहाची आपल्यावर अधिक मर्जी प्रसन्न व्हावी, ही जी राजा दर्शनसिंहाची धडपड, ती कशी बरें सिद्धीस जावी ? राजा दर्शनसिंह नसता तरी बादशहाला चैनीनें काळक्रमणा करितां आली असती; परंतु सर्फराजखां हें नासिरुद्दीनाच्या खास दरबारांतील अद्वितीय नररत्न होतें ! सर्फराजखां पदरीं नसता तर बादशहाचें कोणतेंच कार्य मनाप्रमाणे घडून आलें असतें कीं नाहीं याची शंका होती. सर्फराजखां आपल्या पदरीं आहे ह्मणूनच आपण हे सुख उपभोगण्यास भाग्यशाली झालों आहों, अशी बादशहाची तर बालंबाल खात्री होती व ह्मणूनच बादशहाची स्वारी सर्वांपेक्षां सर्फराजखांवरच जास्त फिदा झाली होती.

राजा दर्शनसिंह बाहेरून सर्फराजखांशीं अत्यंत स्नेहभाव दर्शवित असे. परंतु आंतून त्याच्याविषयीं तो सारखा जळत होता; एवढेंच नव्हे, तर त्याच्या नाशाचे गुप्त प्रयत्न त्यानें जारीनें चालविले होते. सर्फराजखांहि त्याप्रमाणेंच दर्शनसिंहाशीं बाहेरून दिलजान दोस्ताप्रमाणें आणि आंतून कट्या दुस्मानाप्रमाणें वागत असे. तथापि या उभयतांचें उद्देश्य आणि महत्त्वाकांक्षा हीं भिन्नभिन्न होतीं. बादशहाची मर्जी संपादून जहागीर, हत्ती घोडे, मानमरातब पटकावण्याची राजा दर्शनसिंहाची धडपड सुरू होती; फिरंगी न्हावी बादशहाकडून मिळतील तसे पुष्कळसे पैसे लवकर लवकर उपटून विलायतेस जाऊन बॅरोनेट होण्यासाठीं अस्थिर झाला होता. दर्शनसिंहाची दृष्टि स्थावर संपत्तीवर होती, सर्फराजखांची जंगम

संपत्तीवर होती; दर्शनसिंहाचे शस्त्र त्याचे तोंड होतें, सर्फराजखांचे शस्त्र त्याचा वस्तरा आणि कातरी होतें; बाहेरच्या लोकांवर दर्शनसिंह आपला अधिकार गाजवित असे, सर्फराजखांच्या हुकुमाशिवाय जनानखान्यांत पानहि हलत नसे; बादशहासाठीं राज्यांतील सुंदर स्त्रियांचा सग्रह करित असतां दर्शनसिंह त्यांतील विशेष रूपवान् स्त्रिया बादशहाच्या हातावर तुरी देऊन कधींकधीं मधल्यामध्यें आपणच बळकावून बसे, तर इकडे सर्फराजखां विशेष स्वार्थत्याग प्रगट करित असे; इतका कीं, आपल्या परिवारांतील स्त्रियांवर बादशहाची नजर गेल्यास त्यांची बादशहाच्या झनान्यांत भरती करण्यासहि तो मागेंपुढें पहात नसे !

हकीम मेहद अलीखां केव्हां केव्हां सर्फराजखांशीं अत्यंत मित्रत्त्व दर्शवून त्याच्या गुप्त कारस्थानांत सामील होऊन राजा दर्शनसिंहाच्या नाशाचे प्रयत्न करी, तर केव्हां केव्हां दर्शनसिंहाशीं स्नेहभाव दर्शवून सर्फराजखांला पदभ्रष्ट करण्याच्या त्याच्या प्रयत्नाला मनापासून सहाय्य करी. नासिरुद्दीनाचे दुसरे चार युरोपियन् सवंगडी असत, त्यांनांहि सर्फराजखांचे हें वर्चस्व सहन होत नव्हते. बादशहाची त्याच्यावर इतराजी होईल असे प्रयत्न करण्यांत त्यांचेहि आंतून अंग असे. सारांश नासिरुद्दीनाच्या कारकिर्दींत त्याच्या राज्यांतील काय किंवा खास दरबारांतील काय, एकून एक अधिकारी बाहेरून परस्परांशीं मैत्रीचें अघळपघळ प्रदर्शन करीत व आंतून जो तो दुसऱ्याच्या नाशाविषयीं टपून बसलेला असे.

बादशहाला घेरणारे हे आंग्ल पंचायतन हकीम मेहद अलीच्या डोळ्यांत एकसारखें सलत होतें. त्या पांचहि बदमाषांस केव्हां हाकलून देऊं, याविषयीं त्याचीं सारखीं पाताळ यंत्रें चालू होतीं. परंतु या प्रयत्नाने आपल्याच प्रधानगिरीला मुकावें लागेल, हे बिचाऱ्याला कळलें नाहीं ! आज मेहद अली बादशहाला राज्या-संबंधीं काम समजावून देत होता. साहस करून ओघाओघानें त्यानें आपल्या मनांत रात्रंदिवस डंवचत असलेल्या गोष्टीचा उपक्रम केला. तो ह्मणाला "मुलके जामानिया नौसिरासारखे आपण न्यायपरायण, हातामासारखे दानशूर, जगांत आपल्यासारखा दयाळू धर्मावतार, पराक्रमी बादशहा आजपर्यंत झाला नाहीं व मी खात्रीनें सांगतों कीं, पुढेंहि होणार नाहीं ! अल्ला आपल्याला सहस्र वर्षे आयुष्य देवो व आपली बादशाही चिरायु करो !"

वजिराचें हें प्रशंसापर भाषण ऐकतांच नाशीर समजून चुकला कीं, स्वारीच्या मनांत आज कांहीं तरी सांगावयाचें आहे. हास्यमुख करून बादशहानें विचारलें " वजीर, काय ह्मणतां, बोला झटकन ! "

मेहद अल्ली विशेषच लीनतेनें ह्मणाला "गुलामाला बेअदबीची माफी असल्यास हुजुरांच्या कानांवर एक गोष्ट घालण्याची परवानगी घेईन."

"बोला काय तें."

मेहद अल्ली दोन्ही हात जोडून ह्मणाला "मुलके जामानिया! बादशाही दरबारचा एक जुना रिवाज नाबुद होत आहे."

"कोणता रिवाज नाबुद होत आहे? कुराणांत चार बेगमा करण्यास सांगितलें असल्यास मी आठ बेगमा करण्यास एका पायावर तयार आहें!"

"खुदावंत! बादशहाने आठ कां अठ्ठावीस बेगमा केल्यास कुराणाची त्याला संमतीच आहे. मी जे ह्मणत होतों ते त्या बाबतींत नव्हे."

"मग कोणत्या बाबतींत, ते लवकर सांगा पाहूं?"

"हुजुर! पायांत जोडा घालून अयोध्येच्या दरबारांत येण्याचा प्रघात केव्हांहि नव्हता. मुलके जामानियाचे परम वंदनीय वडील,–पुरुषसिंह–पृथ्वीचे सार्वभौम राजे –अयोध्येचे पराक्रमी, नीति–न्याय–परायण, बादशहा गाझी–उद्–दिन–हैदर केव्हांहि जोडे घालून आपल्या दरबारांत कोणालाहि येऊं देत नसत! तथापि खुदावंतांच्या दरबारांत फिरंगी लोक सर्वदा जोड्यांसह निःशंकपणे प्रवेश करित आहेत!"

नासीर किंचित हंसून ह्मणाला "इंग्लडचा राजा मोठा कीं मी मोठा, सांगा पाहूं?"

"मुलके जामानिया, हिंदुस्थानांतील सर्व राजांपेक्षां--दिल्लीच्या बादशहापेक्षांहि थोर आहेत!"

"काय ह्मटलेंत? मी इंग्लडच्या राजापेक्षांहि श्रेष्ठ!"

"मुलके जामानिया गुलाम का आपल्या प्रभूपेक्षां दुसऱ्या कोणाला श्रेष्ठ ह्मणूं शकेल? किंवा दुसरा आपल्या धन्याहून श्रेष्ठ आहे असें त्याच्या मनांत तरी कसें येईल?"

"वजीर! ऐका. इंग्लंडचा राजा हा माझा मालक आहे. त्याच्या दरबारांत जर हे इंग्रज लोक बुटांसह प्रवेश करितात, तर मग मी जो त्या इंग्लंडच्या राजाचा ताबेदार त्या माझ्या दरबारांत हे जोडा पेहरून आल्यास त्यांत काय बिघडलें? हे केव्हांहि मस्तकावर टोपी ठेवून माझ्या दरबारांत येत नाहींत!"

"होय खुदावंद! टोपी उतरून नंतर हे येत असतात."

"तर मग दरबारचा अपमान करण्याचा यांचा उद्देश नसतो, हें उघड आहे. तुह्मी जोडे काढून ठेवून दरबारला मान देतां, इंग्रज लोक टोपी काढून सन्मान प्रदर्शित करतात. तुह्मी जर पगडी काढून दरबारांत याल तर तुम्हांलाहि मी जोडयांसह दरबारांत ्रेण्याची परवानगी देईन."

मुसलमानांला पगडी उतरणें हा प्रांणांतिक अपमान वाटत असतो. अर्थात् मेहद अल्लीची सर्व चतुरता निष्फल झाली. त्याला वाटत होतें कीं, इंग्रज लोकांनां जोडे उतरून दरबारांत येण्याचें फर्मावितांच ते अपमानित होऊन आपेआप चालते होतील, अर्थात् आपला मनोदय यत्किंचितहि प्रयास न पडतां सहजासहजीं सिद्ध होईल परतु बिचाऱ्याचा तो प्रयत्न विफल झाला.

मेहदअल्ली नतर दुसऱ्या उद्योगाला लागला. बादशहाची मर्जी आपल्यावर कशी प्रसन्न होईल. हाच त्याला रात्रंदिवस निदिध्यास लागला होता. चैनी बादशहाला पैशाची फार गरज होती व त्याला आपण मुबलक पैसे पुरविले म्हणजे तो आपल्यावर प्रसन्न होईल, असा विचार करून मेहदअल्ली पैसे जमविण्याच्या प्रयत्नास लागला; परंतु या वेळीं बहुतेक जहागिरदार, जमीनदार उघड उघड सरकाराविरुद्ध उठले होते. जागजागीं बडाच झेंडे फडकू लागले होते. परतु मेहद अल्ली कांहीं कच्चा नव्हता. त्यानें इंग्रजी सैन्याची कुमक घेऊन इंग्रजांची एकक पलटण प्रत्येक तालुकदाराच्या सहाय्यास पाठवून दिली व त्या सैन्याच्या जोरावर रयतेकडून पैसा पिळून काढण्यास त्यानें तालुकदारांस फर्माविलें. पुनः अयोध्येमध्यें अत्याचाराचा वडवानल भडकून गेला. त्या ज्वालांनीं होरपळून पुनः सहस्रावधि असहाय अबला आपल्या शिशुसतानांस उराशीं घेऊन भारतमाता सुरधुनी गंगेच्या शीतल आश्रयास गेल्या. आपली पत्नी, भगिनी, वृद्ध जननी यांना गंगेच्या हवालीं करून अयोध्येच्या सदाचारी परतु असहाय दुर्बळ प्रजेमधील शेकडोजण आपल्यावरील अत्याचाराचा सूड उगविण्याच्या हेतुनें चोर, ठग, दरवडखोर यांच्या टोळ्यांत सामील झाले व सर्वत्र जाळपोळ करूं लागले, कित्येक बिचारे सात्त्विक वृत्तीचे लोक होते त्यानीं संसारसुखावर जलांजलि वाहून वानप्रस्थाश्रम स्वीकारून हिमालयाचा आश्रय केला.

## प्रकरण ६ वें.

# सीतापुरचा किल्ला.

* "In all my wanderings and tribulations in this vale of miseries I often find that I am guided by a devine impulse which is breathed into my soul by an unknown spirit."

—*C.'s Diary.*

अयोध्येच्या वायव्येस असलेल्या सीतापुर जिल्ह्यांतील बहुतेक जमीनदारांनीं या वेळीं बंडाचा बावटा उभारला होता, हें पूर्वी सांगितलेंच आहे. तालुकदार तहसीलदार वगैरे बादशहाच्या वसुली कामगारांस सीतापुरांत पाऊल टाकण्याची छाती होत नव्हती. या सीतापुरच्या जमीनदारांत महाराज दिग्विजयसिंह हा एक प्रमुख जमीनदार होता. दिग्विजयसिंह फार बलिष्ठ असे सीतापुरचा राजा असेंच लोक त्याला समजत असत व त्याला वचकून वागत. पुढें पुढें हा एवढा बलिष्ठ झाला कीं, अयोध्येचा पहिला बादशहा गाझीउद्दीन हैदर यानें याच्याशीं लढाई देण्यास आपलें बादशाही लष्कर सीतापुर येथें पाठविलें. दिग्विजयसिंहानें बरेच दिवस या बादशाही सैन्यास दाद दिली नाहीं; परंतु शेवटीं तो लढाईत मारला गेला. याचा वाडा मोठा भव्य असून त्याच्या सभोंवार प्रशस्त बळकट तट होता. सीतापुरचा प्रख्यात किल्ला तो हाच.

ह्या किल्ल्याच्या चाऱ्ही बाजूंस मोठमोठीं सिंहद्वारें होतीं. उत्तर दिशेकडील सिंहद्वारें तटाच्या आंत प्रवेश करतांच समोर एक बाजार लागत असे. पश्चिमेच्या बाजूस अनेक देवालयें, मंदिरें, सन्याशांचे मठ, इत्यादि होते. दक्षिण दिशेस नोकरचाकरांची, रयतलोकांची हारीनें सारखीं घरें लागलीं होतीं. किल्ल्याच्या आंतील तो एकंदर देखावा पहातांच हें जणूंकाय एक लहानसें गांवच वसलें आहे, असें भासे. पूर्वेच्या बाजूस सैन्याची छावणी असे. या सैन्याच्या छावणीपासून सुमारें दोनशें कदमांच्या अंतरावर पश्चिमेकडे महाराज दिग्विजयसिंहाची पागा होती. ही पागा अनेक हत्ती, घोडे, गाई प्रभृति जनावरांनीं नेहमी

---

*दुर्दैवाच्या अरण्यांत भ्रमण करीत असताना कोणीतरी अतर्क्य शक्ति दैविक सहाय्य करून मला मार्ग दाखवित असल्याचें नेहमीं आढळून येत होतें.

—सी. ची डायरी.

गजबजलेली असे. ह्या पागेपासून पश्चिमेच्या बाजूस कांहीं अंतरावर एक मोठी हवेली होती. तीत एका भागांत महाराज दिग्विजयसिंहाची कचेरी असून दुसऱ्या भागांत जुनीं दप्तरें ठेविलीं होती व तिसऱ्यांत बॉडिगार्ड व महाराजांचे दुसरे खास नोकरचाकर रहात असत. ह्या हवेलीच्या पश्चिमेस आणखी तिसरी हवेली होती व तीत नाटकगृहाची योजना केली होती. ह्या हवेलीत पश्चिमभागात महाराजांचा दिवाणखाना व दरबार हाल असून उत्तरेच्या बाजूच्या एका भव्य दिवाणखान्यांत अनेक पुतळे व मूर्ति मांडल्या होत्या. बाकीच्या भागांत राजमंदिरातील दासदासी रहात असत. ह्या तिसऱ्या हवेलीच्या मागच्या बाजूस उच दगडी तटानें वेष्टित असा एक रमणीय बगीचा होता. बगीच्याच्या मधोमध पूर्वपश्चिमाभिमुख एक रस्ता असून हा रस्ता वर सांगितलेल्या तिसऱ्या हवेलीच्या आणि राजमहालाच्या सिंहद्वारांच्या समोरासमोर होता. राजमहालाच्या मध्यभागीं प्रशस्त मोकळी जागा सोडून त्याच्या चाऱ्ही बाजूला तिमजली सुंदर हवेल्या बांधल्या होत्या

सांप्रत ह्या राजमहालाची शोभा नष्ट झाली होती. पूर्वीचें वैभव, पूर्वीचा उत्साह, पूर्वीची प्रफुल्लता सांप्रत दृग्गोचर होत नव्हती. संपूर्ण राजमहालावर उदासीनतेची छाया पसरली होती. आपल्या सध्यांच्या मालकाप्रमाणेच या राजमहालानेहि शोकचिन्हे परिधान केलेली दिसत होती महालाच्या डागडुजीकडे कोणाचे लक्ष्य नव्हते मोटमोठे दिवाणखाने अंधकाराने व धुळीने माखले होते. कोठे कोठे तर भिंतीवर रानहि उगवले होतें. तात्पर्य, पूर्वी जे स्थान हास्य उल्हासाचें निवासस्थान असे, त्यानेच आज स्मशानासारखे भयाणरूप धारण केलें होते.

इ. स १८३१ च्या सुरवातीस एके दिवशी काळोख्या रात्री ह्या राजमहालांतील पश्चिमभागच्या भव्य हवेलीत दोघी विधवा स्त्रिया अगदी मंद स्वरांत परस्परांशी कांहीं बोलत एका व्याघ्रचर्मावर बसल्या होत्या जवळच एक पलंग होता, त्याच्यावर रोगानें जर्जर झालेला व ज्याच्या शरीरांतील एकूनएक अस्थि मोजतां येत होत्या असा एक वृद्ध पुरुष निजला होता. वरील दोघी स्त्रिया जवळ जवळ सारख्या उमरीच्या असून त्यांचा तोंडवळाहि एक सारखाच होता. त्यांच्या गोष्टी पुष्कळ वेळपर्यंत चालल्या होत्या. बोलतां बोलतां एकजण ह्मणाली " ताई, इंग्रजांच्या लष्करानं उद्यां किल्यावर हल्ला केल्यास बाबांची काय बरं अवस्था होईल ? त्यांच्यानं तर मुळींच हालवत चालवत नाहीं. आपण

भागीरथीत उडी घेऊन काळजीतून सुटूं ह्मणा, पण बाबांचें काय होईल ? त्यांच्या-बद्दल मला मोठी काळजी पडली आहे. ''

दुसरी ह्मणाली "इंग्रजांनां किल्ल्यांत प्रवेश करतां येऊ नये अशी मी एक युक्ति योजिली आहे !''

"कोणती युक्ति ? ऐकूया तर खरी !''

" आमच्या सैन्यान इथून पांच कोस दूर विजयगज इथ जाऊन इंग्रजांच्या सैन्याशी लढाई द्यावी. या लढाईत आमच्या चिमुकल्या सैन्याचा इंग्रजांच्या अवाढव्य सेनेशीं टिकाव लागणार नाही. आमचं सैन्य खात्रीन पराजय पावून पळत सुटेल, व जिकडे आमचे लोक पळतील त्या बाजूला इंग्रजांचे लोक त्यांनां धरण्यासाठी त्यांच्या माग लागतील. तस झाल ह्मणजे इंग्रज किल्ल्यांत प्रवेश करणार नाहीं. ''

"होय, तूं ह्मणतेस ते खोटं नव्हे. पण त्यांन म्हणजे आपल्या नशिबातली विटंबना टळेल, अस कांहीं मला वाटत नाहीं. इंग्रजाच सैन्य आमच्या सैन्याच्या मागे लागलेलं पहातांच तालुकदार आपल्या लोकांनिशीं किल्ल्यांत घुसून साऱ्या वस्तूंची नासधूस मांडील, त्याचा प्रतिकार आपल्याला कसा करतां येईल ? ''

"पण या तालुकदाराजवळबर असे कितीसे लोक असणार ? आमचे पहाऱ्या-वरील सत्री त्यांनां हां हां म्हणतां हांकून देतील. ''

"समज, तसहि झाल, आमच्या सत्री लोकानी तालुकदाराच्या लोकांस पिटा-ळूनहि लावलं पण मग तालुकदार इंग्रजांच्या सैन्याची मदत घेऊन पुनः किल्ल्यावर चालून आला, तर मग काय करावं ? ''

"तालुकदाराच्या लोकांस आपले संत्री ज्यावेळीं हांकून लावतील त्यावेळीं इंग्रजांचे सैन्य कितीतरी दूर गेलेल असेल. तीन जिल्ह्यांवर स्वारी करण्यासाठी इंग्रजांचं सैन्य आल आहे. तें सगळीकडे एकाच वेळीं कस पुर पडणार ? ''

"हा किनै सगळे आपले तुझ्या मनांतील तर्क आहेत! तसच खरोखर घडून येईल; कशावरून ? मला माझ्या स्वतःविषयीं म्हणाशील तर कांहींच भीति वाटत नाहीं. ते मेले आलेच तर मी गंगेत उडी घेऊन या दुःखांतून आपली सुटका करून घेईन; पण बाबाची ही अशी स्थिति ! बाबांबद्दल मला गडे कांहींच सुचत नाही ! ''

"तुं अशी हताश होऊ नकोस गडे ! अग, आपण जर देवधर्माला भिऊन वागतों आहों, तर तो अनाथनाथ सीतापति या संकटांत आमची उपेक्षा करील

असं कां तुला वाटतं? तूं मुळींच काळजी करूं नकोस! संकटसमयी तोच आमच्या सहाय्यास धावून येईल व योग्य मार्ग दाखवील!"

दुसऱ्या स्त्रीचें हें धैर्याचें भाषण ऐकून पहिली स्त्री नतर कांहीं बोलली नाहीं. तथापि तिच्या त्या वेळच्या मुद्रेवरून तिची चिंता दूर झाल्याचें दिसत नव्हतें. जणूं काय त्रासित, भीत चित्तानें ती मनातून ईश्वराचा धांवा करित आहे, असें दिसलें. दुसरी स्त्री पुढे ह्मणाली "माझं मन तर मला स्पष्ट सांगत आहे कीं, ह्या जुलमी लोकांपासून खात्रीनें आपण बाबांचं रक्षण करण्यास समर्थ होऊं; त्याबद्दल तू मुळींच चिंता करूं नको! बाबा जर पूर्वीच इकडे येण्याला कबूल झाले असते, तर मानकुमारीची अशी दशा मुळींच होतीना! महाराजांच्या मृत्युकाळीं माझा सती जाण्याचा अगदीं निर्धार झाला होता केवळ बाबांच्यासाठीं मी जगलें. तुं परमेश्वराचें एकनिष्ठेन स्मरण कर, या संकटांतून खात्रीनं तो आपलं रक्षण करील!"

"परमेश्वराशिवाय आतां आह्मांला कुणाचा आसरा आहे? तरीहि संकटाच्या निवारणाचा जो कांहीं उपाय योजावयाचा तो अगोदरच योजून ठेवणं चांगलं. कारण, आयत्यावेळीं मन भांबावून जातं."

यावर दुसरी स्त्री किंचित् हंसून ह्मणाली "कसंहि संकट आलं तरी मी त्यावेळीं भांबावून जाणार नाहीं!"

परंतु हें हास्य पहिल्या स्त्रीला रुचलें नाहीं. ती किंचित विरक्त स्वरानें ह्मणाली "ताई, ही विनोदाची का वेळ आहे? समोर शत्रु येऊन उभा आहे अन् अशा प्रसंगींहि तुला हास्य सुचतं?"

दुसरी स्त्री ह्मणाली "मी विनोद करित नाहीं नी हंसत पण नाहीं. खरोखरच सांगते, संकटाचे वेळीं मी मुळींच डगमगायची नाही!"

"तुझं अ पलं कांहींच्या बाहींच हें बोलणं! संकटाच्या वेळीं मनुष्याची बुद्धि कधींहि स्थिर रहाणार नाहीं!"

"कांहींच्या बाहीं मी आजपर्यंत केव्हांहि बोलल्ये नाहीं व पुढेंहि बोलणार नाहीं माझी ती अत्यत आश्चर्याची गोष्ट आहे खरी, ती सांगतल्यावर तुला खरीसुद्धां वाटणार नाहीं, माझ्या सांगण्यावर कदाचित् तुझा विश्वासहि बसणार नाहीं—"

"पण काय ते सांग तर खरी!"

"ते ऐकून तूं काय करणार?"

"ऐकून जिवाला अम्मळ धीर तरी वाटेल."

पहिल्या स्त्रीचा अतिशयच आग्रह पाहून दुसरी स्त्री ह्मणाली " तर मग सांगत्यें, ऐक. तिकडून देवलोकीं गेल्या दिवसापासून वारंवार मी एक अद्भुत चमत्कार या महालांत पहात आहे ह्या अद्भुत गोष्टींतील गूढ काय आहे हें मला अद्यापि समजलें नाहीं, तथापि ती गोष्ट घडत असते हे मात्र खरं आहे. तिकडे युद्धांत पडल्याचे भयंकर वर्तमान ऐकतांच मी शोकानं अगदीं विव्हळ झाल्यें होत्यें; तिकडच्या स्वारीबरोबर सहगमन करून आपल्या दुःखाचा अंत करावा असा मी मनाचा निर्धार केला होता; परंतु काय आश्चर्य सांगावें! अकस्मात कुणी देवता माझ्यासमीप उभी राहिली व मीं माझा तो विचार रहित करावा ह्मणून नाना प्रकार मला बोधाच्या गोष्टी सांगू लागली. ती देवता शेवटीं मला ह्मणाली 'दुसऱ्याकरतां राहो, परंतु तुझ्या पित्यासाठीं तरी तू देहत्याग करूं नकोस! तुं सती गेल्यास तुझ्या पित्याची दुर्दशा होईल.' त्या देवतेची आज्ञा उल्लंघन करण्यास मी अगदीं असमर्थ झाल्यें पुढे दोन वर्षांपूर्वी असाच प्रकार घडला. बादशहाचें सैन्य रयतला पीडण्यासाठीं या बाजूस आलं होतं. त्या काळपुरुषांच्या असह्य छळास भिऊन आमचे लोक पळून गेले. बचण्याचा दुसरा कांहींच उपाय राहिला न ल्यामुळं मीं त्यावेळीं धर्मरक्षणासाठीं भागीरथींत उडी घेतली; परंतु बेशुद्ध स्थितींत मला इथं कुणी पुन्हा आणून ठेविलें ते ही घटकापर्यंत मला ठाऊक नाहीं! शुद्धीत आल्यावर मला कळून आलं कीं, मीं महालांतील आपल्या खोलींत निजल्यें आहे. महालांतील एकूनएकांस मी खोदखोदून विचारलं कीं, मीं नदींत उडी घेतली होती, तिथून उचलून मला इथं कुणी आणलं? परंतु कुणाकडूनहि याबाबतींत कांहींच सुगावा लागला नाहीं. यानंतर नाना प्रसंगांचे वेळीं जेव्हां जेव्हां मी अगदीं हतबुद्ध होत असें, व संकट निवारण्याचा कांहींच मार्ग न सुचल्यामुळं चिंताव्याकुळ होऊन माझं मन अगदीं अस्वस्थ होत असे, त्या त्या वेळीं माझा किंचित् डोळा लागतांच तीच देवता मला दर्शन देई व उद्धाराचा मार्ग सुचवी. त्या देवतेच्या सदुपदेशानंच आजवर सर्व विपत्तींतून मुक्तता करून घेण्यास मी समर्थ झाल्यें आहे. आजहि आपल्यावर तसाच घोर प्रसंग आल्यामुळं माझं मन अगदीं अस्वस्थ झालं होतं. सकाळपासून मला भूकतहान सुचत नव्हती स्नान करून मी सीतारामाच्या मंदिरांत रामनामाचा जप करित बसल्यें होत्यें. पोटांत पळीभरहि पाणी गेलं नसल्यामुळं जप करतां करतां माझा किंचित् डोळा लागला. लगेच ती देवता माझ्या

समोर येऊन उभी राहिली. माझ्या पाठीवरून हात फिरवित आश्वासनाच्या शब्दांनी ती मला म्हणाली ' बेटा भिऊ नको ! प्रभु रामचंद्र या संकटांतून तुझा मुक्तता करील. उद्यां सायंकाली इग्रजांचे सैन्य विजयगंज येथे येईल. यासाठीं तु आपल्या सैन्यासह स्वत: तेथें जा व इग्रजाच्या सैन्याला अडवून धर. तुझे लोक पलायन करूं लागतील, तेव्हां त्यांनां उत्तरेकडे पळण्यास सांग. '

पहिली स्त्री साश्चर्याने वरील हकीगत ऐकत होती. परंतु आपली बहीण सैन्य घेऊन स्वत: समरांगणावर जाणार आहे हे तिच्या तोंडचे शब्द कानीं पडतांच ती भयचकित होऊन मध्येच ह्मणाली " ताई, मग तू स्वत: सैन्य घेऊन जाणार ? ते कधीहि व्हायचं नाहीं. कांहीहि झालं तरी तुला मी तिकडे केव्हाहि जाऊं द्यायची नाही. त्या मुसलमान फिरंगी दुष्ट राक्षसांच्या तांवडींत तू सापडलीस तर ते चांडाळ तुझी कोण विटंबना करतील ? त्या अधमांपासून तुला अब्रूच रक्षण करतां येण शक्य तरी आहे का ? "

यावर दुसरी स्त्री गभीर स्वराने ह्मणाली " कांहीं होवो, मी स्वत: सैन्य घेऊन जाणार ! देवतेची आज्ञा कधीहि उल्लघन करणार नाही ! "

पहिली स्त्री ह्मणाली " तू जी स्वप्नांत तुला कुणी देवता दर्शन देत असते ह्मणतेस, तो तुझा निवळ भ्रम आहे ! अग हे सारे स्वप्नातले चाळे आहेत. आपल्याला तसा भ्रम होतो खरा, परंतु त्यांत कांहीं अर्थ नाहीं ! "

" पहिल्या पहिल्यान मलाहि असच वाटत होतं. परतु आतां माझी खात्री होऊन चुकली आहे की, सकटांतून उद्धार करण्याकरितां कुणीतरी देवता मला दर्शन देते ! मला वाटत, परलोकी गेलेला कुणीतरी आपला शुभेच्छु महात्मा देवतेच्या पदास पोहोचला असेल व तोच दयाकरून आह्मांला संकटांतून सोडविण्यासाठी धावून येतो. तस जर नसत तर सांप्रत चोर, दरवडेखोर, ठग, पुंड यांनीं एकीकडे हाहाकार उडविला आहे, तर दुसरीकडे खुद्द बादशहा रयतेवर घोर अत्याचार करित आहे. अशा या भयकर आपत्तीच्या दिवसांत आपणा अनाथांच रक्षण कस झाल असतं ! त्या देवतेवांचून आमचं रक्षण दुसऱ्या कुणी केल असतं कां ? अशा या अनर्थामध्ये आपण घटकाभर तरी का सुरक्षित राहिलो असतो !

पहिली स्त्री ह्मणाली " होय, तू ह्मणतेस तेहि खोटं नव्हे; जर खरोखरच कुणी परलोकवासी देवता तुला स्वप्नांत दर्शन देत असेल तर खचीत ती आपली परमपूज्य माताच असली पाहिजे ! आईवांचून एवढा स्नेह कोण करणार आहे ? आईची तुझ्यावर फार प्रीति होती; तीच तुला भेटत असेल ! "

" मीहि पहिल्यानं त्या देवतेला आईच समजत होत्ये, परंतु ह्या देवतेचा वेष स्त्रीचा नसून पुरुषाचा असल्यामुळं माझी ती शंका पुढं नाहींशी झाली. "

" तर मग हा तुला कांहीं तरी भास होत असेल ! आई असती, तर मीं खरं मानलं असतं. आपल्या सच्चरित्र आईला सारे लोक कलियुगांतली सीता समजत असत. परलोकीं गेल्यावर खात्रीनं ती देवपदास पोंचली असेल. आपल्या संतानांचं दुःख पाहून संकट समयीं धांवून येत असेल, असं मला वाटलं होतं. "

" ती आई तर नव्हेच ! "

" तरमग कोण ? तुझा पति कीं काय ! "

" नव्हे ! तिकडची मूर्तिहि खास नव्हे ! ते जर असते, तर मीं केव्हांच ओळखलं असतं. तिकडच्या पायाचं नुसतं नख पाहूनसुद्धां मी तिकडे तेव्हांच ओळखलं असतं ! "

" मग तुला नदीच्या पात्रांतून उचलून या महालांत कुणी आणून ठेविलं ? "

" यांतील कांहींच रहस्य मला कळत नाहीं. एकदा नव्हे, दोनदा नव्हे, प्रत्येक संकटाचे प्रसंगीं ही देवता मला दर्शन देते. "

मग तुला मी एक युक्ति सांगत्यें, तूं असं कर. सीतारामाच्या मंदिरांत जाऊन धरणं घेऊन बैस. जितके दिवस ही देवता आपली ओळख देणार नाहीं, तितके दिवस तूं मंदिरांत रामाच्या पायापाशीं उपाशीं पडून रहा. ओळख देई-पर्यंत तिथून उठूं नकोस ! "

" हें तूं का मला शिकविलं पाहिजेस ? मी तसं धरण धरून बसल्येहि होत्ये, परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. कांहीं तरी तसंच भयंकर संकट उपस्थित झालं तरच ही देवता दर्शन देते अन्य प्रसंगीं कितीहि प्रयत्न केले तरी त्याचा कांहींच उपयोग होत नाहीं. दर्शन घडत नाहीं. "

" असंच खरोखरी असेल तर, मग हा निःसंशय तुझ्या बुद्धीचा भ्रम आहे! कांहीं झालं तरी तुला मी सैन्य घेऊन विजयगड इथं जाऊं देणार नाहीं ! "

" मी तर जाणारच ! माझा निश्चय प्राणांतीहि ढळायचा नाहीं ! "

" बाबाला हें तुझं करणं रुचेल का ? "

" बाबाला हें मुळीं कळवूंच नये, म्हणजे झालं. "

" बरं, बाबांला नाहीं कळविलं; पण समज, तूं शत्रूच्या हातीं सांपडलीस तर मग इकडे बाबांची काय अवस्था होईल ? "

" माझ्या केसालाहि शत्रु धक्का लावूं शकणार नाही! मी सुरक्षितपणं परत येईन. स्वप्नांत दर्शन देणाऱ्या देवतेच्यां वचनावर माझा पूर्ण भरवसा आहे. "

" पण मला तर बाई मोठ भय वाटतं. तूं गडे अशी ही आगींत उडी घेऊं नकोस ! "

"तू कसलीच भीति बाळगू नकोस देवतेचं वचन केव्हांहि मिथ्या व्हावयाचं नाही!"

" तुझी बुद्धि ठिकाणावर नाहीं हेच खास ! स्वप्नांत तुला काहीतरी भास होत असेल, अन् त्याला तू देवता समजत असशील. ताई, ही जर खरोखरच देवता असती, अन् आमच्या कल्याणाची तिला एवढी कळकळ असती, तर तिनं मानकुमारीचं रक्षण कसं बरं केलं नाहीं ? "

" शत्रूच्या घरी मानकुमारी निर्भय आहे ! "

" उगाच तुला ही भ्राति आहे! आपल्या पातिव्रत्याचं रक्षण करतांना खात्रीनं मानकुमारीनं आत्महत्या केली असेल ! "

यावर दुसरी स्त्री ह्मणाली " मानकुमारीनं आत्महत्या केली नाही. ती सुरक्षित आहे. मानकुमारीच्या शोकानं मी अत्यत व्याकुळ होऊन सीतारामाच्या मंदिरांत निराहारानं पडल्ये होत्ये. सीतापतीला करुणा येऊन त्यानं जर माझी मानकुमारी मला पुन: आणून दिली नाहीं, तर त्याच्या चरणांवर मस्तक आपटून प्राणत्याग करण्याचा मीं अगदी कृतसंकल्प केला होता. मृत मनुष्यांचा शोक थोडाबहुत सहन करवतो, परंतु जीवत माणसाचा शोक मनुष्याच्यानं मुळींच सहन करवत नाहीं ! सतत तीन दिवस आणि तीन रात्री मी सीतारामाच्या मंदिरांत निराहारानं पडल्यें होत्ये. चौथ्या दिवशी ह्या देवतेनं मला दर्शन देऊन किंचित् कठोर स्वरानं ह्मटलं 'नारायणकुमारी ! तूं असा त्रागा कां करतेस ? मानकुमारी निर्भय आहे. तिच्या केसासहि धक्का न लागतां ती सिंहाच्या गुहेतून, वाघाच्या जबड्यातून सुरक्षितपणें परत येईल ! पुण्यवती सती जनकदुहिता सीतादेवीनें राक्षसकुलाचा नाश करण्यासाठीं अवतार घेतला होता; तशीच अयोध्येतील मुसलमान लोकांचें राज्य नष्ट करण्यासाठी मानकुमारी जन्मास आली आहे.' परतु ह्या सांगण्यानं माझ्या मनाची शांति झाली नाही. मी त्या देवतेचे चरण घट्ट धरून म्हटलं ' देव ! आपण खरोखरच सीतापति आहां. आपण सर्वांतर्यामी आहां. माझी मानकुमारी कुठं आणि कशा स्थितींत आहे हे कृपा करून मला सांगा.' माझ्या या विनंतीनं देवता कपाळास आठ्या चढवून म्हणाली ' आज अयोध्यानाथ इकडे येईल. मान-

कुमारीचे सविस्तर वर्तमान तो तुला सांगेल, परतु काशीनाथाबद्दल मात्र व्यग्र होऊ नकोस ! ' असे म्हणून ती देवता तत्क्षणीं अंतर्धान पावली. ताई, काय आश्चर्य सांगू ! त्याच दिवशी संध्याकाळीं अयोध्यानाथ माघारा आला. त्यान आणिलेल्या बातमीवरून कळल कीं, मानकुमारी दरवडेखोराच्या हाती लागली नसून राजा दर्शनसिहाचे लोक तिला पजाबांत घेऊन गेले आहेत. "

पहिली स्त्री मध्येच म्हणाली " नबाबाच्या लोकांनीच मानकुमारीला नेल असावं, असं मला पहिल्यापासूनच वाटत होत दरवडेखोरलोकांनां दागदागिने, पैसा सपत्ति सोडून केवळ तिलाच नेऊन काय लाभ आहे ! पण दादा अद्याप जिवंत आहे म्हणतेस ? "

" मला वाटतं, दादा आत्महत्या करू शकला नसावा. ज्या देवतेन नदीतून मला वांचविल, तिनच दादाचाहि रक्षण केलं असाव. "

" मग बाबांनां तू ही गोष्ट अजून कां नाही सांगितलीस ? "

" ह्या साऱ्या आश्चर्यकारक गोष्टीतील रहस्य मलाच बरोबर कळलेल नाहीं, मग मी बाबांनां तरी काय सांगू ? "

" अयोध्यानाथाच्या कानांवर ही गोष्ट घालावी. त्याला सर्व शास्त्रं अवगत आहेत. यांतील गूढ कदाचित् त्याला उकलता आल तर येईल. "

" हळू बोल. बाबा जागे झाले वाटत. "

पहिल्या स्त्रीच्या मुखातून " अयोध्यानाथ ' हा शब्द निघतो न निघतो इतक्यांत पलंगावर निजलेला वृद्ध पुरुष जागा झाला. अयोध्यानाथाचे नाव ऐकतांच त्याने विचारले " आला का अयोध्यानाथ ? काय खबर घेऊन आला ? "

त्या वृद्ध पुरुषाच्या तोडचे ते शब्द ऐकतांच पहिली स्त्री एकदम उठून पलंगाजवळ गेली व रोग्याच्या शेजारी बसून हलक्याच्या हातांनीं त्याचे पाय दाबित म्हणाली ' नाहीं बाबा अयोध्यानाथ अजून आला नाही. "

हें ऐकताच म्हाताऱ्यानें एक दीर्घ श्वास टाकला व तो स्वस्थ पडला.

## प्रकरण ७ वें.

## जगन्नाथशास्त्री.

* "Sitapoor ! Thou art true to thy name ;
Thine women are real incarnation of Sita"

—*C.'s Diary.*

मागील प्रकरणांत ज्या दोघी विधवा स्त्रियांचा संवाद दिला आहे, त्यांच्या विषयींचा उल्लेख यापूर्वी करतां आला नसल्यामुळे पहिल्याने वाचकांस त्यांचा अल्प परिचय करून देणें आवश्यक आहे.

जगन्नाथशास्त्री ह्मणून सीतापुरांत एक प्रसिद्ध जमीनदार रहात होता. त्याला तीन मुलगे होते. अयोध्येचा वजीर असफ-उद्-दौला याच्या कारकीर्दीत रेसिडेंटच्या शिफारशीनें जमाबंदीच्या कामावर असलेला कर्नल हॅने ह्याने राज्याचा महसूल वसूल करतांना रयतेवर जो भयंकर जुलूम मांडला होता, त्या धामधुमीत ह्या कर्नलच्या सैन्याने जगन्नाथशास्त्र्याच्या थोरल्या व मधल्या मुलांचा वध केला. जगन्नाथाच्या दोन्ही सुनांनीं आपल्या पतिबरोबर सहगमन केले. पुत्रशोकाच्या असह्य दुःखामुळें जगन्नाथाच्या वृद्ध स्त्रीनेहि लवकरच प्राणत्याग केला. या प्रकारें आपले दोघे करते-सवरते मुलगे, प्रिय पत्नी, दोघी तरुण सुना, यांचा अकालीं अंत झालेला पाहून जगन्नाथशास्त्र्याला परमावधीचे दुःख झाले व त्या दुःखाच्या आणि संतापाच्या भरांत तो आपला धाकटा मुलगा गंगाप्रसाद व त्याची चौदा वर्षांची पत्नी भानुमती यांनां घेऊन काशीस पळून गेला. सीतापुर येथील आपली विस्तृत जमीनदारी, हवेली, व इतर संपत्ति याची व्यवस्था पाहण्याचें काम त्यानें एका विश्वासू नोकरावर सोपविलें होते.

जगन्नाथशास्त्री हा आधीच अत्यंत सदाचारी आणि धर्मनिष्ठ होता. संसारांतील घोर दुःखांनी पीडिल्यामुळें सांप्रत तो विरक्त होऊन काशीस येऊन राहिला होता. तेव्हां साहजिकच काशींत तो आपला सारा वेळ संसारत्यागी संन्यासी, बैरागी वगैरे साधुपुरुषांच्या संगतींत घालवू लागला सीतापुर येथे असतांना आपला थोडा-

---

* हे सीतापुर ! खरेंच, अद्याप तूं आपल्या नांवास जागत आहेस. तुझ्या कन्या दुसऱ्या सीताच आहेत ! —सी. ची डायरी.

बहुत तरी वेळ त्याला जमीनदारी, देवघेव इत्यादि प्रापंचिक विषयांत घालवावा लागे; परंतु काशीमध्यें त्याला साधुसमागम आणि ब्रह्मचिंतन वर ग्रंथांचें पर्यालोचन यांशिवाय दुसरे कोणतेच काम नव्हते. सीतापुरहून त्यानें बरीच संपत्ति आणली होती, व तिचा तो सढळ हातानें परोपकाराचीं आणि लोककल्याणाची कामें करण्याकडे उपयोग करित असे. जगन्नाथाचे घर साधु, बैरागी वगैरे लोकांनी सदासर्वदा भरलेले असे.

आपली एकुलती एक सद्गुणी सून भानुमति इच्यावर जगन्नाथशास्त्री अत्यंत प्रेम करी भानुमतीहि आपल्या पूज्य सासऱ्याची व तो नेहमीं आपल्या घरीं मोठ्या भक्तीने घेऊन येत असलेल्या साधुसंतांची शरीराला कष्टवून जीवापाड सेवाशुश्रूषा करित असे. कितीहि श्रम पडोत, कसेहि कष्ट होवोत, भानुमतीचें मुख नेहमीं प्रफुल्ल असावयाचे. सासऱ्यासाठीं कष्ट सोसण्यांत तिला एक प्रकारचे सुखच वाटत असे. तिचें कोणतेंहि काम पाहिले तरी त्यांत तिचा आत्मत्याग आणि दुसऱ्याला सुख देण्याविषयी जीवापाड प्रयत्न स्पष्टपणे दिसून येत असत. आपल्या स्वतःच्या सुखाकडे, कपड्यालत्त्यांकडे, एवढेच नव्हे तर खाण्या-पिण्याकडेसुद्धां तिचे लक्ष नसे. सासऱ्याची सेवाशुश्रूषा करण्यांत आणि अतीत-अभ्यागतांचा परामर्ष घेण्यांत आपल्या हातून यत्किंचितहि कसूर होऊं नये, या एका गोष्टीचाच काय तो तिला रात्रंदिवस ध्यास लागलेला असे आपल्या सुनेचे हें आचरण पाहून जगन्नाथशास्त्र्याला परम संतोष वाटे. परंतु त्याचा पुत्र गंगाप्रसाद याला आपल्या वडिलांस लागलला हा साधुसंतांचा नाद फारसा आवडत नव्हता. केव्हांकेव्हां बापलेकांत या बाबतींत खडाजंगी उडत असे. भानुमतीला या साधुसंतांच्या अहारादिकांची व्यवस्था करण्यांत अतिशय कष्ट होत. सायंकाल होईपर्यंत केव्हां केव्हां तिला बिचारीला पळभर पाणी पिण्याला देखील अवसर सांपडत नसे; व हें जरी ती अंतःकरणापासून आणि मुळींच न कुरकुरतां करी, तथापि गंगाप्रसादाला हें रुचत नसे, पत्नीलाहि तो या बाबतींत रागें भरे व वडिलांनांहि दोष देई गंगाप्रसाद एरव्हीं फारच चांगल्या वर्तनाचा होता. त्याच्या चरित्रांत कसलाच दोष नव्हता; परंतु साधुसंताविषयीं त्याचे चांगलेसें मत नव्हत व त्यांच्याविषयीं त्याच्या मनांत आदरहि नव्हता. एक दिवस वडिलांस त्याने स्पष्टपणें सांगितलें की " आपण ह्या ढोंगी भोंदू लोकांस घरदार लुटून देत आहां, हें ठीक नव्हे. मला हे मुळींच पसंत नाहीं ! "

आणि खरें पाहूं गेलें असतां जगन्नाथशास्त्र्याकडे पुख्खा झोडण्यास जमणाऱ्या या साधुसंतांत सर्वच साधु असत असें नाहीं. केवळ पोट भरण्यासाठींच साधूचा वेष धारण करणारे भोंदूहि त्यांत अनेक असत. परंतु जगन्नाथशास्त्री अति धार्मिक होता. त्याच्याजवळ कोणीं याचना केल्यास तो कोणालाहि विन्मुख करित नसे आणि ह्या त्याच्या भलेपणाचा लाभ घेऊन बरेच स्वार्थ साधु भोंदु याला लुबाडित होते. जगन्नाथाला ही गोष्ट ह्मणजे कळत नव्हती, असें नव्हे; परंतु त्याचे अतःकरण उदार असल्यामुळे खऱ्या साधूंचीहि तो सेवा करी, भोंदूलाहि संतुष्ट करी. परतु रोजरोज पुत्रांशीं वाद घालीत बसणे त्याला प्रशस्त वाटेना ह्मणून त्यानें संसारातुन मुक्त होऊन वानप्रस्थ आश्रम स्वीकारण्याचा विचार केला. भानुमतीला सासऱ्याचा हा विचार कळतांच तिने रडून रडून एकच अकांत केला. आपल्या सुनेसाठींच जगन्नाथशास्त्री अद्याप काशीहून गेला नव्हता. तिची मर्जी मोडणे त्याला कठीण वाटत होते. याप्रमाणें कांहीं वर्षे गेलीं.

इ. स. १७९७ त नबाब असफ-उद्-दौला मृत्यु पावला व त्याचा भाऊ सादत अल्ली अयोध्येचा अधिपति झाला. सादत अल्ली हा बदिवासांत असतां काशी येथें होता या वेळीं गंगाप्रसादाचा सादत अल्लीशीं बराच स्नेहसंबध जुळुन आला. सादत अल्लीने गगाप्रसादाकडून वेळोवेळी बरेच कर्जेहि घेतले होतें. सांप्रत आपला मित्र सादत अल्ली गादीवर बसल्यामुळे गंगाप्रसाद पुनः सीतापुर येथे सहपरिवार जाऊन राहण्याविषयीं पित्याला आग्रह करूं लागला. परंतु जगन्नाथशास्त्री कांहीं केल्या सीतापुरास जाण्यास संमत होईना. तो गगाप्रसादास ह्मणाला " अयोध्येच्या प्रजेच्या दैवीचे हाल कधींहि टळावयाचे नाहींत. म्लेंच्छ इंग्रज व्यापाऱ्यांचा ज्या देशांत पाय पडला, त्या देशातील लोकांचें स्वातंत्र्य, संपत्ति, नष्ट होणारच. लोकांचे हाल अत्याचार, अन्नकष्ट कधींहि दूर व्हावयाचे नाहींत. "

" सादत अल्ली हा फार चागल्या स्वभावाचा नबाब आहे. त्याच्या कारकिर्दींत प्रजेवर जुलुम व्हावयाचा नाहीं. शिवाय, माझी त्याची फार मैत्री आहे. आपला भाग्यकाळ उदयास येईल. आपण पुनः स्वदेशीं जाऊ, " वगैरे प्रकारें पित्यास सांगून गंगाप्रसाद सीतापुराला जाण्याचा अगदीं हट्टच घेऊन बसला. जगन्नाथशास्त्र्यानें पुत्राला नाना प्रकार समजाऊन पाहिलें, परंतु त्यानें कांहीं आपला हेका ह्मणून सोडला नाहीं. पत्नीला घेऊन सीतापुर येथें जाण्याची त्यानें तयारी देखील केली. काशींत असतां गगाप्रसादाला एक मुलगा झाला होता. सांप्रत तो दोन वर्षांचा झाला होता.

हा मुलगा काशींत जन्मल्यामुळें जगन्नाथशास्त्र्याने त्याचें नांव काशी नाथ असे ठेविलें होते. काशीनाथ सदासर्वदा आजोबांजवळच असे. भानुमति बिचारी मोठ्या अडचणींत सांपडली. इकडे पतीचा सीतापुराला जाण्याचा तर निश्चय झालेला व श्वशुर कांही केल्या सीतापुराला जाण्यास संमत होईनात ! सासऱ्यास एकटें टाकून जाणें अर्थातच त्या सद्वृत्तेनी सुनेला योग्य वाटेना. काशीनाथाला सासऱ्याच्या मांडी-वर बसवून जगन्नाथशास्त्र्याचे घट्ट पाय धरून तीं रुदन करित म्हणाली " आपण आम्हांला टाकू नका ! आपऱ्याला पाहिलं नाहीं तर बाळ घटकाभरसुद्धां रहाणार नाहीं थोड्या दिवसांकरितां तरीं आपण सीतापुराला आलंच पाहिजे !"

परतु जगन्नाथाचे यावेळीं आत्मिक उन्नतिसबंधाचे विचार बरेच प्रगल्भ झाले होते. ससाराच्या मायेचा परित्याग करण्यास तो समर्थ झाला होता. नाना प्रकारें सुनेला उपदेश करून त्याने ह्या प्रसंगीं ससारबधनातून मुक्त होण्याचा दृढनिश्चय केला, पुढें गंगाप्रसाद, भानुमति आणि काशीनाथ यांनां घेऊन सीतापुराला गेला. वृद्ध जगन्नाथशास्त्रीहि तत्क्षणीं काशीविश्वनाथाला नमस्कार करून एका बुद्ध श्रमणाबरोबर हिमालयांत निघून गेला. यानतर जगन्नाथाचे त्याच्या पुत्राला किंवा सुनेला केव्हांहि दर्शन झाले नाही आमच्या कथानकाच्या काळीं जगन्नाथशास्त्री ह्या पृथ्वीवर होता अगर तो जिवन्मुक्त झाला होता, हेहि कोणाला ठाऊक नव्हते. आपल्या वयाच्या ब्याण्णवदाव्या वर्षी जगन्नाथशास्त्र्यानें संसारांतील मायेचा त्याग केला.

इकडे गंगाप्रसाद सीतापुरला जाऊन आपल्या वडिलार्जित जमीनदारीची व्यवस्था पाहू लागला सीतापुराला आल्यावर दोनतीन वेळ तो लखनौ येथे जाऊन नबाबाला भेटला होता. सादत अली काशीत असतांना गंगाप्रसादानें त्याला बऱ्याच वेळां पैशाचें सहाय्य केलें होतें- नबाबानें हे पूर्वीचे उपकार स्मरून गगाप्रसादाची जमीनदारी व जहागिरी दुप्पट वाढविली व त्याचा दर्जाहि वाढविला. असो.

बरींच वर्षें गगाप्रसादानें आपल्या जमीनदारीचा आणि वैभवाचा निर्विघ्नपणें उपभोग घेतला. सीतापुर येथें आल्यावर त्याला तीन कन्यारत्नांचा लाभ झाला. त्याच्या वडील कन्येचें नांव नारायणकुमारी, मधलीचे नांव चांदकुमारी आणि सर्वांत धाकटीचें नांव मानकुमारी असें होतें. नारायणकुमारी अकरा वर्षांची होतांच. सीतापुर येथील प्रसिद्ध ब्राम्हण जमीनदार महाराज दिग्विजयसिंह याच्याशीं मोठ्या समारंभानें तिचा विवाह झाला. पुढें दोन वर्षांनीं दुसऱ्या एका तशाच

प्रसिद्ध जमीनदाराचा पुत्र राजा हरपालसिंह याच्याबरोबर चांदकुमारीचा विवाह झाला. चांदकुमारीच्या विवाहाच्या वेळींच गंगाप्रसादाने निश्चित केल होतें कीं, आतां दोनतीन वर्षांनी जेव्हां आपण मानकुमारीचे लग्न करूं, त्याचवेळीं आपला मुलगा काशीनाथ याचाहि विवाह उरकून घ्यावा. म्हणून हल्लींपासूनच तो काशीनाथासाठीं एखादी अनुरूप वधु शोधण्याच्या प्रयत्नास लागला. परंतु मनुष्याचे सर्वच बेत जर सिद्धीस जाते तर मग जगांत दुःख कां रहातें ?

काशीनाथ हा अगदीं आपल्या आजाच्या वळणार गेला होता. बाळपणापासुनच त्याचा अगदीं निरीच्छ आणि शांत स्वभाव असे. सदासर्वदा परोपकार आणि परसेवा करण्यांत काशीनाथ गढलेला असे. स्वसुखाकडे किंवा स्वकल्याणाकडे त्याचें लक्ष नव्हते. आपल्या विवाहाचा विचार चालला आहे असे त्याला कळतांच लग्न करण्याची आपली इच्छा नाहीं असें आईपाशीं त्यानें स्पष्ट सांगितलें आाण तिला असेंहि बजाविलें कीं, आपल्याला न जुमानतां तुम्ही जर बळजबरीनें माझा विवाह करण्याचें योजाल तर मा पळून जाईन !

काशीनाथाचे असे विचार व्हावयाला अनेक कारणे होतीं सीतापुर येथ आल्या दिवसापासून भानुमति सदासर्वदा आपल्या वंदनीय सासऱ्याचे गुणानुवाद गात शोकाकुल होऊन रुदन करित असे. सासऱ्याचा शोध करण्यासाठीं चोहींकडे माणसें पाठविण्याविषयी ती गंगाप्रसादाची वारंवार विनवणी करी. हा सारा प्रकार काशीनाथ पहात होता. आईकडून त्याला आपल्या आजोबांचें पवित्र वर्तन, दया, स्नेह, धर्मावरील त्यांची श्रद्धा, परोपकार इत्यादि गुणांचें वर्णन वारंवार ऐकूं येत होतें. त्याचप्रमाणें आजोबा आपल्याला नेहमी पोटाशीं घेऊन आपल्यावर मनस्वी प्रेम करित असत, आपण क्षणभर जवळ नसलों म्हणजे त्यांची अगदीं वेड्यासारखी अवस्था होई, हें त्यानें आईकडून ऐकिले होतें व या सर्व कारणांमुळें काशीनाथाच्या मनात आपल्या आजोबाविषयी विलक्षण आदर, श्रद्धा, व भक्ति उत्पन्न झाली होती. मह्य सती भानुमति केव्हांहि पतिनिंदा करित नसे खरी, परंतु सासऱ्याचें जे ती वरचेवर गुणानुवाद गात असे त्याच्या अगदीं विरुद्ध गंगाप्रसादाचे वर्तन काशीनाथ पहात असल्यामुळें अर्थातच त्याला त्यांतील अंतर कळून आले होतें व त्यामुळें पित्यावरील त्याची श्रद्धा उडून गेली होती.

काशीनाथ बाळपणीं नेहमीं म्हणत असे कीं, आपले आजोबा खात्रीनें जिवंत आहेत, केव्हां ना केव्हां त आपण होऊनच स्वदेशी परत येतील. तो पंधरासोळा

वर्षांचा होतांच गांवांतील जोतिषी, भूतभविष्यज्ञानी इत्यादि लोकांच्या नादीं लागला व आपले आजोबा जिवंत आहेत की नाहीत ? असल्यास ते कुठे आहेत ? परत केव्हां येतील ? इत्यादि संबंधी प्रत्येकापाशीं विचारपुस करूं लागला. काशीनाथाच्या वयास वीस वर्षे पुरी होण्याच्या पूर्वीच भानुमति त्याला सोडून परलोकीं गेली. मानकुमारी या वेळी नऊ वर्षांची होती भानुमति निवर्ततांच गंगाप्रसादानें काशीनाथाला लग्न करून घेण्याबिषयीं फारच आग्रह चालविला. परंतु काशीनाथ कांही केल्या त्या गोष्टीस संमत होईना दिवसेंदिवस तो पित्याशीं बेपर्वाईनें वागूं लागला. एक दिवस तर त्याने पित्याला स्पष्टपणे सांगितलें कीं "विवाह करण्याचा आपला मुळीच विचार नाही. आपल्याला वारवार या बाबतीत त्रास झाल्यास आपण घरांतून निघून जाऊं !"

काशीनाथाच्या या धमकीने बिचारा गंगाप्रसाद भिऊन गेला. त्याला काय करावे हें सुचेना. नंतर लग्नाविषयीं पुत्राला आग्रह करण्यास तो धजला नाहीं. नेहमी एकांतांत बसून तो कपाळ बडवून आपल्या अदृष्टास दूषण देत शोक करित म्हणे "मीं आतां आपल्या नशिबास तरी बोल कां लावावा ! माझ्या पापाचीं हीं फळे याच जन्मांत मला भोगावीं लागत आहेत. मीं माझ्या वडिलांनां जुमानले नाहीं, त्यांच्या उपदेशाप्रमाणे कधीं वागलों नाहीं. वेळोवेळीं त्यांच्या मनास कष्ट दिले त्या पापांचें फळ मी आज भोगित आहें! माझा पुत्र माझी अवज्ञा करित आहे !"

इकडे काशीनाथ तर दिवसेंदिवस अधिकाधिक विरक्त होत चालला. सदासर्वदा तो आपला सन्याशी, बैरागी, गोसावा, वगैरे लोकाच्या मागें लागलेला. त्यांची सेवाचाकरी करतांना त्याला घरादाराची, खाण्यापिण्याची कसली कसली म्हणून शुद्धि राहूं नये! दिवसाचे दिवस आणि रात्रीच्यारात्री हा त्यांच्या मठांत पडलेला आढळावयाचा. मुलाचे हे ढग पाहून गंगाप्रसादाची खात्री झाली कीं, काशीनाथ केव्हांहि घर प्रपंचाचें काम पहाणार नाहीं. आज म्हणा, कांहीं वर्षांनीं म्हणा घरादारावर तुलसीपत्र ठेवून हा निघून जाणार. मग आपल्या पश्चात आपली ही एवढी मोठी जमीनदारी, एवढी संपत्ति नष्ट होणार काय ? गंगाप्रसादाला ह्या चिंतेने फारच अस्थिर करून सोडलें. अनेक दिवस मनाशीं तर्कवितर्क करून त्यानें निश्चित केले कीं आपली कनिष्ट कन्या मानकुमारी हिला कोणा जमीनदाराच्या घरीं न देतां एखादा गरीब सच्चरित्र मुलगा पाहून त्याच्याशीं तिचे लग्न करावें व जांवयाला घरींच बाळगून त्याला ही जमीनदारी अर्पण करावी. आणि लगेच त्यानें

आपला तो बेत, सिद्धिस नेला. एका काश्मिरी ब्राम्हणाच्या पंडित अयोध्यानाथ नावांच्या रूपवान्, विद्वान्, सद्गुणी पण अनाथ मुलाशीं मानकुमारीचा विवाह करून त्याला घरजांवई केला. मानकुमारी ही बापाची अगदीं लाडकी कन्या होती लग्नानतर ती परक्याच्या घरी न जातां पतिसह बापाच्या घरींच राहू लागली. काशीनाथाच्या विरक्त स्वभावामुळे गंगाप्रसादाला पूर्वी फार मनःकष्ट होत असत, परंतु मानकुमारीच्या या विवाहामुळे त्याच्या मनाची तळमळ आतां बरीच कमी झाली होती.

गगाप्रसादाला तीन कन्या होत्या, हें वरती सांगितलेच आहे ह्या तिघीहि कन्या रूपाने, गुणाने आणि आचरणाने देवकन्य सारख्या होत्या. द्वेष, हिंसा, अहंकार, वगैरे दुष्ट विकार कसे असतात ह्याची त्यानां कल्पनाहि नव्हती. लहानथोरांशीं य चे अत्यत सरळ आणि प्रेमळ वर्तन असे. भानुमतिसारख्या सच्चारित्र मातेच्या शी.गाखालीं त्या वाढलेल्या, तेव्हां त्या सद्गुणाच्या मूर्तिमत प्रतिमाच निपजाव्या, यांत नवल नाहीं. त्यांतहि चांदकुमारी सर्वांत अगदी शांत आणि निर्लोभ असे. चांदकुमारीचे एकदर वर्तन, स्वभाव वगैरे पाहिल्यास ती या लोकींची कोणी मानवकन्या असेल असे कोणालाहि वाटत नसे. तथापि मानकुमारीवर गंगा प्रसादाचा अत्यंत जीव होता. ती सर्वांत धाकटी असल्यामुळे बापाची कदाचित् सर्वांपेक्षां तिच्यावर अधिक प्रीति जडली असेल. ते कांहीं असो, गंगाप्रसादाला मानकुमारी ही अगदीं जीव कीं प्राण वाटे. आपल्या तिघीहि कन्या सुस्थळीं पडलेल्या पाहून गगाप्रसादाच्या मस्तकावरील एक मोठे थोरले ओझे उतरल्या सारखें झालें व तो सुखानं आणि निश्चिंत मनाने काळक्रमणा करूं लागला.

परतु मनुष्याच्या वाट्याला नेहमींच सुख चे दिवस लिहिलेले नसतात. दुःखा-मागून सुख त्याप्रमाणेच सुखामागून दुःखहि अनुभाविण्याचा त्याला प्रसंग येतो. गंगाप्रसादाचा भाग्यसूर्य आतां अस्तगत हाऊन घनघोर अंधकार पडला. इ. स १८१४ सालीं सादतअल्ली मरण पावला. गंगाप्रसादावर सादत अल्ली अत्यत लोभ करी व त्याच्याच कृपेने तो एवढे ऐश्वर्य उपभोगत होता; परंतु गंगाप्रसादाचें हें भाग्य लखनौ येथील मुख्य मुख्य सरकारी अधिकाऱ्यांना पहावत नव्हतें आंतून ते गगाप्रसादावर जळफळत असत. नबाब जिवंत असतांना अर्थातच गंगाप्रसादाचे अनिष्ट करण्यास कोणीहि धजला नाहीं; परंतु सादत अल्ली मरण पावतांच लखनौ येथील अधिकारी उघडपणें गंगाप्रसादाची द्वेष

करूं लागल. तरीहि सातआठ वर्षेपर्यंत गंगाप्रसादच्या केसासहि धक्का लावण्यास कोणी समर्थ झाला नाहीं. सादतअल्ली मरण पावल्यावर सुमारें दहा वर्षांनीं नबाब मुत–मद्–उल–दौला हा गाझीउद्दीन हैदराचा मुख्य प्रधान झाला. हा प्रधान पूर्वी सादतअल्लीजवळ जोडे उचलणारा एक हुजऱ्या होता सादत अल्लीचे त्याच्यावर विशेष प्रेम जडून त्याने त्याला उच्च पदास चढविलें. वाढत वाढत हा हुजऱ्या हल्लीं अयोध्यचा मुख्य प्रधान झाला होता. जातीचेच जे थोर असतात त्यांचीसुद्धां वैभवाच्या वेळीं दृष्टि फिरल्याचें आपण कैक प्रसगीं पहातों; मग जे मूळचे अगदीं दरिद्री, हीन कुळांतले, हीन दर्जाचे त्यांनां दैवयोगाने अधिकारवैभव प्राप्त झाले, म्हणजे त्यांची दृष्टि साफ फिरून जाते, अस्मान देखील त्यांनां ठेंगणे होतें, हें प्रत्यहीं आपल्या अनुभवास येते. हुजऱ्याचा प्रधान झालेला मुत–मद्–उरु–दौला याची स्थिति अशीच झाली होती. काशी येथे सादत अल्ली-जवळ जोडे उचलण्याचें काम करित असतांना जो मुत--मद्--उल्–दौला गंगाप्रसादाच्या कृपाकटाक्षाची नेहमीं मोठ्या उत्कंठेने आकांक्षा करी, तोच हुजऱ्या आज गंगाप्रसादाच्या नाशावर उठला सादत अल्लानें गगाप्रसादाला बरीच मोठी जहागीर इनाम करून दिली होती. ह्या जहागिरीवर सरकारांत कोणत्याहि प्रकारचा कर भरू नये, अशी त्यानें त्याला सनद लिहून दिली होती. नबाब मुत–मद–उद्–दौला आज गंगाप्रसादाकडे त्या जहागिरीबद्दल कर मागूं लागला. गंगाप्रसाद कर देण्यास संमत होईना. अर्थात् गाझीउद्दीनाच्या दरबारचा व गंगाप्रसदाचा या बाबतीत लढा पडला. दिवसेंदिवस हा लढा विकोपास जात चालला. गंगाप्रसादाचे दोघे पराक्रमी जामात महाराज दिग्विजयसिंह आणि राजा हरपालसिंह हे या वेळीं सासऱ्याच्या पक्षास येऊन मिळाले, या दोघांपासूनहि अयोध्येच्या कोणत्याच नबाबानें आजपर्यंत कसलाच कर वसूल केला नव्हता व यांनींहि कोणाला तो दिला नव्हता. आपल्या घराण्याचा हे सूर्य-वंशाशीं संबंध लावित असत व खुद्द दिल्लीच्या बादशहाला देखील हे कारभार देत नसत. म्लेंच्छांचें अधिपत्याचा हे उघड उघडपणें अस्वीकार करीत व आपल्यास स्वतंत्र राजे म्हणवून घेत. त्यांच्यापासून खंडणी वसूल करण्यासाठीं गेलेल्या अनेक तालुकदार, आमील लोकांनीं प्राण गमविले होते. त्यामुळें यांच्या वाऱ्यास जाण्यास सहसा कोणी धजत नसे. बहुधा एकदोन वर्षांआड अयोध्येच्या नबाबाचें सैन्य यांच्यावर चालून येई व प्रत्येक वेळीं त्या सैन्याची हे धूळधाण



"याचे हातपाय घट्ट धरा, आत्तां पहा मी याला यमसदनाला पाठवितों!" ( पृष्ठ ८३ )

उडवीत. शेवटीं नेपाळयुद्ध संपल्यावर इंग्रजांचें बरेंचसें सैन्य यांच्यावर चालून आलें. या प्रसंगीं महाराज दिग्विजयसिंह आणि राजा हरपालसिंह यांनीं सिंहासारखा पराक्रम करून धारातीर्थीं शयन केलें. बिचाऱ्या वृद्ध गंगाप्रसादाच्या दोन्ही जामातांचा याप्रमाणें अकालीं अंत होऊन त्यांच्या दोन तरुण मुली विधवा झाल्या.

मागील प्रकरणांत परस्परांशी बोलत बसलेल्या ज्या दोघी स्त्रियांचें वर्णन आलें आहे, त्या, गंगाप्रसादाच्या ह्या दोन्ही विधवा कन्याच होत, हें आतां वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल. पहिली स्त्री राजा हरपालसिंहाची पत्नी चांदकुमारी व दुसरी स्त्री महाराज दिग्विजयसिंहाची पत्नी नारायणकुमारी होती. बिचारा गंगाप्रसाद या वेळीं शोकानें, दुःखानें अगदीं जर्जर झाला होता. विपत्तीमागून विपत्ति त्याच्या-वर कोसळत होत्या. पांच वर्षांपूर्वीं त्याच्या दोघी तरुण कन्या विधवा झाल्या. पुढें दोन वर्षांनीं त्याची धाकटी कन्या मानकुमारी हिचें दरवडेखोरांनीं हरण केलें. आज तो महाराज दिग्विजयसिंहाच्या जीर्ण राजमहालांतील एका खोलींत मरणोन्मुख अवस्थेंत एका पलंगावर पडला होता. त्याच्या दोघी कन्या नारायणकुमारी आणि चांदकुमारी त्याच्याजवळ बसून मोठ्या प्रेमानें त्याची शुश्रूषा करित होत्या.

## प्रकरण ८ वें.

## विजयगंज.

*When shall we three meet again
In thunder, lightening, or in rain ?
When the hurly burly's done,
When the battles's lost and won. —*Macbeth*.

माघ महिन्याचे दिवस. पहाट झाली होती. झिमझिम पाऊस पडत होता. आकाश ढगांनी व्याप्त झाले होतें. विजयगज येथील दुकानदारांनीं अद्याप आपल्या दुकानांचीं दारें उघडलीं नव्हतीं. हा विजयगजचा बाजार महाराज दिग्विजयसिंह ह्यांनीं वसविला होता. बाजारांत सुमारे शंभरसवाशें दुकानें होती. सुरजपाल सिंह, मुलाराम तिवारी, गांधार सिंह, रामगुलाम चेतलांगी, बाळकृष्ण पांडे, टीकाराम आगरवाला, तोताराम सिंह प्रभृति ह्या बाजारात प्रमुख प्रमुख दुकानदार होते आज मोठ्या पहांटेस तोताराम जागा झाला. बिछान्यावरच बसून तो सुररें सुररें करित गुडगुडीचे झुरके घेत होता. मधून मधून गुडगुडीच्या झुरक्यांच्या शब्दां-ऐवजीं खॉक् खॉक् खॉक् असा शब्द ऐकू येत होता. तोतारामाच्या त्या खोक-ल्याच्या आवाजानें शेजारचे आणखी दोनचार दुकानदार जागे झाले. रामगुलाम चेतलांगी याने जांभया देत आपला नोकर मेवाराम याला चिलीम भरण्यास हुकुम फर्माविला. शेगडींतील विस्तव विझल्याचे ऐकतांच मेवारामावर शिव्यांची लाखोली वाहून त्याने दुसऱ्या दुकानांतून विस्तव आणण्यास त्याला आज्ञा केली. त्याप्रमाणें मेवाराम चिलीम घेऊन तोतारामाच्या दरवाजापाशीं उभा राहून ह्मणत होता तोतारामशेटजी, जरा दार उघडतां का ? चिलीम पेटवून घ्यायची होती सरदार साहेबांची मिजास फार गरम झाली आहे बुवा!" आंतूनच तोताराम शिव्या हांसडित होता "अरे जा जा ! ठाउक आहे तुझा सरदारसाहेब ! रोज रोज विस्तव द्यायला

---

* वीज कडाडे चमके संज्वळ । पर्जन्यातें पळभर नच खळ । अशा समयीं कधिं आम्ही तिघीजणि । प्रेमे हर्षे मिळू मैत्रिणी ? । हो शांत जधीं समरज्वाला । जयापजयही युद्धीं ठरला ॥ १ ॥ —मॅकबेथ.

तुझ्या बापाचें कोणीं घेऊन खाल्लें आहे कीं काय? जा दुसऱ्या दुकानांत! सरदाराचें नांव सांगून भेवडावयाला आला आहे बेटा! चल, हो चालता!"

हां हां ह्मणतां चार घटका दिवस आला. पाऊसहि अमळ थांबला. तथापि आकाश अद्याप अभ्राच्छादितच होतें, बाजारांतील सर्व दुकानें उघडलीं, देवघेव चालू झाली, व रोजच्याप्रमाणें तेथें एकच गोंगाट आणि गडबड सुरू झाली; परंतु आजचा दिवस हा आपल्या क्रयविक्रयाचा शेवटचा दिवस आहे, आज सायकाळच्या आंत विजयगंजचा बाजार नामशेष होणार, अशी बिचाऱ्या त्या दुकानदारांनीं स्वप्नांतहि कल्पना केली नव्हती!

हळुहळू दोन प्रहर दिवस आला. दुकानदारांपैकीं कोणी स्नान करित आहेत, कोणी भोजन करित आहेत, सारांश, सर्वजण या वेळीं दुपारच्या जेवणाच्या धांदलींत गढून गेले आहेत, इतक्यांत अकस्मात् दूर पश्चिमेच्या बाजूस लोकांची एकच गर्दी झालेली दृष्टीस पडली. हळुहळू लोकांचा तो घोळका विजयगंजकडे येऊं लागला. त्या घोळक्याच्या पुढें असलेले पन्नास घोडेस्वार मोठ्या त्वरेनें विजयगंजाकडे दौडत येत होते त्या लोकांचा तो लष्करी साज पहातांच बाजारांतलि लोक बिचारे गर्भगळितच होऊन गेले. हां हां ह्मणतां घोडेस्वार बाजारांत येऊन ठेपले त्या स्वारांत सर्वांच्यापुढे सीतापुरच्या किल्ल्यांतील मुख्य अधिकारी गयाप्रसाद, ठाकुरप्रसाद आणि कल्याणसिंह हे होते बाजारांत येतांच हे घाईघाईने आणि भयभीत मुद्रेने सर्वांनां सांगू लागले "अहो, पळा, पळा! बादशहाचे तालुकदार, तहशीलदार, आमील वगैरे लोक बाजार लुटावयास येत आहेत, तुह्मी आपापल्या वस्तु घेऊन येथून लवकर पळून जा!" दुकानदारांच्या मनाची स्थिति या वेळी काय झाली, त्याचा कल्पनाच केली पाहिजे! बिचाऱ्यांच्या साऱ्या जन्माची कमाई आणि सारें भांडवल ह्मणजे त्यांच्या दुकानांत असलेला नाना प्रकारचा लहानमोठा माल. तो घेऊन त्यांनां अशा वेळीं कुठें पळतां येणार आणि ते कुठ जाणार? उपायांतर नसल्यामुळें प्रत्येकाला जेवढा कांहीं बोजा उचलून नेतां येण्यासारखा होता तेवढा भरभर बांधून, डोक्यावर पाठीवर घेऊन सर्वजण जीव घेऊन पळून गेले. लोकांच्या भयंकर गोंगाटानें, गडबडीनें गजबजून गेलेला तो विजयगंजचा बाजार एका तासांच्या आंतच स्मशानासारखा जनशून्य झाला!

वरील लहानसे सैन्य सीतापुरच्या किल्यांतून आलें होतें. सैन्याच्या पश्चिमभागीं राणी नारायणकुमारी इचा हत्ती होता. इंग्रजांशीं लढाई देण्यास आपल्या सेनेचें आधिपत्य स्वीकारून राणी नारायणकुमारी स्वतः रणभूमीवर आली होती. राणी नारायणकुमारीचा या वेळचा तो वीरवेष पहातांच, जणूं भगवती हैमवती असुर-वधार्थ संग्रामस्थलीं प्राप्त झाली आहे, असा भास होत होता! राणी मधून मधून गयाप्रसाद, कल्याणसिंह यांनां आज्ञा करित होती शेवटीं विजयगंजच्या पूर्व दिशेस एक कोसावर आपले सैन्य लढाई देण्यासाठीं सिद्ध करण्यास राणीने हुकूम फर्माविला.

दिवस मावळण्यास आतां फक्त घटका दोन घटका राहिल्या होत्या. बादशहाचा तालुकदार इबराहिमखां आणि तहसीलदार हिरासिंग आतां बरेच जवळ आले. राणीच्या सैन्यापासून यावेळीं ते सुमारे एक कोशावर होते. इबराहिमखां आणि हिरासिंग यांनां वाटलें होते कीं, इंग्रजांच्या लष्कराचे नांव ऐकतांच जमीनदार व गांवांतील इतर लोक भयभीत होऊन गांव सोडून जातील आणि आपल्यालां थोडक्या लोकांनिशी जमिनदारप्रभृति धनिक लोकांच्या घरादारांवर हल्ला करून यथास्थित लूट करतां येईल; परतु सीतापुरची राणी युद्ध करण्यास उभी राहिली आहे हें पहातांच ते थक्क झाले!

इंग्रजांच्या सैन्याची अद्यापपर्यंत लढाईस तोंड देण्याची तयारी नव्हती इबराहिमखां आणि हिरासिंग इंग्रजी सैन्याचा सेनापति मेजर स्मिथ याला सांगत होते "हुजूर! या देशाचे लोक मोठे पाजी आहेत. महाराज दिग्विजयसिंह आणि राजा हरपालसिंह ह्यांनीं केव्हांहि बादशहाला कर दिला नाहीं वजीर बर्हानमुल्क यांच्या अमलापासून आज तगाईत कोणीहि यांच्याकडून कर वसूल करू शकला नाहीं."

यांचें याप्रमाणें संभाषण चालले होते व इकडे राणीच्या सैन्य 'जय सीतारामकी जय! जय महाराणीकी जय!' असा सारखा जयघोष करित होतें.

मेजर स्मिथ हा मोठा हुषार सेनापति होता. अयोध्येचा महसूल वसूल करण्यासाठीं इंग्रजी सैन्याची मदत घेण्यांत आल्यास सेनापतीने फारच हुषारीनें वागावें, गोळी न सोडतां नुसत्या भीतीचें प्रदर्शन करून दुबळ्या प्रजेला भेवडावून युक्तीनें आपला कार्यभाग उरकून घ्यावा, असा गव्हर्नर जनरलचा स्पष्ट हुकूम होता; आणि त्या हुकुमान्वयें सेनापति मेजर स्मिथ यानें आपल्या सैन्याची रचना करण्यापूर्वींच तोफेच खाली आवाज काढण्यास आपल्या लोकांस आज्ञा केली. त्याला

वाटलें, आणि त्याचा आजपर्यंतचा अनुभवहि होता, कीं, तोफांचा नुसता आवाज ऐकतांच शत्रूच्या लोकांची दाणादाण उडून ते पळत सुटतील; परंतु इंग्रजांच्या तोफेचा शब्द कानीं पडतांच राणीच्या सैन्यांतून तोफांचा भडिमार सुरू झाला व इंग्रजांचे बरेच लोक मृत्युमुखीं पडले. राणीचा सेनापति गयाप्रसाद हा युद्धकलेंत मोठा प्रविण होता. महाराज दिग्विजयसिंहाचा हा उजवा हात असून महाराजां-बरोबर अनेक लढायांत यानें पराक्रम गाजविला होता त्यानें सोडलेला एकहि गोळा फुकट म्हणून जात नसे बादशहाचा तहसीलदार हिरासिंग इंग्रजी सैन्याच्या मागे एका हत्तीवर बसून मेजर स्मिथशीं बोलत होता. गयाप्रसादाने त्याच्यावर नेम धरून अचूक त्याला खालीं आणला व आपल्या पूर्वजांच्या भेटीस पाठविला ! हिरासिंग पतन पावतांच मेजर स्मिथने तत्क्षणी आपल्या सैन्यास पश्चिमेकडे तोंड करून उभे राहण्यास आज्ञा केली व लगेच राणीच्या सैन्यावर गोळ्यांची पर्जन्यवृष्टि सुरू झाली. बंदुकांच्या, तोफांच्या धडधडाटांत मेघांचा गडगडाटहि सुरू झाला व त्या घनघोर आवाजानें कानठळ्या बसू लागल्या. उभय सैन्यांचें सुमारें दोन घटका निकराचे युद्ध झाले. राणीचे बरेच लोक जायां झाले. शेवटीं, आपला निभाव लागणे कठीण आहे असें वाटून वाट फुटेल तिकडे राणीचे लोक सैरावैरा धावूं लागले. आपल्या लोकांस थांबवून धरण्यासाठीं गयाप्रसाद आणि कल्याणसिंह यांनीं जंगजंग पछाडले, कित्येकांस गोळी घालून ठारहि केले तथापि भीतिनें गर्भगळित झालेल्या आपल्या लोकांपुढें त्यांचें कांहीं चालेना; परंतु राणीने पश्चिमेकडचा मार्ग आधींच अडवून धरला होता. ती वाट बंद झाल्यामुळें हे लोक उत्तरेच्या बाजूस पळूं लागले. इतक्यांत एकाएकीं मुसळधारांचा पाऊस वर्षूं लागला व उभय सैन्यांची अगदीं दाणादाण उडून गेली. राणीचे सैन्य उत्तरेकडे पळून जातांना पाहून मेजर स्मिथ इबराहिमखाला म्हणाला " मला वाटते, हे लोक नेपाळांत पळून जात असावे. मग आतां आपला काय विचार आहे ? सीतापुरावर हल्ला करावयाचा काय ? "

यावर इबराहिमखां म्हणाला " हुजुर ! नदी उतरून आपल्याला एवढें सैन्य घेऊन किल्ल्यावर जाण्याची मुळींच आवश्यकता नाहीं किल्ल्यांतील सारे लोक पळून गेले आहेत. मी माझे थोडेसे शिपाई घेऊन तेथील रयतेकडून कर वसूल करूं शकेन. या क्षुल्लक गोष्टीसाठीं आपल्या लोकांस तसदी देणें मला प्रशस्त वाटत नाहीं. "

एक तर माघ महिन्याचें दिवस. थंडी मी म्हणत होती. त्यांत आणखी पाऊस पडल्यामुळें हवेंत मनस्वी गारठा आला होता. अशा कडक थंडींतून नदी उतरून

सीतापुराला जाण्याला मेजर स्मिथ अर्थातच उत्सुक नव्हता. इबराहिमखांच्या म्हणण्यास त्यानें तत्काळ रुकार देऊन विजयगंजच्या पूर्वेकडे पांच कासांवर असलेल्या दुसऱ्या एका बाजारांत आपल्या सैन्याचा तळ दिला. दुसऱ्या दिवशीं त्यानें बेरूच येथील तालुकदाराच्या विनतिप्रमाणें बेरूचवर हल्ला करण्यासाठीं तिकडे आपल्या सैन्याचा मोर्चा फिरविला, व इबराहिमखांला इकडे सीतापुरला एकटाच सोडला.

मेजर स्मिथनें आपल्या विनंतीस मान दिला, याबद्दल इबराहीमखांला मनांतल्या मनांत फार आनंद झाला होता. हिरासिंगाचा मृत्यु हेंहि त्याच्या आनदाचें एक विशेष कारण होतें. इबराहिमखां आणि हिरासिंग ह्या उभयतांत पूर्वी मसलत ठरली होती कीं, इंग्रजी सैन्यास भिऊन किल्ल्यांतील लाक पळून जातांच हिरासिंगाने निवडक लोक घेऊन किल्ल्यांत घुसावें. महाराज दिग्विजयसिंह हा मोठा श्रीमान् जमीनदार असल्यामुळे सीतापूरच्या किल्यांत अनेक जडजवाहिर व दुसऱ्या मूल्यवान् वस्तु पुष्कळ आहेत, हें त्यांनां ठाऊक होतें त्या हिरासिंगाने हस्तगत करून घेऊन उभयतांनीं सारख्या वांटून घ्याव्या, असे दोघाचें गुप्त खलबत झाले होतें तथापि हिरासिंग आपल्याशीं प्रामाणिकपणानें वागेलच, असें काहीं इबराहीमखांला मनांतून वाटत नव्हतें. हा बेटा आपल्याला दगा दऊन उंची वस्तु लपवून ठेवील, व आपल्या तोंडाला पानें पुशील, अशी इबराहिमखांला एकसारखी चुटपूट लागली होती. नबाबी कारकिर्दींत लहानथोर अधिकारी परस्परांशीं बाहेरून केवळ्याहि प्रेमाचे आणि विश्वासाचे प्रदर्शन करित असले, तरी आंतून एकाचा दुसऱ्यावर काडीचाहि विश्वास नसे, प्रत्येक जण दुसऱ्याच्या घाताविषयीं डाळयांत तेल घालून टपून बसलेला असे, हें पूर्वी सांगितलेंच आहे. इबराहिमखां आणि हिंरासिंग याचें परस्पराशी अशा प्रकारचेंच सख्य होतें. बाहेरून ते परस्परांचे दिलजान् दोस्त होते. परंतु आंतून एकमेक एकमेकास पाण्यांत पहात असे. लुचा हिरासिंग, महाराज दिग्विजयसिंहाच्या राजमहालांतील मूल्यवान् वस्तु उपटून आपल्याला अजीबात फसवील, ह्मणून मनांतल्या मनांत एकसारखा चुटपुटत असलेल्या इबराहिमखांला हिरासिंगाच्या मृत्युनें आनंदाच्या उकळ्या फुटाव्या, हें सहाजिकच आहे. आतां सर्व वस्तूचे मालक आपणच झालों, असें त्याला निश्चयपूर्वक वाटलें मेजर स्मिथला त्यानें किल्ल्यांत न येण्याविषयीं विनंति करण्यांत तरी त्याचा अंतस्थ हेतु हाच होता. आपल्या नफ्याचे भागीदार कोणीहि होऊं नये, सर्व वस्तूंवर आपल्या एकट्यालाच लाट मारतां यावा, यासाठीं

त्याची ही सारी धडपड चालली होती. इंग्रजांचे लोक किल्ल्यांत घुसते तर अर्थातच त्यांनीं सर्व वस्तु लाबविल्या असत्या. इब्राहिमखां तसें कां करूं देईल ? मेजर स्मिथला नानाप्रकारें समजावून त्यानें त्याला दूर घालविलें.

मेजर स्मिथ निघून गेल्यावर इबराहिमखां सुमारें तीसचाळीस लोकांनिशीं विजयगंजच्या बाजारांत गेला. या वेळीं बाजार अगदीं ओस पडला होता. साऱ्या बाजारांत एकहि माणूस नव्हतें. बाजाराची ती भयाण स्थिति पाहून इब्राहिमखां मनाशीं ह्मणाला "सीतापुरच्या किल्ल्याचीहि अशीच दशा झाली असेल ! सारे लोक जीव घेऊन पळाले असतील." रात्रीं त्यानें बाजारांतील एका दुकानांत वस्ती केली. मोठ्या पहांटेस उठून किल्ल्यांत प्रवेश करावा असा विचार करून विश्रांतीसाठीं तो अमळ आडवा झाला. पण आज त्याला झोंप कुठली यावयाला ! किल्ल्यांतील ते मूल्यवान जडजवाहिर, त्या उची उंची वस्तु, इबराहिमखांच्या डोळ्यापुढें एकसारख्या उभ्या राहूं लागल्या. इतक्या कीं, किल्ल्यांतील राजमहालचे कास्मिरी दगडहि त्याला फारच रमणीय दिसूं लागले व तो महाल उध्वस्त करून, ते सुंदर दगड नेऊन आपल्या हवेलीच्या उपयोगीं आणण्याचा त्यानें कृतनिश्चय केला. साऱ्या वस्तु लुटून न्यावयाच्या, अथात्, ते दगड तरी तो कां टाकून जाईल ? कांहीं केल्या त्याला झोप ह्मणून येईना !

इबराहिमखां याप्रमाणें विचारांत आणि मनोराज्यांतील सुंदर इमारतींत स्वैरपणें भ्रमण करित असतां मध्यरात्र टळून गेली. आकाशांतील ढग यावेळीं फांकले होते. पौर्णिमेच्या स्वच्छ चादण्यानें तो सारा प्रांत उज्वळ दिसूं लागला. इबराहिमखांला आता धीर निघेना त्या तेवढ्या रात्रींच त्यानें कुच करण्यास आपल्या लोकास हुकूम फर्माविला. याप्रमाणें हें तीसचाळीस लोकांचे लष्कर घेऊन इबराहिमखां विजयगंजहून सीतापुर येथे जावयाला मध्यरात्रीं बाहेर पडला.

इकडे राणी नारायणकुमारी आपले उरलेल दोनशें लोक बरोबर घेऊन मध्यरात्रीच्या सुमारास किल्ल्यांत परत आली. सकाळी प्रहर दिवसाला सैन्यासह ती किल्ल्यांतून बाहेर पडली होती. हा वेळपावेतो तिनें पाण्याच्या थेंबासहि स्पर्श केला नव्हता. तिची धाकटी बहीण चांदकुमारी हिनें आजचा सारा दिवस किल्ल्यांत अगदीं अस्वस्थ चित्तानें घालविला. दिवस मावळला आणि जसजसा अंधकार पडूं लागला, तसतशी तिच्या मनाची अस्वस्थता अधिकाधिकच वाढूं लागली. भीति, नाना प्रकारचीं दुःस्वप्नें, कुशंका यांनीं तिला अगदीं व्यग्र करून सोडलें. रात्र होतांच तर

ती अतिशयच अधिर झाली व कावरीबावरी होऊन केव्हां राजमहालाच्या बाहेर, तर केव्हां दिवाणखान्यांत, केव्हां पित्याच्या बिछान्यापाशीं तर केव्हां सीता-रामाच्या मंदिरांत, याप्रमाणें एखाद्या वांसरूं चुकलेल्या गाईसारखी वणवण फिरू लागली. जसजशीं रात्र वाढू लागली, तसतशी बिचारी चांदकुमारी अधिकाधिक व्यथित होऊन तिच्या मनाची कुशंका अधिकाधिक दृढ होत चालली.

दोन प्रहर रात्रीच्या सुमारास किल्ल्यामध्यें गडबडीचा आवाज ऐकतांच चांद-कुमारी धांवतच बाहेर आली पहाते, तो राणी नारायणकुमारी राजमहालाच्या मुख्य दरवाज्यांत उभी आहे. बहिणीस परत आलेली पाहून चांदकुमारीचें अंतःकरण निरनिराळ्या मनोविकारांनीं भरून आलें, डोळ्यांतून झरझर अश्रुप्रवाह सुरू झाला. कांहीं वेळ उभय बहिणी देहभान विसरून गेल्या. कोणीच कांहीं बोलली नाही. शुद्धीवर आल्यानंतर नारायणकुमारीने विचारिलें " बाबा कसे आहेत ? त्यांना ह्यांतील कांहीं कळलं नाहींना ? "

चांदकुमारीहि आतां शुद्धीवर आली ती ह्मणाली " बाबा सकाळपासून बेशुद्धच आहेत. त्यांनां बिचाऱ्यांनां कांहींएक ठाऊक नाहीं. परंतु मी तर अगदी भिऊन गेल्ये होत्यें. अद्यापि ह्मणज माझी भीति दूर झाली आहे असं नाहीं—पण ताई, काय झालं तें अगोदर सांग गडे ! माझ्या मनांत भलभलत्या वाईट वाईट शंका येत आहेत ! "

नारायणकुमारी गंभीर स्वरानें ह्मणाली " भिऊ नको ! सीतानाथाच्या कृपेनं सर्व गोष्टी सुरळीत पार पडल्या. ती सविस्तर हकीगत मागाहून सावकाश सांगेन, तूंहि अजून कांही खाल्लं नाहींस तूं बाबांपाशीं जा, मी स्नान करून ही आल्येच "

असें ह्मणून राणी नारायणकुमारीने आपल्या एका दासीला धूतवस्त्र आणण्यास सांगून ती पुष्करणीकडे निघाली. त्याप्रमाणे एक दासी धूतवस्त्र आणि दुसरी एक दासी कंदिल घेऊन राणीच्या मागोमाग गेल्या त्या माघ महिन्याच्या कडक थंडींत, भर मध्यरात्री, राणी नारायणकुमारीनें त्या गार पाण्यांत उतरून स्नान केलें. स्नानानंतर ती तशीच ओल्या वस्त्रानें जवळच असलेल्या सीतारामाच्या मंदिराकडे वळली व सात वेळ मंदिराला प्रदक्षिणा करून मंदिराच्या दरवाज्यासमोर जमिनीवर लोटां-गण घालून तिनें साष्टांग नमस्कार घातला. तदनंतर ओले वस्त्र बदलून ती धूतवस्त्र नेसली व दासींस जावयास सांगून मंदिरांत गेली. सीतारामाच्या मंदिरांत या वेळीं फक्त एक लहानशी समई मिणमिण जळत होती. राणी नारायणकुमारी एका दर्भासनावर एकाग्र चित्तानें रामनामाचा जप करित बसली.

चांदकुमारीनें ह्या वेळपर्यंत तोंडांत पाण्याचा थेंबहि घेतला नव्हता. बहीण येतांच कांहीं फळफळावळीनें एक ताट भरून ती तिची वाट पहात बसली होती. नारायणकुमारीला स्नान करून येण्यास बराच विलंब झालेला पाहून चांदकुमारी आतां मंदिरांत आली. तिला पहातांच नारायणकुमारी उठली व दोघीहि महालांत आल्या. नारायणकुमारीच्या मनांत आज मुळींच आहार करावयाचा नव्हता; परंतु आपण उपाशी राहिल्यास चांदकुमारी कांहींहि खाणार नाहीं असे पहातांच तिनें आपला हट्ट सोडला. नंतर दोघींहि बहिणींनीं थोडासा फलाहार केला. त्या रात्रीं अर्थातच त्यांनां झोंप आली नाहीं. साऱ्या दिवसांत घडलेल्या गोष्टी उभयतां बहिणी मोठ्या उत्सुकतेनें एकमेकांस विचारित होत्या व सांगत होत्या. गोष्टी सांगतां सांगतां रात्र संपून गेली, हे त्यांनां कळलें देखील नाहीं!

सुमारें दोन घटका रात्र असतां इबराहिमखां आपल्या तीसचाळीस लोकांनिशीं किल्ल्याच्या पूर्वेच्या दरवाज्यापाशीं येऊन पोहचला. या वेळीं दरवाज्यावर फक्त दोघेच संत्री पहारा करित होते. बाकीचे लोक साऱ्या दिवसाच्या प्रवासाच्या आणि लढाईच्या श्रमाने अगदीं थकून गेले असल्यामुळे विश्रांति घेत पडले होते. गयाप्रसाद आणि कल्याणसिंह ह्यांनां मात्र आज झोंप येईना. आपल्या लोकांस विश्रांति घ्यावयास सांगून ते स्वतः जागत बसले होते. किल्ल्याच्या पहिल्याच हवेलींतील एका पडशाळेंत एका परशांत बिस्तर पेटवून त्या शेकाजवळ कडक थंडींत ते कांही विचार करित बसले होते. त्यांच्या गोष्टी आणखी दुसऱ्या कसल्या असणार? इंग्रजांचें सैन्य किल्ल्यावर चालून येईल काय? आल्यास आपली काय अवस्था होईल? आपण त्यांनां तोंड कसे द्यावे? इत्यादि गोष्टींचा ते उभयतां खल करित आहेत, इतक्यांत दरवाज्यावरील एक पहारेकरी 'शत्रूचे लोक आले, सावध रहा!' असें ओरडतच आला. गयाप्रसाद आणि कल्याणसिंह तयारीनेंच होते. लगेच त्यांनीं आपल्या साऱ्या लोकांस उठविलें व सर्वजण तरवारी, बंदुका घेऊन दरवाज्यापाशीं आले. एवढ्या वेळांत इबाराहिमखांचे लोक किल्ल्यांत घुसले. लगेच भयंकर मारामारी सुरू झाली. "मारा साल्या फिरंग्यांनां! पिटा साल्या काफरांनां!" असा परस्पर गालिवर्षाव होऊं लागला व तरवारीचा खणखणाट आणि बंदुकीचा धडधडाट चालू झाला.

इकड ही गडबड चालू असतां कित्येक लोकांनीं राजमहालांत जाऊन शत्रूचे लोक किल्ल्यांत घुसल्याची राणीला वर्दी दिली. किल्ल्यावर चालून आलेले हे इंग्रजांचे

लोक आहेत, कीं, तालुकदार आपले लोक घेऊन आला आहे, हें हा वेळपर्यंत राणीला कळलें नव्हतें. तथापि ती यत्किंचितहि न डगमगतां आपली तरवार घेऊन एकदम गडबडीच्या जागीं धावून आली राणी येऊन पोहोचण्यापूर्वीच तिच्या लोकांनीं इबराहिमखांच्या पचवीसतीस लोकांचीं मुंडकीं आपल्या तरवारींनीं धडापासून वेगळीं केलीं होतीं नारायणकुमारी पहाते, तों तेथे पचवीसतीस प्रेतें छिन्नविछिन्न होऊन पडलीं आहेत, व इबराहिमखांला पांनचार इसमांनीं जमिनीवर उताणा पाडून कोणीं त्याला बंदुकीच्या दस्त्यांनीं, कोणीं काठ्यांनीं, तर कोणी लाथाबुक्यांनीं बडवित आहेत, बिचारा इबराहिमखां बेशुद्ध होऊन पडला आहे ! विजयगंजच्या बाजारांतील रामगुलाम चेतलांगी, कालची गडबड ऐकतांच जीव घेऊन पळून किल्ल्यांत येऊन लपून राहिला होता. हा रामगुलाम पूर्वी महाराज दिग्विजयसिंहाच्या सैन्यात शिपायाची नोकरी करित असे. परंतु ही मूर्ति एवढी शूर होती कीं, 'बंदुकीचा आवाज कानीं पडतांच स्वारीच्या उरांत धडकी भरे व लढाईचें नांव ऐकतांच तर बापड्याला महिन्याचे महिने हिवताप भरून येई ! अशी स्थिति असतांहि चुकून-माकून ह्याला कधीं स्वारीशिकारीला नेलाच, तर भयाचें यत्किंचित् चिन्ह दिसतांच हा तेथून ऊर्ध्व श्वासाने सर्वांआधीं पलायन करी ! रामगुलामाचें हे लोकोत्तर शौर्य पाहून महाराज दिग्विजयसिंहाने त्याची सैन्यांतून मोकळिक करून त्याला दुकानदारी करून पोट भरण्यासाठीं म्हणून कांहीं पैसे दिले. त्या पैशावर विजयगंज येथें दुकान घालून हा कालक्रमणा करित होता. रामगुलाम हा जरी हल्लीं दुकानदारी करित होता, तरी त्याला कोणीं सरदारसाहेब म्हटलें नाहीं तर तो चिडत असे. लोकांकडून सक्तीनें आणि कधीं कधीं तर आपल्या शौर्याचे प्रदर्शनहि करून तो आपल्यास सरदार म्हणवून घेत असे. सरदार रामगुलाम विजयगंजच्या बाजारांत प्रसिद्ध होता. सांप्रत इबराहिमखां जमिनीवर मूर्च्छित होऊन पडलेला पहातांच या सरदारसाहेबाच्या अंगीं वीरश्रीचा विलक्षण संचार होऊन तरवार घेऊन स्वारी त्याच्या अंगावर धावली व राणीला समोर पहातांच तर त्याचे अंगीं अधिकच वीरश्रीचें वारें भरलें. [illegible] करून रामगुलाम म्हणाला "काल फिरंग्यांच्या सर्व सेनेची धुळधाण उडवून त्यांना हांकून लावले अन् हा बेटा आज किल्ल्यांत पाय टाकण्याचें धाडस करतो ! सरदार रामगुलाम चेतलांगी किल्ल्यांत आहे हें याला ठाऊक नाहीं वाटतें ! आत्तां बच्चा.चा समाचार घेतों !"

असें म्हणून रामगुलाम इबराहिमखांच्या अंगावर धावून गेला. रामगुलामाच्या या लोकोत्तर शौर्याची तेथील मंडळीला पूर्ण माहिती होती. त्याच्या हातांत नागवी तलवार

पहातांच इबराहिमखांला पकडून धरणारे लोक घाबरून गेले. कारण, हें पिशाच त्या तरवारीनें स्वतःला दुखापत करून घेईल ती घेईल, परतु तरवार कशी वापरावी तें ठाउक नसल्यामुळें दुसऱ्यालाहि दुखापत करील, असे वाटून इबराहिमखांला धरून असलेली मंडळी अमळ बाजूस सरली. ती मंडळी दूर होतांच इबराहिमखां अर्थातच मोकळा झाला. आतां हा उठून आपल्यावर उलटेल कीं काय, या भीतीनें सरदारसाहेब लटलट कांपूं लागले ! त्यांच्या हातांतील तरवार गळून पडली व स्वारीची अगदीं बोबडीच वळली. सरदारसाहेबांचें तें शौर्य पहातांच त्या तशा प्रसंगींहि मंडळी गालांतल्या गालांत हंसूं लागली. सरदारसाहेब आतां अत्यंत कोपायमनान होऊन ओरडले "हा षंढांनो ! अरे, तुम्ही एवढे भागूबाई कसे बनलां? याला सोडून तुह्मी कां पळतां ? महाराज दिग्विजयसिंहाचा शूर सरदार रामगुलाम येथें हजर असतां तुह्मी कां भितां ? याचे हातपाय घट्ट धरा, आत्तां पहा मी याला यमसदनाला पाठवितों ! "

राणी नारायणकुमारीला अद्यापपर्यंत ही काय गडबड आहे हें कळलें नव्हतें. गयाप्रसादानें तिला एकंदर वृत्तांत निवेदन केल्यावर दुःख प्रदर्शित करून तिनें म्हटलें " एवढया लोकांचा वध करण्याची कांहीं आवश्यकता नव्हती. यांनां हांकून लावायचं होतं. "

इबराहिमखांच्या लोकांपैकीं सातआठजण अद्याप जिवंत होते. त्यांनां बंधमुक्त करण्यास राणीने तत्काळ आज्ञा केली. इबराहिमखां मृतवत् होऊन पडला होता. त्याला जरी भयकर जखमा झाल्या होत्या तथापि योग्य औषधोपाय झाल्यास तो बरा होईल, असें राणीला दिसून आले राणीच्या इच्छेनुसार इबराहिमखांच्या लोकांस इबराहिमखांला घेऊन जाण्यास गयाप्रसादाने सांगितलें; परतु त्याचे लोक या वेळीं आपापल्या जिवाच्या बचावविषयींच अधिक उत्सुक दिसले. त्याला घेऊन जाण्यास कोणीहि संमत होईना. इबराहिमखांच्या हत्तीच्या माहुतानें हत्तीसह आधींच पोबारा केला होता. राणीच्या आज्ञेप्रमाणे कल्याण-सिंहानें तीनचार बैलगाड्या भाड्यानें आणविल्या व इबराहिमखांच्या लोकांस वाटखर्चासाठीं शंभर रुपये देऊन त्याला त्याच्या देशीं पोचविण्याची व्यवस्था केली. पैसा मिळतांच मग नाइलाज होऊन इबराहिमखांचे लोक त्या गोष्टीस कबूल झाले व याप्रमाणें इबराहिमखांची ही वरात त्याच्या सातआठ लोकांनिशीं तीनचार बैल गाड्यांतून सीतापुरहून दोनप्रहरच्या सुमारास लखनौकडे निघाली.

दोन घटका रात्र झाली होती. इबराहिमखांला वाहून नेणाऱ्या या गाड्या विजयगजच्या बाजारांत येऊन पोहोंचल्या. या वेळीं बाजार शून्य होता इबराहिमख बरोबरचे युसफअल्ली, अकबरअल्ली, मनसुरअल्ली, इलाहिबक्ष, फत्तेखां वगैरे लोकांनी रात्रौं बाजारांत मुक्काम करण्याचा विचार करून गाड्या सोडल्या व तोतारामाच्या दुकानांत मंडळी तंबाखू पीत बसली. दोनतीन इसम स्वयंपाकाच्या तयारीस लागले. इबराहिमखां सीतापुर येथील चकमकींत झालेल्या वेदनांनी विव्हळत एका गाडींत पडला होता. मधून मधून तो एवढ्याने विव्हळे कीं त्याच्या त्या वेदना पाहून शत्रूच्या हृदयासहि पाझर फुटला असता. इबराहिमखांच्या त्या भयकर वेदना युसफअल्लीला ऐकवेनात. तो फत्तेखांला म्हणाल " भाई, तालुकदारसाहेबाची स्थिति तर भयंकर झाली आहे. त्यांच्या जगण्याची आशा मुळींच उरली नाही. या रात्रीच्या आंत त्यांचा श्वास अत होणार आणि तसा दुर्धर प्रसग ओढवला तर प्रवासांत त्यांना कोठे कबर द्यावी? कांहीं सुचत नाहीं ! "

यावर फत्तेखां गभीर मुद्रा करून म्हणाला " म्हणूनच तर मी त्यांना बरोबर आणण्यास कबूल नव्हतो ! सीतापुरच्या राणीनें दिलेल्या शभर रुपयांचा तुम्हांला लोभ सुटला व ही नसती धोंड तुम्ही आपल्या गळयांत बांधून आमच्या मानाहि फासांत अडकविल्या. केल्या कर्मांचीं फळे तुम्ही आतां खुशाल निस्तरित बसा, आम्ही सर्वजण चालते होतों. आम्हांला तुमचे ते पैसेहि नकोत नी हे नसते लचांडहि पाठीमागें लावून घेणें नको ! "

फत्तेखांचें हे भाषण ऐकून युसफअल्ली सचिंत मुद्रा करून इलाहिबक्षकडे वळून म्हणाला " मुनशीसाहेब, फत्तेखां कुराणकतबा पढलेला नाहीं, या बच्याला धर्माधर्माच ज्ञान नाहीं, भीतिहि नाहीं. आपण तर कुराण पढलेले, धर्मावर आपली पूर्ण श्रद्धा आहे मुसलमानाला आपल्या भाईबंदाला मरणोन्मुख स्थितीत जंगलांत टाकून का जातां येईल ? "

इलाहिबक्षला साऱ्या जन्मांत मुन्शीचा मान कोणीहि दिला नव्हता युसफअल्लीनें आज आपली अशी संभावना केलेली पाहतांच तो अत्यंत संतोषित होऊन व आपल्या विद्वत्तेचें गांभीर्य मुद्रेवर वळेंच आणून एखाद्या पोक्त माणसाप्रमाणे बोलूं लागला " साहेब मरण पावतांच त्यांना कबर देणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे. त्यांत अंतर घडल्यास अल्लाचे आपण गुन्हेगार ठरूं ! "

इलाहिबक्षाचें हे भाषण ऐकतांच मनसुरअल्ली ह्मणतो " पण कबर कुठें द्यावी ? या अशा जगलांत का कबर खणतां यावयाची आहे ? अन् साहेबांचे प्रेत फेकून देणेहि योग्य दिसत नाहीं. खरोखर मोठा बिकट प्रश्न आहे ! "

युसफअल्ली ह्मणतो " लखनौचा रस्ता कांहीं सुलभ नाहीं, किती तरी जंगलें, नद्या, पर्वत ओलांडून जावें लागेल; आणि अशा त्या अडचणीच्या वाटेंत कांहीं कबरेची व्यवस्था करतां येणें शक्य नाहीं. तालुकदारसाहेब आज मरोत, उद्यां मरोत, पण मरणार हें खचित ! अशा भयकर जखमामधून कांहीं ते उठावयाचे नाहीत अल्लाच्या इच्छेप्रमाणे जर ते आज रात्रीं निवर्तले तर या विजयगजमध्यें त्यांच्या कबरेची व्यवस्था निर्विघ्नपणें करतां येईल. भाईनों, या तालुकदारांचें अन्न आह्मी आज सात पिढ्या खात आहों. त्यांच्या विपत्तीकाळीं माझ्या देहांत प्राण असेपर्यंत मला त्यांची उपेक्षा करतां यावयाची नाहीं! त्यांच्या कबरेची मी पहिल्यानें व्यवस्था करीन तेव्हांच पाऊल पुढे टाकीन !तुह्मीच सांगा, कबर दिल्याशिवाय त्यांनां असेंच टाकून जाणे बरें दिसेल का ? लाक आपल्याला काय ह्मणतील ? "

यावर फत्तेखां हंसत हसत ह्मणाला " वा हो तुह्मी धर्मावतार ! तालुकदारसाहेब आज रात्रीं मरतील ? त्यांनां कुठे साधारण जखमा झाल्या आहेत, औषधपाणी केल्यास ते बरे होतील. जिवत माणसाला का तुह्मी मारणार? तालुकदारसाहेबांचें अन्न खाल्ल्याचा हा बरा उपकार फेडणारसे दिसतां ? "

युसफअल्ली यावर गंभीर मुद्रा करून ह्मणाला ' फत्तेखां, तूं मुसलमान नाहींस! तू जर मुसलमान असतास, कुराणकतबा पाहिला असतास, अन् कुराणावर तुझा विश्वास असता, तर असे उद्गार तुझ्या तोंडून निघालेच नसते ! ह्या इलाहिबक्ष मुन्शींनां किंवा मिर्जा मनशूरअल्लीनां विचार, मुसलमान मुसलमानाला कबर दिल्याशिवाय त्याला जंगलांत फेंकून गेला तर काय पातक आहे ते ! "

मुनशी आणि मिर्जासाहेबांनीं तिरस्कार मुद्रा करून फत्तेखांकडे पहातांच तो बिचारा गप्प राहिला. नतर कांहीं एक बोलला नाहीं. इलाहिबक्ष आतां अधिकच गंभीर मुद्रा करून ह्मणाला "देवाच्या दयेनें आज रात्रींच जर साहेब मृत्यु पावतील तर येथे त्यांनां कबर देण्याची व्यवस्था सुलभ रीतीनें करतां येण्यासारखी आहे. परंतु जर आणखी एकदोन दिवस ते जगले, तर मग जगलांत मोठी अडचण पडेल!"

इब्राहिमखांच्या कबरेसंबंधीं याप्रमाणें गंभीर चर्चा चालली असतां मिर्जा मनशूरअल्लीची कोनांत पडलेल्या कुदळखोऱ्यांकडे सहज दृष्टि गेली. तीं आयुधें

उचलून आणून मिर्जासाहेब ह्मणतात " हीं पहा कुदळखोरीं येथें आहेत. कबर खणण्याची व्यवस्था येथेंच झाली तर फार चांगलें होईल. उद्यां जंगलांत का आपल्याला कोणीं कुदळखोरीं आणून देणार आहे. ? "

युसफअल्ली, इलाहिबक्ष, अकबरअल्ली प्रभृति मंडळी आतां अधिकच गंभीरतेनें विचार करूं लागली. तालुकदारसाहेब मरणार हें खास; परंतु मरणापूर्वी आसन्न मरणावस्थेंत त्यांनां कबर द्यावी की काय याचा ते गंभीरतेनें विचार करित बसले. युसफअल्ली म्हणाला " महंमद पैगंबराने काफराशीं किर्ततरी युद्धे केली होती या युद्धांत घायाळ होऊन पडलेल्या आपल्या शिपायांस कबर दिल्याशिवाय रण-भूमीवर तसेंच टाकून का पैगंबर साहेब गेले असतील ?

इलाहिबक्षानें कांहीं या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. तथापि वादविवादाअंतीं सर्वांनीं मिळून एकमताने ठरविले कीं इबराहिमखां अगदीं आसन्नमरण झाला आहे. आज रात्रीं ह्मणा, उद्यां सकाळीं ह्मणा, तो मरणार हें खास !

इकडे इबराहिमखां बैलांच्या गाडींत विव्हळत पडला होता. त्याच्या कबरे-संबंधीं व्यवस्थेचा गंभीर विचार करण्यांत गढलेल्या त्याच्या लोकांस आतापर्यंत त्याच्याकडे लक्ष्य देण्यास आवकाशच सांपडला नव्हता. बिचाऱ्याचे भुकेने, जखमांच्या वेदनानीं प्राण कासावीस झाले होते. तो युसफअल्ली, मन्शुरअल्ली वगै-रेचीं नांवें घेऊन गाडींत ओरडत होता " अरे तुम्हीं सारे जण मला एकटा टाकून गेलां तरी कुठें ? माझा इकडे प्राण जावयाची वेळ आली-मी कांहीं यांतून जगत नाहीं—"

खुद्द इबराहिमखांच्या तोंडून त्याच्या जगण्याची अशा उरली नाहीं असें ऐकतांच आतां कसली शंका राहिली ? त्याची कबर खोदण्यास हपापलेच्या युसफअल्ली प्रभृति त्याच्या लोकांची आतां पक्की खातरी होऊन चुकली कीं, तालुकदारसाहेब आतां कांहीं जास्त वेळ जगत नाहीत. युसफअल्ली म्हणाला "भाईनों, उठा, उठा, जलदी करा, कबर खणून होईपर्यंत तालुकदारसाहेबांचा प्राण खात्रीनें निघून जाईल. "

ताबडतोब तीनचार मंडळी उठली व कुदळखोरीं घेऊन दुकानाच्या मागच्या बाजूस खड्डा खणण्याच्या तयारीस लागली. फत्तेखां या वेळीं स्वस्थ बसला होता. त्याला ह्या एकंदर प्रकाराचें मोठे आश्चर्य वाटत होतें; परंतु आपण कांहीं बोलल्यास आपल्या आधार्मिकपणाची निंदा होईल या भीतीनें तो बिचारा गुपचुप बसला होता. युसफअल्ली त्याला म्हणाला " भाई फत्तेखां, साहेब मरणाच्या पंथास लागलें आहेत.

अन् तूं ह्या वेळीं असा रुसून बसतोस, हें बरें दिसतें का? ऊठ, कबर खणण्यास मदत कर ''

बापडा काय करतो! जिवंत माणसास गाडण्यापेक्षां स्नेह्यांकडून होणाऱ्या आपल्या धर्मश्रद्धच्या उपहासाची त्याला जास्त भीति वाटली व तोहि मोठ्या उत्साहानें खड्ड्यांतील माती उपसूं लागला. चौघांनीं मिळून तासा अर्ध्या तासांत सुमारें चार हात लांब, दोन हात रुंद व दोन हात खोल अशी एक खांच खणली व सर्व मंडळी इबराहिमखांच्या प्राणोत्क्रमणाची मोठ्या उत्सुकतेनें मार्गप्रतीक्षा करित बसली..

कांहीं वेळानें ही सर्व मंडळी इबराहिखांच्या गाडीपाशीं येऊन कानोसा घेऊं लागली. त्यांनां जवळ आलल पहातांच इबराहिमखां अधिकच दीन स्वरानें ह्मणाला " मरतो मरतों! मी आतां यांतून खास वांचत नाहीं! ह्या बैलांच्या गाडींत माझ्यानें निजवत नाहीं. पाठीला फार वेदना होतात. खाली जमिनीवर मऊसा बिछाना आंथरून मला निजवा! भुकेनें माझे प्राण चालले आहेत कुठून तरी एक मुर्गी आणून मला घाला. ''

एवढे बोलतांना इबराहिमखांला फार श्रम झाले. श्वासोच्छ्वास जोरानें होऊं लागला इबराहिमखांचा तो श्वासोच्छ्वास पाहतांच मनसुरअल्ली युसफअल्लीच्या कानांत हलकेच ह्मणतो " उचला, उचला! आतां वेळ नाही. साहेब आत्ता मरतील! ''

लगेच दोघांतिघांनीं इबराहिमखांचें प्रेत गाडींतून खाली कढलें! इबराहिम-खांला वाटले, हें आपल्याला खालीं बिछान्यावर निजविण्यासाठीं उचलून नेत आहेत तो बापडा अगदीं गहाळ झाला होता; बोलण्याची स्फूर्ती ह्या वेळीं त्याच्या अंगांत राहिली नव्हती; आणि बिछान्यावर निजविण्यासाठीं ज्या अर्थी आपले लोक आपल्याला नेत आहेत, त्याअर्थी त्यांनां आणखी काय सांगणार? आतां लवकरच एक सबंध मुर्गी खाऊन आपण ताजेतवानें होऊ, या मनोराज्यांत त्या तशा वेदनांतहि तो मिटक्या मारित स्वस्थ होता; परंतु वरील मंडळीनें त्याला एकदम दुकानाच्या मागील बाजूस खोदलेल्या खांचेंत नेऊन निजविलें! यावेळीं तेथे काळोख होता. इबराहिमखांनें डोळे मिटून घेतले होते. थडगार भुसभुशीत मातीवर निजतांच त्याला आपण मऊ बिछान्यावरच निजलों आहों असें वाटलें, ह्मणून तो कांहा बोलला नाहीं. युसफअल्लीनें इबराहिमखांच्या नाकावर बोट

धरून पाहिलें, तों त्याला श्वासाचा भास झाला नाहीं. त्यानें सोबत्यांस सांगितलें " झालें, आटोपलें ! साहेब आपल्याला सोडून गेलें ! "

साऱ्या मंडळीनें दुःखाचा एकच हंबरडा फोडून भरभर खांचेंत माती लोटली व खांच भरतांच माती पायानें तुडवून तुडवून जमीन पूर्ववत् करून खिन्न मनानें मंडळी दुकानांत परत आली. आपल्या धन्याच्या ह्या अकाली आणि दुःखद मृत्युबद्दल सर्वजण फारच हळहळत होते ! एकापेक्षां एकेक आपल्या शोकाचे प्रदर्शन करूं लागला व धन्याचे एकेक गुण आठवून मोठमोठ्यानें हंबरडे फोडूं लागला. कांहीं मंडळी आहाराची तयारी करण्यांत गुंतली होती, हे पहिल्याने सांगितलेच आहे. त्यांनीं शिजविलेलें अन्न निवून गार होऊं लागलें तरी कोणीहि जेवावयास म्हणून उठेना. धन्याच्या मृत्यूच्या दुःखापुढें जेवण काय आणि खाणें काय, कोणाला कांहींच सुचत नव्हतें ! शेवटीं आपण जेवावयास उठत नसल्यास मन्सुरअल्ली पाणीहि प्यावयास राजी नाहीं हें पाहून केवळ त्याच्यासाठीं म्हणून युसफअल्ली फक्त घोंटभर पाणी पिण्यास कबूल झाला ! अकबरअल्लीसाठीं इलाहिबक्षानें आपला शोक गिळला, फत्तेखां दुसऱ्या एकासाठीं कबूल झाला व शेवटीं ही मंडळी केवळ दुसऱ्यासाठीं म्हणून घोंटभर पाणी प्यावयाला व घांसभर अन्न खावयाला एकदांची उठली. जेवतांनाहि बिचारे एकसारखे रडत होते दुःखानें त्यांचें चित्त इतकें व्यग्र झालें होतें कीं, त्या दुःखभरांत शेवटीं वाढणाऱ्यांच्या वांट्यास कांहींहि अन्न राहिलें नाहीं, हें देखील त्यांनां कळलें नाहीं ! वाढपी बिचारे त्या रात्रीं उपाशीं राहिले. दुसरे दिवशीं सकाळीं ही मंडळी इबराहिमखांच्या कबरेस वंदन करून स्वदेशीं गेली !



"बिचाऱ्या वृद्ध असफकाकांचें तोंड रक्तबंबाळ झालें व इकडे नापितराज सर्फराजखां आणि नासीर यांचें पोट हंसतां हंसतां फुटूं लागलें." ( पृष्ठ १००. )

## प्रकरण ९ वें.

# गव्हर्नर जनरलचें कौन्सिल.

There is a tide in the affairs of men.

—*Julius Cæsar.*

मागील प्रकरणांत वर्णिलेल्या गोष्टीस आतां महिन्यावर दिवस झाले. निरनिराळ्या वर्तमानपत्रांत विजयगंजच्या युद्धाचीं निरनिराळीं वर्णनें प्रसिद्ध होऊं लागलीं व लोकांत कांहीं काळ ह्याच विषयाची चर्चा सुरू झाली.

'मॉफ्युसल अखबार' वर्तमानपत्राने प्रसिद्ध केलेः "गेल्या फेब्रुवारीच्या २ तारखेस अयोध्येच्या बादशहानें पाठविलेल्या इंग्रज सैन्याची सीतापुरच्या राणीच्या सैन्याशीं निकराची लढाई झाली. या लढाईची समग्र हकीगत अद्याप आमच्या हातीं आली नाहीं; तथापि आमच्या बातमीदाराकडून कळते कीं, या युद्धांत राणीने अपूर्व पराक्रम करून इंग्रजांच्या सैन्याचा पुरा मोड केला. इंग्रज सेनेचा मुख्य अधिकारी मेजर स्मिथ ह्यानें राणीच्या तरवारीला आपली मान अर्पण करून धारातीर्थी शयन केलें. उभय पक्षांकडील अनेक लोक या युद्धांत पतन पावले. असंख्य जखमी झाले. सविस्तर हकीगत लवकरच प्रसिद्ध करण्यांत येईल."

'दिल्ली गॅझेट' वर्तमानपत्रांत पुढील मजकूर प्रसिद्ध झाला:-"सरकारी कर वसूल करण्यासाठी तालुकदाराच्या मदतीस गेलेल्या इंग्रज सैन्याची सीतापुरच्या राणीच्या सैन्याशीं भयंकर लढाई झाली. या युद्धांत राणीचा पूर्ण पराजय होऊन ती नेपाळाकडे पळून गेली. इंग्रजांचे फक्त तीनच इसम जायां होऊन सात इसम जखमी झाले; परंतु राणीच्या सैन्यांतील पांचशांवर लोक ठार होऊन हजारो जखमी झाले. बादशहाचे तालुकदार इभराहिमखां या युद्धांत पतन पावले. युद्ध आटोपल्यावर कित्येक दिवस सारखा पाऊस पडत होता. या पावसांत मेजर स्मिथला मजल दर मजल करित जावें लागल्यामुळें त्याचे हाल झाले व पावसांत भिजल्यामुळें त्याला तापानें गांठलें. बेरूच येथें पोहोचण्यापूर्वी रस्त्यांतच मेजर स्मिथ साहेबांचा या तापानें

---

*मनुष्यांच्या आयुष्यसागरांत एक भाग्यलहरी येत असते.

—ज्युलियस सीझर.

दु:खद अंत झाला. मेजर स्मिथच्या या अकाल मृत्यूनें आपल्या एका निम्मकहलाल, कार्यदक्ष, चतुर, बुद्धिमान् आणि शूर सेनापतीला ईस्ट इंडिया कपनी मुकली, ही अत्यंत दु:खाची गोष्ट होय. ईश्वर मृताच्या आत्म्यास शांति देवो."

'मॉफ्युसल अखबार' ने पुन: लिहिलें "आमच्या बातमीदाराच्या लिहिण्यावर भरंवसा ठेवून सीतापुरच्या राणीच्या हातून मेजर स्मिथ लढाईत मारले गेल्याचें वर्तमान गेल्या अंकीं आम्हीं प्रसिद्ध केलें होतें; परंतु ती बातमी साफ खोटी असल्याचें आम्हांला आतां खात्रीपूर्वक कळून आलें आहे व अशी केवळ खोटी बातमी आमच्या पत्रांत प्रसिद्ध झाल्याबद्दल आम्हांला अत्यंत दु:ख वाटतें. मेजर स्मिथ हे तापानें आजारी पडून मरण पावले. तालुकदार इबराहिमखां राणीच्या लोकांकडून घायाळ झाला होता, त्याच्या लोकांनीं त्याला मोठ्या व्यवस्थेनें नेऊन त्याची अत्यंत कळकळीनें शुश्रूषा केली; परतु त्यांच्या ह्या कळकळीच्या शुश्रूषेचा कांहींएक उपयोग न होतां तीन दिवसांनीं तो बिचारा मृत्यु पावला. इबराहिमखांचा अंत्यविधि त्याच्या लोकांनीं मोठया सन्मानानें करून आपल्या धन्याविषयीं शेवटचें कर्तव्य इमानानें बजाविलें."

सुमारें दोन आठवड्यांनंतर, ह्मणजे फेब्रुआरी महिन्याच्या अखेरीस, हीं सर्व वर्तमानपत्रें कलकत्ता येथे जाऊन पोहोंचली. कलकत्त्यास त्या वेळीं John Bull 'जॉन बुल,' Bengal Harkara 'बंगाल हरकरा' आणि Calcutta Qourier 'कलकत्ता कुरिकर' या नावाचीं तीन वर्तमानपत्रें प्रसिद्ध होत होतीं. 'जॉन बुलने' 'मॉफ्युसल अखबार' 'दिल्ली गॅझेट' ह्यांत प्रसिद्ध झालेल्या बातम्यांच्या आधारें विजयगंज येथील युद्धाचे बाबतींत एक झणझणीत लेख लिहून विजयगंजच्या या युद्धाला अनुलक्षून अयोध्येच्या एकदर राज्यकारभारासंबंधीं आणि तेथील परिस्थितींसंबंधीं कडक टीका केली. शेवटीं त्यानें लिहिलें होत "अयोध्येंत सांप्रत चाललेली झोटिंगपादशाही, भयंकर अत्याचार व प्रजेचा होत असलेला असह्य छल या सर्वांचे ईस्ट इंडिया कंपनीचा आणि कंपनीच्या नोकरांचा लोकांकडून पैसे पिळून काढण्याचा अनिवार मोह, हेंच वास्तविक कारण आहे. ईस्ट इंडिया कंपनीचे नोकर अयोध्येच्या दुर्बळ प्रजेला दरवडेखोरांसारखे निर्दयतेनें लुटित आहेत, असें आह्मी बिनदिक्कत आणि स्पष्टपणें ह्मणतों."

'बंगाल हरकरा' वर्तमानपत्र सरकारपक्षाचें समर्थन करण्यास सरसावलें. त्यानें लिहिले "आमचे विद्वान् बंधु 'जॉन बुल शेवटीं बुल (बैल) च्या जातीस्वभावावर

ाऊन विजयगंजाच्या झटापटीचे बाबतींत कांहींचे बाहींच डरकणे फोडित आहेत, ाबद्दल आह्मांला त्यांची कींव येते. प्रस्तुत गोष्टीशीं ईस्ट इंडिया कंपनीचा अथवा ंपनीचे नोकरांचा अर्थाअर्थी कांहींएक संबंध नाहीं. अयोध्येंत अंदाधुंदी आहे ही गोष्ट नेर्विवाद आहे; परंतु ईस्ट इंडिया कंपनीचा ह्यांत यत्किंचितहि दोष नाहीं. कंपनी रकारानें अयोध्येच्या राजास पुष्कळ संधि देऊन पाहिलें. परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं व होण्याचेहि चिन्ह दिसत नाहीं. यापुढेंहि कंपनी सरकार अयोध्येची राज्यसत्ता सर्वस्वी आपल्या ताब्यांत घेण्याच्या आपल्या पवित्र कर्तव्यांत कुचराई करील, तर हजारों असहाय लोकांच्या नाहक छलाचें भयंकर पातक तिच्या माथीं येणार आहे. अयोध्येच्या लोकांचें दुःख कमी करण्यास कंपनीनें यत्किंचितहि दिरंगाई करूं नये, सर्व कारभार ताबडतोब आपल्या हातीं घ्यावा, अशी आम्ही आग्रहपूर्वक शिफारस करतों."

'कलकत्ता कुरियर' नें वरील दोघांत मध्यस्थी करण्याचें काम पत्करिलें. त्यानें लिहिलें "अयोध्येच्या राज्यकारभाराबाबतींत ईस्ट इंडिया कंपनी दोषी असली, तथापि सीतापुरच्या जमीनदारांच्या कृतीचें आमच्यानें मडण करवत नाहीं. यांनीं आजपर्यंत केव्हांहि सरकारचा कर दिला नव्हता. अर्थात्, अशा प्रसंगीं सैन्य पाठविण्याशिवाय राज्यांत बंदोबस्त ठेवण्यास दुसरा मार्गच राहिला नव्हता."

या वेळीं कलकत्यांत 'समाचार चंद्रिका' नांवाचे देशी भाषेत एक वर्तमानपत्र प्रसिद्ध होत असे. या 'चंद्रिके'नें या बाबतींत लिहिले "आह्माला जी खात्रीपूर्वक बातमी कळली आहे तिच्या आधारावर आह्मी आमच्या वाचकांस कळवितों कीं, सीतेसारखी सच्चरित्र सीतापुरची राणी नारायणकुमारी स्वतः हातांत खड्ग धारण करून अश्वारूढ होऊन रणभूमीवर प्राप्त झाली होती. त्या वेळची तिची ती भैरवी मूर्ति पाहून जणूं ही प्रत्यक्ष भगवती गिरिकन्या महिषासुराच्या वधार्थ सिंहावर आरूढ होऊन समरभूमीवर प्राप्त झाली आहे कीं काय, असेंच लोकांस वाटलें. वज्राप्रमाणे शेंकडों तोफांच्या गोळयांचा राणीच्या मस्तकावर सारखा वर्षाव होत होता; परंतु काय आश्चर्य सांगावें! राणीजवळ येतांच त्या गोळयांचें चूर्ण होऊन ते जमिनीवर पडत असत! इंग्रजांच्या फौजेचा सेनापति मेजर स्मिथ दृष्टीस पडतांच राणी भयंकर गर्जना करून त्याच्यावर धावली व तरवारीच्या एका फटकाऱ्यासरशीं क्षणार्धांत त्याला येशूच्या दर्शनास पाठवून दिलें! राणी नारायणकुमारीसारख्या शूरवीर स्त्रिया आमच्या

दृष्टीसमोर असतां आमच्या देशांतील स्त्रियांना भीरु असें कोणाच्यानें ह्मणवेल ! भीमार्जुनांचें तेज, विश्वामित्रपरशुरामादिकांचा पराक्रम; अद्यापीहि आमच्या अंगीं मूर्तिमान् वास करित आहे. भारतवासी नष्टवीर्य झाले असें ह्मणण्याचें धाडस याउपर कोणाच्यानेंहि करवणार नाहीं ! आजहि सुरधुनी भागीरथी गंगेच्या प्रवाहाप्रमाणें आर्यांचें रक्त आमच्या शरीरांतील नाड्यामधून जोरानें वाहत आहे, सळसळत आहे—इत्यादि इत्यादि. ”

जवळ जवळ एक महिनापावेतों निरनिराळ्या वर्तमानपत्रांत निरनिराळ्या प्रकारें या विजयगंजच्या युद्धासंबधीं कडाक्याची चर्चा चालली होती. इकडे ह्या गडबडीच्या पूर्वी कांहीं दिवस अयोध्येच्या भावी व्यवस्थेसंबंधीं कोर्ट ऑफ डिरेक्टर्सकडून एक लांबलचक खरीता गव्हर्नर जनरलकडे येऊन थडकला होता. या वेळीं लार्ड विल्यम बेंटिक हा गव्हर्नर जनरलच्या जागीं असून सर चार्लस थिओफिलास मेटकॉफ हा त्याच्या कौन्सिलचा मेंबर होता. ह्यांच्या राज्यकारभाराचें धोरण पाहून हिंदुस्थानचे लोक यांना ‘ बुध राजा, आणि बृहस्पति मंत्री ’ असें ह्मणत असत.

लवकरच गव्हर्नर जनरलनें अयोध्येच्या भावी व्यवस्थेसंबंधीं विचार करण्याकरितां कौन्सिलची बैठक भरविली. दरवाजे बंद करून या कौन्सिलच्या बैठकींत कडाक्यानें चर्चा चालू झाली या सभांमध्यें कोणीं काय सूचना आणली, कोण काय बोलला, व त्याचा निर्णय काय झाला, हें लोकांस कळण्यास कांहींच मार्ग नव्हता लोकांत अशी कंडी उठली होती कीं, कोर्ट ऑफ डिरेक्टर्सनीं अयोध्या ब्रिटीश राज्यांत सामील करण्याविषयीं हुकूम पाठविला होता; परंतु लॉर्ड विल्यम बेंटिक त्या गोष्टीला असंमत होऊन त्यानें कोर्ट ऑफ डिरेक्टर्सनां लिहिलें:—

* “ आमच्या राज्यपद्धतीपेक्षां मुसलमानांची राज्यपद्धति पुष्कळ बाबतींत श्रेष्ठ प्रकारची होती. मुसल्मान राजांनीं हिंदुस्थानांतील प्रजेस सर्व प्रकारचे

---

*Lord william Bentinck in his evidence before aCommittee of the House of Commons in 1837, said —“ In many respects the Mahomedans surpassed our rule ; they admitted them ( the natives ) to all privileges; the interests and sympathies of the conquerors and the conquered became identified. Our policy, on the contrary, has been the reverse

अधिकार दिले होते. मुसलमानांचे सत्तेखालीं जेते आणि जित या उभयतांतील हित-संबंध आणि सहानुभूति अगदीं एकरूप होऊन गेलीं होतीं. परंतु आमची राजनीति याच्या अगदीं उलट ह्मणजे अतिशय बेपर्वाईची, आपमतलबी आणि निष्ठुर अशी आहे. आमची राजसत्ता जुलमी, हेकेखोर आहे. आह्मीं एतद्देशीयांस बहिष्कृत करून हक्क वगैरे सर्व कांहीं केवळ स्वार्थबुद्धीनें स्वतःकरितां आपल्या मुठींत राखून ठेविले आहेत.''

सर चार्लेस थिओफिलास मेटकॉफ यानें तर ह्याहूनहि जोरानें डिरेक्टर्सच्या हुकुमाचा निषेध केला होता. त्यानें लिहिलेल्या मिनिटांत पुढील मजकूर असल्याची लोकवार्ता होती " परमेश्वरच राज्ये अर्पण करतो व तोच राज्यें हिरावून नेतो. या देशांतील प्रजेसंबधीं आह्मीं जी राजनीति अवलंबन केली आहे तिनें कधींनाकधीं असा एक दिवस येईल कीं, त्या दिवशीं प्रजेच्या कृतज्ञतेऐवजीं त्यांच्या आपसंतापांनीं उद्विग्न चित्तानें ह्या देशाला आह्मांला कायमचें अंतरावें लागेल!''

या वादविवादाचा आणि गुप्त खलबताचा, गव्हर्नर जनरलानें स्वतः अयोध्येंत जाऊन तेथील परिस्थिति प्रत्यक्ष पहावी, असा उघड परिणाम घडलेला लोकांस कळून आला. त्याप्रमाणें कलकत्त्याहून रेसिडेंटमार्फत बादशाहाकडे लखाण गेले कीं, ''गव्हर्नरजनरलची स्वारी आगष्ट महिन्यांत अयोध्येंत येणार आहे. तोंपर्यंत रयते-कडून कर वगैरे वसूल करण्यासाठीं सैन्याचा उपयोग करूं नये.''

इबराहिमखांच्या मृत्यूची खबर लखनौ येथें पोंहचतांच मेहदअल्लीखानें दुसरी एक इंग्रजांची फौज सीतापुरावर पाठविण्याची जय्यत तयारी केली होती; परंतु हें सैन्य रवाना होण्यापूर्वीच गव्हर्नरजनरलचा वरील हुकूम लखनौ येथें पोहोंचला. अर्थात्, मग सीतापुरवर इंग्रजांच्या सैन्याचा हल्ला झाला नाही राणी नारायणकुमारी कांहीं कालपर्यंत निर्विघ्नपणें आपल्या महालांत राहूं शकली.

---

of this,—cold, selfish and unfeeling—the iron hand of power on one side, monopoly and exclusion on the other.

## प्रकरण १० वें.

## असफ काका.

* " welcome, my uncle Usoph ! we have missed you too long at our table. "

—W. *Knighton*.

वसंतऋतु सपत आला होता. दिवसेदिवस उन्हाळा अधिकाधिक असह्य होऊं लागला होता. सकाळीं नऊ वाजल्यापासून तो सूर्यास्त होईपर्यंत घरांतून बाहेर पडणें ह्मणजे लोकांस प्राणसंकट वाटत होतें. परतु सकाळच्या वेळीं आणि संध्याकाळच्या वेळीं रस्ते, घाट, बागबगीचे इत्यादि जागांची साफसफाई करण्याकडे हजारों लोक गुंतल्याचें दृष्टोत्पत्तीस येत होते. फरीदबक्ष राजमहाल, शहानजीब इमांबरा आणि मोतिमहाल विलासमंदिर वगैरे इमारती शृंगारण्याचें काम धुमधडाक्यानें चालले होते. नगरांत जिकडे तिकडे एकच गडबड उडून गेली होती. कंपनी सरकारचे गव्हर्नर जनरल लार्ड विल्यम बेन्टिक यांची स्वारी आगष्ट महिन्यांत लखनौ येथें यावयाची असल्यामुळेंच ही सारी गडबड आणि धांदल चालली होती, हें वाचकांच्या लक्ष्यांत आलेच असेल. गव्हर्नर जनरलच्या आगमनानिमित्त लखनौनगरी शृंगारण्याचें काम कित्येक महिन्यांपासून सारखें जारीनें चाललें होतें. या कामासाठीं तीस लक्ष रुपये मंजुर झाले असून नायब दिवाण राजा मेवाराम सिंह याच्याकडे ही कामागिरी सोपविण्यांत आली होती. या मेवारामानें आपल्या हाताखालीं चारपांच इंग्रज इजिनियर आणि शेंकडों देशी कारागीर व हजारों मजुर घेऊन एकंदर शहर सुसाज्जित करण्याची जिवापाड मेहनत चालविली होती.

अजबखाना आणि दरबारहॉल सुसज्जित करण्याचा भार विलायती हजाम सर्फराजखां याच्या शिरावर होता. खान्याचे नानाप्रकारचे मूल्यवान पदार्थ आणि कलकत्त्याहून तऱ्हेतऱ्हेचीं मद्यें आणण्यासाठीं त्यानें एक लक्ष रुपयांचें बिल सादर

---

*"यावें, असफकाका, यावें! आज कैक दिवसांत आह्मांला आपल्या पंक्तिसुखाचा लाभ मिळाला नाहीं."

केलें. नाना जातीचे पशुपक्षी वगैरेची पशुशाळेंत भरती करण्याकडे त्यानें बरीच रक्कम खर्चिली होती. गव्हर्नर जनरल साहेबांस निरनिराळया पशूंच्या युद्धाची मौज दाखवावयाची होती अर्थात्, त्यासाठी लागणाऱ्या खर्चाचा समावेश वरील तीस लक्ष रुपयांत होणें अशक्य होतें, हे उघड आहे!

कचनींच्या नाचगाण्याची व्यवस्था करण्याची कामगिरी अर्थातच राजा दर्शनसिंहानें पत्करली होती. पंजाबहून, काश्मीरहून लावण्यवती नर्तकी, कंचनी आणण्यास दर्शनसिंहानें लोक पाठविले होते. सर्वांपेक्षां राजा दर्शनसिंहाची कामगिरी अत्यंत नाजुक, महत्त्वाची आणि तशीच अवघड होती, हें निर्विवाद आहे. असो.

आमच्या या कथानकाचे वेळीं अयोध्येचा बादशहा नासिरुद्दीन हैदर फरिदबक्ष राजमहालांत रहात असे. हा राजमहाल जुन्या पद्धतीने बांधलेला होता. गोमती नदीच्या किनाऱ्यावर एक प्रशस्त, विशाल, बळकट असा वाडा होता व हाच फरिदबक्ष राजमहाल होय. याच्या एका भागांत अंत.पुर होतें. दुसऱ्या भागांत दरबार हॉल होता. तिसऱ्या भागांत बादशहाची खास कचेरी होती. दरबारहालच्या दरवाजांवर सुवर्णखचित मखमालीचे पडदे लोंबत होते. भिंतीवर बादशहाचा पिता, पितामह, व अन्य अन्य वजिरांच्या तसबिरी टांगल्या होत्या. मुख्य दरवाजाच्या समोरच बादशहाचे सिंहासन होतें. या सिंहासनावर मोत्यें, माणकें जडलेला सुंदर चांदवा होता व या चांदव्याखाली बसावयाची जागा होती. नासिरुद्दीनाचे वाडवडील या चांदव्याखालीं सिंहासनावर सोन्यामोत्यांनीं मढविलेल्या मूल्यवान् मखमालीच्या गादीवर विराजमान होत असत; परंतु नासीरला प्रत्येक गोष्ट इंग्रजी पद्धतीप्रमाणे करण्याचा आणि इंग्रजाचे रीतिरिवाजांप्रमाणे वागण्याचा अनावर मोह सुटला असल्यामुळें याच्या कारकिर्दीत सिंहासनावरील मखमालीची गादी जाऊन तेथें सुवर्णखचित हस्तिदंती खुर्ची आली होती. दरबारच्या वेळीं बादशहा या खुर्चीवर विराजमान होत असे. या खुर्चीच्या उजव्या हातास अशीच दुसरी एक खुर्ची होती व तिच्यावर इंग्रज रेसिडेंटची स्वारी विराजमान होत असे.

आज बादशहानें खास दरबार भरविला होता. अनेक अमीरउमरावांनीं दरबार हॉल गच्च भरून गेला होता. नायब दिवाण राजा मेवारामसिंह प्रभृति सरकारी अधिकारी दरबारास आलेल्या अमीरउमराव, इंग्रज वगैरे मंडळीस यथास्थानीं बसवित होते. कांहीं वेळानें लखनौच्या रेसिडेंटसाहेबांची गाडी दरवाजासमोर येऊन थडकली. हकीम मेहदअल्लीखां साहेबांचें स्वागत करण्यास दरवाजांत उभाच

होता. लगेच जवळच्या एका दिवाणखान्यांतून आपल्या आंग्ल दोस्तपंचायतनानें परिवेष्टित असा नासिरुद्दीन बादशहा येतांच दरबारांत जमलेले अमीर उमराव, इंग्रज उठून उभे राहिले व सर्वांनीं बादशहाला खडी ताजीम दिली. बादशहा सर्वांचे मुजरे घेत घेत सिंहासनावरील आपल्या खुर्चीवर जाऊन बसला. रेसिडेन्टहि त्याच्या उजव्या बाजूच्या खुर्चीवर विराजमान झाला. दरबारच्या वहिवाटीस अनुसरून लगेच रेसिडेंटनें चारपांच इंग्रज गृहस्थांस बादशहापुढें आणिलें. हातांत नजर घेऊन हे इंग्रज गृहस्थ बादशहापुढें उभे राहिले. त्यांच्या हातांतील सोन्यांच्या मोहरांच्या नजरेस बादशहानें अंगुलीस्पर्श करतांच वजीर मेहदअली ह्यांनें त्या मोहरा सिंहासनाच्या बाजूस असलेल्या एका सोन्याच्या ताटांत ठेवून दिल्या. नंतर बादशहानें उठून मोठ्या अदबीनें त्यांनां शेक-हँड केल्यावर ते आपापल्या जागीं जाऊन बसले. हे इंग्रज गृहस्थ स्वस्थानीं बसल्यावर अयोध्येंतील पिढीजाद अमीरउमराव, मोठमोठे सरदार, जमीनदार, जमिनीपासून लवून बादशहाला तीनतीनदा मुजरा करून नजर घेऊन सिंहासनापाशीं आले. या बड्या बड्या अमीरउमरावांनीं आणलेल्या मूल्यवान् नजरनजराण्याकडे बादशहानें ढुंकूनहि पाहिलें नाहीं, कीं, त्यांपैकीं एकाच्याहि नजरेला अंगुलीस्पर्श केला नाहीं. नायब दिवाण राजा मेवाराम सिंह हा ती नजर घेऊन सिंहासनासनापाशीं ठेवित होता. अमीरउमराव मोठ्या अदबीनें मुजरे करित होते. बादशहा सिंहासनावर बसल्याबसल्या हास्यमुखानें रेसिडेंटाशीं गप्पागोष्टी करित अमीरउमरावांच्या मुजऱ्यांस उगीच किंचित् मान हालवित होता. कित्येकांच्या मुजऱ्यांकडे तर त्याचें लक्ष्यहि नव्हतें; अगर लक्ष्य देण्याची त्याला आवश्यकता वाटली नाहीं.

नजराण्याचा विधि उरकल्यावर बादशहानें उठून रेसिडेंटच्या गळ्यांत एक सुवर्णहार घातला रेसिडेन्टनेंहि तसाच एक हार नासीरच्या गळ्यांत घातला. तदनंतर उभयतां सिंहासनावरून उतरून खालीं आले. बादशहानें आपल्या सवंगड्यांस, अमीरउमरावांस रौप्यहार अर्पण केले. हार अर्पण करण्याचा हा विधि संपतांच रेसिडेंटनें 'गुडबाय' ह्मणून बादशहाचा निरोप घेतला. बादशहा त्याला पोंचविण्यास दरवाजापर्यंत गेला. रेसिडेन्ट गाडींत बसतांच 'खुदा हाफेज' ह्मणून बादशहानें त्याला निरोप दिला. तत्क्षणीं दरबार विसर्जन झाला.

आतां नासीर आपल्या खास दिवाणखान्यांत लगबगीनें येऊन त्यानें आपला राजमुकुट एकीकडे फेंकून दिला, उतावीळ होऊन घाईघाईनें दरबारचे कपडे उतरून इकडे तिकडे टाकले व एका आराम खुर्चीवर धाडकन् अंग टाकून तो हुश्श हुश्श करित पडला. आज दरबारांत कराव्या लागलेल्या अत्यंत मेहनतीच्या कामानें तो अगदीं थकून गेला होता! लवकरच त्याचें दोस्तमंडळ तेथें आलें. त्यांनां पहातांच नासीर ह्मणाला "छे, फारच श्रम झाले बुवा. तहानेनें माझा घसा कोरडा पडला आहे!" चतुर फिरंगी न्हावी सर्फराजखानें तत्क्षणीं बर्फ घातलेलें क्लॅरेटचें एक ग्लास बादशहाच्या तोंडापुढें धरलें. बादशहा तें घटघटां पिऊन गेला. लगेच फिरंगी बबर्चीनीं टेबलावर खाना मांडला. जवळच्या एका दिवाणखान्यांतून लगेच मूल्यवान् वस्त्राभरणांनीं मंडित अशा सहा असीम लावण्यवति तरुण युवती तेथें प्राप्त झाल्या. त्यांतील दोघी सुंदरी मयुर-पुच्छांनीं मंडित असलेले पंखे हातांत घेऊन नासीरच्या दोन्हीं बाजूंस उभ्या राहून त्याला वारा घालूं लागल्या. तिसरी सोन्याचा हुक्का हातांत घेऊन बादशहा-जवळ उभी राहिली. बाकीच्या तिघी बादशहाच्या खुर्चीजवळच बसल्या होत्या. पहिल्या तिघी थकतांच ह्या बसलेल्या तिघी तें काम करित असत. त्यांनीं थोडी विश्रांति घेऊन ह्या दुसऱ्या थकतांच त्यांनां विश्रांति द्यावी व आपण पुनः कामास सुरुवात करावी, असा प्रकार चालला होता.

बादशहाचे आंग्ल दोस्तमंडळ यावेळीं येथे हजर होतें, हें वरती सांगितलेंच आहे. ही मंडळी यावेळीं मस्तकावर हॅट ठेवून बादशहापासून किंचित् दूर अदबीनें बसली होती. वरील सुंदरींच्या मुखकमलांकडे चोरूनहि दृष्टिनिक्षेप करण्याची सर्वांस सक्त मनाई असे. ह्मणून बादशहाच्या ह्या दोस्त मंडळास प्रारंभीं कांहीं काल वर सांगितल्याप्रमाणें गंभीर वृत्ति धारण करून मस्कावर हॅट घालून बसावें लागे. ह्या सुंदरी कंचनीवर्गांतील असत हें जरी खरें होतें, तथापि भाग्यक्रमानें यांतील कोणी कोणी बेगमपदावर आरूढ होत होत्या. त्यामुळें मुळापासूनच यांच्याशीं अयोध्येंतील लहानथोर साऱ्या लोकांस मोठ्या अदबीनें वागावें लागे. असा जरी वास्तविक प्रकार होता, तरी नासीरच्या दोस्त पंचायतनास पूर्णपणें ठाऊक झालें होतें कीं, बादशहानें क्लॅरेटचें अगर ब्रांडीचें आणखी एक ग्लास झोंकतांच तो नाना-प्रकारचे अश्लील चाळे करील व मग आपल्यालाहि डोक्यावर टोपी ठेवण्याचें कारण राहणार नाहीं व बादशहाच्या ह्या भावी बेगमांशीं मनसोक्त थट्टाविनोद करण्यास

कसलीच हरकत नाहीं. त्याचप्रमाणें बादशहाच्या खास दरबारचा आणखीहि एक कडक नियम असे. खुद्द बादशहाने हसण्यास आरभ करण्यापूर्वी कोणींहि हसतां कामा नये. परतु नासीर हंसतांच हंसण्याचें वास्तविक कारण नसलें तरी सर्व मंडळीस पोट धरधरून हंसावेंच लागे! बादशहाच्या दरबारचा हा नियम उल्लंघन करण्याची एतद्देशीय काय, इंग्रज काय, कोणाचीहि प्राज्ञा नव्हती!

दोनतीन ग्लास घशाखालीं उतरतांच बादशहानें राजा दर्शनसिंहास हांक मारली. राजा दर्शनसिंह हा हिंदु आहे; आपल्या टेबलावरील प्लेटींत गोमांस आहे; हिंदूनां गोमांसाचें दर्शन अत्यत भयप्रद वाटतें; ह्या गोष्टींचे स्मरण राहण्यास नासिरुद्दीन या वेळीं ह्या लोकीं कोठें होता! त्याने दर्शनसिंहास आपल्यापाशीं येण्याची ताबडतोब आज्ञा केली सार्वभौम अयोध्येच्या बादशहाची ती आज्ञा! तिचें उल्लघन करण्याचे सामर्थ्य या पृथ्वीवर कोणाच्या अंगीं आहे? बिचारा दर्शनसिंह उपयातर नसल्यामुळे बादशहाचे खान्याच्या दिवाणखान्यांत दरवाजापाशीं आला दर्शनसिंहाला पहातांच बादशहाने विचारलें "तुझ्या त्या काश्मिरी कंचनी कुठें आहेत?"

दर्शनसिंह हात जोडून ह्मणाला "मुलके जामानिया! दोन महिन्यांपूर्वी पंजाबांतून दोन नर्तकी आणण्यासाठीं मनुष्य पाठविले होते. ते मनुष्य नर्तकींसह पंजाबांतून इकडे यावयास निघाल्याचें पत्र घेऊन जासूद आला आहे. ही मडळी कानपुरपर्यंत आली आहे. आणखी आठ दिवसांचे आंत इकडे खास येईल."

"अन् नाहीं आली तर?"

"एका आठवडयाच्या आंत येतीलच मुलके जमानिया!"

"आठ दिवसांत कंचनी नाहीं आल्या तर तुला बरतर्फ करण्यांत येईल, ध्यानांत ठेव!"

"जी हुजुर मुलके जामानिया!" असे ह्मणून नाक दाबित दाबित राजा दर्शनसिंह निघून गेला. गोमांसाचा उग्र दर्प त्याच्या नाकाला सहन झाला नाहीं.

राजा दर्शनसिंहाला हांक मारण्यापूर्वीच नासीरनें आपला वृद्ध चुलता असफ काका याला बोलावण्यासाठीं स्वार पाठविला होता. स्वार असफ काकांच्या वाडयांत जाऊन ह्मणाला "आपल्याबरोबर भोजन करण्यासाठीं मुलके जामानियांनीं आपल्याला आतांच्या आतां बोलाविलें आहे!"

स्वाराच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच असफ काकांचे प्राण भीतीनें उडूनच गेले! विलायती व्हावी आपली कोण अप्रतिष्ठा करील न जाणो, ही त्यांनां मोठी भीति

पडली. दोनच दिवसांपूर्वी ह्या न्हाव्यानें सादत काकांबरोबर नृत्य करून नाचतां नाचतां त्यांची पगडी उडवून दिली होती. एवढेंच नव्हे, तर बादशहाला हंसविण्यासाठीं या न्हाव्यानें सादत अल्लीचे कपडे, इजार वगैरे फाडून सर्व मंडळी देखत त्याला दिगंबर केलें होतें! म्हाताऱ्या असफ काकांला आपली अशी शोभा करून घेणें अर्थातच आवडत नव्हतें. स्वाराला तो नम्रपणें म्हणाला "मी म्हातारा झालों आहे, माझे दांत गळून पडले, केश पिकले; बादशहाला म्हणावें, आपल्या नाचरंगांत मला म्हाताऱ्याला काय गोडी वाटणार आहे! मला क्षमा करा, म्हणून माझी त्यांनां विनंति कळवा."

स्वार माघारा आला; परंतु असफ काकांची ही विनंति बादशहानें ऐकिली नाहीं. काकांला घेऊन येण्यासाठीं आतां पंचवीस स्वार रवाना झाले! असफ काका आतां सबब सांगण्यास मार्गच राहिला नव्हता. कारण, काका स्वखुषीनें न आल्यास त्यांनां कैद करून आणण्यास स्वारांस हुकूम झाला होता! शिवाय, नासीर हा अयोध्येचा सार्वभौम बादशहा! बादशहाची मर्जी रुष्ट झाल्यास असफ काकांची जहागीर जप्त होईल. असफ काकांस अयोध्येतून हद्दपार व्हावे लागेल, नव्हे वेळीं प्राणांसहि मुकावे लागेल! बिचारे काका उपायांतर नसल्यामुळें जीव मुठींत घेऊन भीतभीत बादशहाच्या खान्याच्या दिवाणखान्यांत आले. नापितराजांनीं काकांचें स्वागत करून सरबत म्हणून सांगून ब्रांडीचे तीन ग्लास त्यांनां बळेंच पाजले. काकांनां हे सरबत आणखी पिण्याचे सामर्थ्य नव्हतें; परंतु खुद्द बादशहानें सरबत म्हणून ब्रांडीचे ग्लास काकांच्या तोंडाशीं धरतांच त्यांनां तें गट्ट करावें लागले! ज्ञानशून्य होऊन काकांची स्वारी खुर्चीवर पडली. विलायती न्हाव्याच्या विनोदबुद्धीस आतां स्फुरण चढलें. त्यानें दोन लहानशा काठ्या आणून त्या काकांच्या दाढीस घट्ट बांधल्या. नंतर त्या दोन्ही काठ्या खुर्चीच्या दोन्ही हातांस जोरानें मजबूत बांधल्यावर बादशहासह ही सर्व मंडळी गंमत पाहूं लागली. काका जरा इकडे तिकडे सरकले, कीं, त्यांच्या दाढीला हिसका बसे व मनस्वी वेदना होऊन अचेतनावस्थेंतच ते विव्हळत व ती या मंडळीला मोठी गंमत वाटे! एवढयानेंहि ह्या मंडळीच्या मनाचें समाधान झालें नाहीं. विलक्षण डोक्याच्या विलायती न्हाव्यानें काकांची थट्टा करण्यास आतां एक अजबच युक्ति काढली. काका बेभान होऊन पडलेल्या खुर्चीखालीं त्यानें एकदम तीनचार मेणबत्या पेटवून ठेविल्या. मेणबत्यांच्या त्या तीव्र ज्वालांनीं काकांचे अंगास चटका

बसतांच त्यांनीं खुर्चीवरून जोरानें उठण्याचा प्रयत्न केला व त्या जोरासरशीं त्यांच्या एका बाजूच्या दाढीचे केश समूळ उपटले गेले ! बिचाऱ्या वृद्ध असफ काकांचे तोंड रक्तबंबाळ झालें व इकडे नापितराज सर्फराजखां आणि नासीर यांचें पोट हंसतां हंसतां फुटूं लागलें !

सर्फराजखांशिवाय नासीरच्या दुसऱ्या फिरंगी दोस्तांस हा प्रकार मनापासून जरी आवडत नसला, तरी त्या बिचाऱ्यांचा कांहीं इलाज चालत नव्हता. आम्हीं मागें सांगितलेंच आहे, कीं, हंसण्याचें कारण असो वा नसो, एवढेंच नव्हे, तर हंसण्या ऐवजीं दुःख करण्याचा जरी प्रसंग असला, तरी बादशहा हंसतांच बाकीच्या सर्व मंडळीनें खो खो हंसलेंच पाहिजे, असा नासीरच्या खास दरबारांतील नियम होता; आणि हा नियम उल्लंघण्याची कोणाची ताकद होती? एतद्देशीयांपैकीं कोणी तसा उद्दामपणा केल्यास त्याचें तत्काळ डोकें उडण्याचा संभव होता. फिरंगी लोकांस डोकें उडण्याची एवढी फिकिर नसली तथापि पोटाची होती ! या फिरंगी दोस्तांस बादशहाकडून दरमहा पंधराशें रुपयांचा तनखा मिळत असे. केवळ पंधराशें रुपयेच त्यांनां मिळत, असें नाहीं; तर दरबारच्या वेळीं, सणाउत्सवाच्या प्रसंगीं व एखाद्या वेळीं मुल्केजामानियांची स्वारी खुष झाली म्हणजे एकेकाला प्रत्येक वेळीं पांचपांच, दहादहा, नव्हे पंचवीसपन्नास हजारांपर्यंत बक्षिस मिळत असे! म्हणजे वर्षाकांठीं लाख दोन लाख गेला बाजार प्रत्येकाच्या पदरीं पडत. याशिवाय बादशहाच्या टेबलावर बसून सांजसकाळ यथेच्छ चरावयास मिळत असे तें वेगळेंच ! स्वारीशिकारीचे वेळीं तर यांनां जी चैन उपभोगावयास मिळत होती तिचें वर्णनच करतां येत नाही. या सर्वांवर पाणी सोडण्यास तयार होण्याइतके हे उदार नव्हते. तेव्हां अर्थातच वरील प्रसंगासारख्या वेळीं ते पोट धरधरून हंसणार नाहींत तर बिचारे काय करतील ?

गाझीउद्दीन हैदरानें नासिरुद्दीनाला ठार करण्याचा बेत केल्या प्रसंगी नासिरुद्दीनाच्या चुलत्यांपैकीं ज्या कित्येकांनीं नासिरुद्दीनाचे प्राण वांचविण्याचा प्रयत्न केला होता, त्यांतील प्रत्येकास एकेका दिवशीं आपल्या पंक्तीचा लाभ देऊन नासिरुद्दीन त्यांची वरील प्रकारें संभावना करित होता. फिरंगी न्हाव्याच्या अपूर्व बुद्धिकौशल्यानें रोज नवी नवी थट्टा चालली होती. बादशहाच्या त्या करमणुकीचें विस्तारानें वर्णन करण्यास आम्हाला अवकाश नाहीं. वाचकहो, चला आपण कानपुर येथें गमन करूं.

## प्रकारण ११ वें.

# अशोकवनांत सीता.

दुःखार्ता रुदती सीता वेपमाना तपस्विनी ।
चिंतयंती वरारोहा पतिमेव पतिव्रता ॥

—सुन्दरकाण्डम् । रामायणम् ।

इ. स. १८५७ सालच्या बंडापूर्वी कानपुर हें काहीं मोठ्याशा प्रसिद्ध शहरांत गणलें जात नव्हतें. रोहिलेयुद्धानंतर इ. स. १५७७ साली कानपुर येथें इंग्रजी सैन्याच्या छावणी ( Cantonment ) ची व्यवस्था करण्यांत आली, व तेथपासून या शहराच्या व्यापाराची वगैरे भरभराट होत गेली. तरी अगदीं परवांपर्यन्त कानपुर मोठेसें प्रसिद्ध शहर नव्हतें. आमच्या कथानकाच्या प्रसंगीं तर कानपुरच्या आसपास चोर, दरवडेखोर, ठग इत्यादि लोकांनीं भयंकर उपद्रव मांडला होता.

कानपुर शहरांत वायव्येकडच्या भागांत इंग्रज लोक रहात असत. या भागांतील रस्ते, घरें, दुकानें, चौक अगदीं स्वच्छ व रमणीय होते. खुद्द शहरांतहि जागजागीं अनेक बगीचे होते. शहर मोठे विस्तीर्ण असून मोठमोठ्या श्रीमान् लोकांच्या भव्य हवेल्यांनीं त्याची शोभा वृद्धिंगत होत होती. अयोध्येच्या बादशहाचा सध्याचा सेनापति राजा दर्शनसिंह याचा पिता राजा जयपालसिंह हा पूर्वी या कानपुर शहरांत रहात होता त्याचा जन्म जरी रजपूत वंशांत झाला होता, तरी कालमहात्म्याप्रमाणें युद्धव्यवसाय सोडून देऊन त्यानें वणिग्वृत्ति स्वीकारली होती. राजा जयपालसिंहाला त्याच्या बापानें बराच पैसा ठेविला होता. व्यापारधंदा करून जयपालसिंहानेंहि विपुल पैसा मिळवून आपल्या वडिलार्जित संपत्तीची वृद्धि केली होती. आमच्या कथानकांतील प्रस्तुत गोष्ट घडण्याच्यापूर्वी सुमारें सहासात वर्षे वार्धक्यामुळें आपला व्यापारधंदा आटपून राजा जयपालसिंह आपल्या पुत्रासह लखनौपासून चारपांच कोसांवरील एका गांवीं जाऊन राहिला होता. जयपालची लहानशीच पण टुमदार हवेली, त्या हवेली भोंवती असलेला विस्तीर्ण बगीचा वगैरे जमीनजुमला कानपुर येथें अद्याप त्याच्याच मालकींत होता. त्या हवेलींत सांप्रत एक वृद्ध स्त्री रहात असे. दर्शनसिंह

ह्या वृद्ध स्त्रीला आई असें ह्मणत असे. ती वृद्धाहि दर्शनसिंहावर मुलाप्रमाणे प्रेम करी. असो.

सभोवार उंच तटानें परिवेष्टित अशा एका विस्तीर्ण बगीच्याचे मध्यभागीं एक दुमजली लहानशीच पण टुमदार अशी राजा जयपालसिंहाची हवेली होती. माडीवर एक मुख्य दिवाणखाना असून दुसऱ्या तीनचार खोल्या होत्या. तळमजल्यावर एका खोलींत दोन गाई बांधिल्या होत्या. दुसऱ्या दोन खोल्यांत बगीच्याची व्यवस्था पहाणारे दोघे माळी रहात. एका खोलींत स्वयंपाक घर होतें. वर जी वृद्ध स्त्री सांगितली, तिच्या सेवेस बुंदिया नांवाची एक स्त्री होती. बुन्दियाला सर्वजण दाई ह्मणून हांक मारित असत.

मागील प्रकरणांत वर्णिलेला बादशहाचा दरबार भरल्याच्या तिसरे दिवशीं दोन प्रहरच्या सुमारास पांचपन्नास मडळी हत्ती पालख्या, मेणे वगैरे वाहनें घेऊन राजा जयपालसिंहाच्या बगीच्याच्या दरवाज्यापाशीं आली. हवेलींत रहाणारी वृद्ध स्त्री यावेळीं नुकतीच भोजन उरकून माडीवरील दिवाणखान्याच्या खिडकींत आली होती. तिच्या दृष्टीस ते लोक पडतांच तिने बुन्दियाला हांक मारून म्हटलें " दाई ! पहा, पहा ! हत्ती, पालख्या घेऊन आपल्याकडे कोण येत आहेत ते ? मला वाटत, दर्शनन ह्या लोकांस पाठविलं असावं. आह्मांला लखनौला घेऊन जाण्याकरितां हे आले असावेंसं दिसतं."

त्या वृद्ध स्त्रीच्या आज्ञेप्रमाणें बुन्दिया दरवाजापाशीं चौकशी करण्याकरितां गेली. त्या लोकांपैकीं एकजण पुढें होऊन म्हणाला "आम्ही लखनौहून आलों आहों. राजा दर्शनसिंहांनीं आम्हांला पाठविलें आहे. माझें नांव साधुसिंह माईसाहेबांस खबर द्या."

दाईनें परत येऊन साधुसिंहाचा निरोप त्या वृद्ध स्त्रीस कळविला. दर्शनच्या ह्या विश्वासू साधुसिंह नोकरास ती वृद्ध स्त्री चांगल्या रीतीनें ओळखित होती. दिवाणखान्यांत त्या वृद्ध स्त्रीशिवाय आणखीहि दोन स्त्रिया यावेळीं बसल्या होत्या. त्यातील एकीचें वय चौदापंधरा वर्षांहून अधीक नसावेंसें दिसत होतें. दुसरी वीस वर्षें वयाची होती; परंतु ती रोगानें आणि काळजीनें अगदीं क्षीण व निस्तेज झालेली दिसत होती. बापडीच्या हाडाचा नुसता सांगाडा झाला होता.

म्हातारी आतां खालीं उतरली साधुसिंहहि इतक्यांत तेथें आला. म्हातारीला पहातांच साधुसिंहानें भूमीवर लोटांगण घालून तिला प्रणाम केला. म्हातारीनें विचारलें " दर्शन खुशाल आहेना ? "

" यजमान खुशाल आहेत माईसाहेब ! परंतु मोठं संकट प्राप्त—"

म्हातारीनें अधीर होऊन विचारलें " काय झालं ? "

" सात दिवसांच्या आंत ह्या दोघी पोरींनां घेऊन लखनौला गेलेंच पाहिजे. बादशहानें निक्षून हुकूम केला आहे ! "

म्हातारी म्हणाली " नूनाला पाठविण्याची माझी या घटकेस तयारी आहे. ती नाचायलागायला सुंदर शिकली आहे; परंतु ह्या दुसऱ्या पोरींचे बाबतींत मी मोठ्या मुष्किलींत पडल्यें आहें "

" महाराजांनीं तर ह्या दोन्हीं पोरींना बरोबर घेऊन येण्यास आपल्याला विनंति केली आहे. "

" पण रस्त्यामध्यें ह्या कारटीनं आरडाओरड केली, तर काय करावं ? "

" ती जर ओरडूं लागली, तर लोकांनां आपण सांगूं कीं, ही मुलगी वेडी झाली आहे, हिचे मस्तक फिरलें आहे, भ्रमांत कांहीं तरी बडबडते, रडतेओरडते–"

" पण हिला लखनौला नेऊन तरी काय करणार ? कारटी नाचायलागायला मुळींच शिकली नाहीं ! "

" ह्या दोन वर्षांत कांहींच शिकली नाहीं ? "

म्हातारी म्हणाली " सबंध एक वर्ष तर हिला सक्त कैदेत ठेवावी लागली होती. कारण, जेव्हां तेव्हां ही कारटी आत्महत्या करण्यास धडपडत होती. केव्हां आमचा डोळा चुकवील व प्राण देईल या भीतीनं रात्रंदिवस हिच्यावर खडा पहारा ठेवावा लागला. पुढं सहा महिने ही भयंकर रोगानं आजारी पडली. आतां मरते कीं घटकेनं मरते, अशी अवस्था पुढं किंचित् बरी झाल्यावर आमच्या वाऱ्यासहि उभी राहीना. आमच्याशीं धड बोलतचालत नाहीं, आम्हीं दिलेलं कांहीं खातपीत नाहीं, नव्हे आमचा स्पर्श झालेल्या पाण्यासहि शिवत नाहीं ! मला पाहतांच एकसारखी शिव्या देत सुटते अशा स्थितींत मी तिला शिकविणार काय माझं कपाळ ! "

" अझून पण ही असाच त्रास देते कीं काय ? "

" नाहीं, हल्लीं तीनचार महिने पूर्वीसारखा त्रास देत नाहीं खरी, परंतु ह्या पोरगीपुढें मीं हात टेंकले आहेत ! दररोज शिव्यागाळी आणि भांडण चालूच आहे. मला पहातांच तर ही कारटी वाघिणीसारखी डोळे फाडून मला खाऊं कीं गिळूं असं करते. असल्या द्वाड कारटीला दर्शननं माझ्याकडे कशाला पाठविली समजत नाहीं ! "

साधुसिंहाचें आणि त्या वृद्ध स्त्रीचें खालीं याप्रमाणें भाषण चाललें असतां इकडे माडीवर त्या दोन मुली परस्परांशीं मोकळ्या मनानें बोलत होत्या. थोरली रोगानें क्षीण झालेली मुलगी डोळे भरून आणून म्हणाली " नूना ! नाहींग या भयंकर यातना आणखी माझ्यानं सहन करवत ! मला पापिणीला स्पर्श करण्यास यमहि तयार होत नाहींसं वाटतं ! कारण, मी इतके प्रयत्न करित असतांहि मला मरण कां येत नाहीं ? "

नूना म्हणाली " ताई, तूं अशी रडूं नकोस गडे! तुला रडतांना पाहून मलाहि रडूं येतं. "

" नूना ! या ठिकाणीं मला कुणीं आणलं आहे, मला कशासाठीं बंदींत ठेविलं आहे, हे तुला ठाऊक आहे का ? "

" ताई, तें सारं मला ठाऊक आहे; तें सारं मीं ऐकलं आहे; पण तूं ही अशी रात्रंदिवस दुःख करित असत्येस, तें माझ्यानं पहावत नाहीं ! या दोन वर्षांत तुझ्याशीं मन मोकळं करून बोलण्यास मला कधीं एका क्षणाचीहि संधि सांपडली नाहीं. "

" तर मग सांग पाहूं, मला इथं कशासाठीं आणलं आहे, अन् तुझी आई रात्रंदिवस जी माझ्यामागं गायलानाचायला शिकण्याचं टुमणं लावित असते ती कशासाठीं ? "

" ताई, राजा दर्शनसिंहाच्या लोकांनीं तुला धरून आणली आहे. अयोध्येच्या बादशहाच्या रंग-"

ती रोगी स्त्री आवेशानें म्हणाली " बस बस-पुढं बोलूं नकोस, समजल्ये—समजल्ये ! त्या दुष्ट-दुरात्म्या-पापी दर्शनसिंहाचं नांव मीं लोकांच्या तोंडून पूर्वी ऐकलं होतं-"

असें म्हणून ती दुर्बळ स्त्री कपाळावर हात मारून घेऊं लागली व बोलतां बोलतां मूर्च्छा येऊन पडली. नूनानें तिच्या डोळ्यांवर, मस्तकावर पाणी शिंपडून व वारा घालून तिला शुद्धीवर आणलें. किंचित् वेळानें सावध झाल्यावर ती रोगी स्त्री म्हणाली " आतां मला त्या दुष्टाचा कावा कळून आला. बादशहाच्या जनान्यांत पाठविण्यास त्या पातक्यानं मला धरून आणलं आहे-चांडाळाचा कुळक्षय होईल-रोमरोमांत किडे पडून-हाल हाल होऊन-त्या दुष्टाला मरण येईल ! "

नूना ह्मणाली "या बाबतींत तुला पुष्कळच सांगायचं होतं. आज कितीं दिवसांपासून तरी मी डोळयांत तेल घालून तशा संधीची वाट पहात आहें, परंतु आतांपर्यंत तसा योगच आला नाहीं !"

ती रुग्ण, क्षीणदेही स्त्री आतां अधिकच आवेशानें ह्मणाली "काय—काय ?—तूं मला काय सांगणार होतीस ? तुझ्या गोष्टी ऐकण्याची माझी इच्छा नाहीं !—बादशहाच्या अंतःपुरांत जाण्यास माझं मन वळविणार होतीस ?—ह्या देहांत प्राण असेपर्यंत तसं घोर दुष्कर्म माझ्या हातून घडणार नाहीं—दुष्टे ! दूर हो — दूर हो—माझ्या अंगास स्पर्श करूं नकोस ! जा, आपल्या आईपाशीं लवकर जाऊन काळ कर—हा पापिणी ! धिक्कार- -धिक्कार असो तुला—धिक्कार असो तुझ्या पापी जिण्याला !"

आपल्या सोबतिणीचे हें रागाचे आणि तिरस्काराचें भाषण ऐकतांच नूनाचे डोळे एकदम भरून आले. ती गहिंवरून दीन स्वरानें ह्मणाली "ताई, तूंहि माझ्यावर रागावलीस मग मला या जगांत कुणाचा आसरा आहे ? माझ्याशीं दोन शब्द प्रेमानं बोलेल असं या जगांत तुझ्याशिवाय आतां मला कुणीहि उरलं नाहीं ! तुझ्याशीं मोकळया मनानं हितगुजाचे दोन शब्द बोलून हृदयांतील व्यथा कमी करीन, अशी आजवर मला आशा होती; ती तूंहि माझ्यावर निष्ठुर झाल्यास मी कुणाच्या बरं मुखाकडे पाहूं ?"

नूनाचें हें भाषण ऐकतांच ती दुसरी स्त्री आश्चर्यचकित झाली. नूना काय ह्मणते, हेंच तिला कळेना. तिनें चाकित मुद्रेनें विचारिलें "तुझं कुणी नाहीं ! ह्मणजे ? ही ह्मातारी तुझी आई नव्हे ?"

"माझे आईबाप कोण व ते कुठं आहेत हें मला मुळींच ठाऊक नाहीं."

"तर मग तुलाहि माझ्यासारखीच धरून आणून बंदींत ठेविली आहे कीं काय?"

नूना ह्मणाली "नाहीं, मला कुणीं पकडून आणलेली नाहीं. राजा दर्शनसिंहाच्या बापानं मी चार वर्षांची असतांना मला या ठिकाणीं आणून ठेविलं असल्याचं मीं ऐकलं आहे."

"तुला इकडे कशासाठीं आणली ?"

"ठग लोकांच्या एका टोळीनं ह्मणे माझ्या आईबापांचा आणि भावाबहिणींचा वध करून ते लोक मला घेऊन पळत होते. रस्त्यांत एका साहेबान त्यांच्या टोळीस गांठलं. तेव्हां मला रानांत टाकून ते पळून गेले. पुढं त्या साहेबाकडून दर्शनसिंहाच्या बापानं मला इथं आणून माझं पालनपोषण केलं. त्या दिवसापासून मी इथंच आहें."

नूनाची ही हकीगत ऐकतांच ती रोगी स्त्री आतां अतिशय कष्टी झाल्यासारखी दिसली. तिचा समज होता कीं, नूना ही त्या थेरडीची मुलगी आहे. कारण, नूना त्या म्हातारीला आई अशी हांक मारित असतांना ती वरचेवर ऐकत असे. म्हातारीहि नूनावर मुलीसारखें प्रेम करित होती. तेव्हां नूना ही म्हातारीचीच मुलगी असावी, असा तिचा समज होणें यांत कांहीं विशेषसें आश्चर्य नाहीं. आणि त्या थेरड्या स्त्रीच्या पातकी आचरणावरून तर त्या रोगी स्त्रीच्या मनांत तिच्याविषयीं अत्यंत तिरस्कार उत्पन्न झालेला होता. अर्थात्, नूनाला म्हणजे तिच्या पोरीलाहि तीं आतापर्यंत तशीच पातकी, धर्मभ्रष्ट मानित होती. परंतु नूनाच्या तोंडून तिची खरी हकीगत आतां तिला कळून येतांच ती अत्यंत दुःखी झाली आतां नूनाला मांडीवर घेऊन तिचें चुंबन घेऊन ती रुग्ण स्त्री अश्रुपुरित नेत्रांनीं तिला म्हणाली " नूना, तर मग तूंहि मजप्रमाणंच सदाची दुःखीच आहेस काय ग ! "

नूना म्हणाली " ताई, तूं या घरांत येण्यापूर्वी दुःखकष्ट कशाला म्हणतात, हें मला ठाऊक नव्हतं. मी सदासर्वदा गाणं बजावणं, नाचणं इत्यादिकांत दंग असें. तूं मागं जेव्हां अतिशय आजारी झाली होतीस अन् भ्रमामधे मोठमोठ्यानं चीत्कार करित नाना प्रकारचीं भीतिप्रद वाक्यं बडबडत होतीस त्या दिवसापासून माझ्या मनांत नाना कुशंका उद्भवूं लागल्या. तूं या दुखण्यांतून उठून बरी झालीस म्हणजे तुझ्याशीं पुष्कळ पुष्कळ बोलून, तुला नाना प्रकारच्या गोष्टी विचारून माझ्या मनांतील कुशंकेचं निरसन करून घ्यावं, असा त्याच वेळीं मीं मनामधें निश्चय केला होता; परंतु आतांपर्यंत तसा सुयोग कधींच आला नाहीं. अन् मला वाटतं, पुढंहि अशी संधि मिळेल कीं नाहीं सांगवत नाहीं ! आमची आई आणि दाई यांच्या गुप्त गोष्टी चाललेल्या त्या दिवशीं मीं आडून ऐकल्या. त्यावरून मला वाटतं कीं, आतां जे हे बाहेर लोक आले आहेत ते मला नेण्यासाठींच आले आहेत. बहुतकरून उद्यां सकाळीं ते मला घेऊन जातील. या जन्मीं आतां तुझी माझी पुनरपि कधीं भेट होईल कीं नाहीं तें कांहीं सांगवत नाहीं—"

" उद्यां तुला घेऊन जाणार ? कुठं नेणार ? "

" लखनौला घेऊन जाणार !

" कशाला ? "

" अयोध्येच्या बादशहासमोर नाचलं गायलं पाहिजे. "

" तूं बादशहासमोर जाऊन गाणार, नाचणार ! छी छी, कुलीन स्त्रीला हें शोभतं? "

नूना दीर्घ निःश्वास टाकून ह्मणाली "माझ्या इच्छे अनिच्छेला कोण विचारतं?"

" नूना ! तूं आपला धर्म टाकणार? सतीत्वापासून भ्रष्ट होणार? मुसलमानाची तूं विलासदासी होऊन रहाणार ? "

नूना आतां अधिकच खिन्न होऊन ह्मणाली "ताई' धर्म अधर्म कशाला म्हणतात, सतीत्व ह्मणजे काय, तें मला ठाऊक नाहीं. बाळपणीं सदासर्वदा मीं जयपालसिंहाच्या बरोबर असें. दररोज त्याच्याबरोबर त्याच्या पेढीवर जाई, पुढे नऊ वर्षांची झाल्यावर जयपालसिंह इथून कोणीकडे निघून गेला व मी त्या दिवसापासून या हवेलींत आईबरोबर रहात आहें. ह्या बगीच्याबाहेर कधीं एक दिवसहि गेल्यें नाहीं. तूं दुखण्यांत जेव्हां भ्रमिष्ट झाली होतीस, त्यावेळीं तुझ्या मुखांतून नानाप्रकारचीं चमत्कारिक आणि असंबद्ध भाषणं ऐकून माझ्या मनांत शंकाकुशंका उत्पन्न झाल्या. त्यापूर्वी जगाची मला कांहींएक माहिती नव्हती, हें मीं तुला नुकतंच सांगितलं आहे. भ्रमामध्यें तूं ' प्राणनाथ ! जीवितेश्वर ! ' वगैरे वगैरे बडबडत असस. 'दादा, बाबा, ताई, ' ह्मणत असस मला पहातांच ' अयोध्यानाथ ! अयोध्यानाथ!' ह्मणून ओरडत असस. माझं तोंड हातांत घेऊन ' हा अगदीं थेट तिकडच्या-सारखाच चेहरा आहे !' वगैरे वगैरे तूं जे नाना प्रकारचं असंबद्ध भाषण करित असस, त्याचा मला कांहींच उमज पडेना. ' प्राणनाथ ' ह्मणजे कोण, 'जीवितेश्वर ' कुणाला ह्मणतात, दादा, बाबा, कसे असतात, ह्यांची मला कांहींच कल्पना नसल्यामुळं ह्या साऱ्या गोष्टींचा तुझ्यापासून उलगडा करून घ्यावा, अशाविषयीं तेव्हांपासून माझ्या मनाला सारखी चुटपुट लागून राहिली होती. तुला विचारीन विचारीन ह्मणून मी आज केव्हांपासून तरी योग्य संधि पहात होतें, पण हा क्षणपावेतों तशी संधीच कधीं मिळाली नाहीं. "

ती रोगी स्त्री ह्मणाली "तर मग आतां सांग. तुझी सर्व गोष्ट मी उत्सुक चित्तानं ऐकत्यें. "

" ताई, ती फार लांबलचक अन् कंटाळवाणी हकीगत आहे—"

" कशीहि असो, तुझी सविस्तर हकीगत मला लवकर सांग. "

" ऐक तर मग. " असें ह्मणून नूनानें आपली हकीगत सांगण्यास प्रारंभ केला. नूना ह्मणाली " ताई, दर्शनासिंहाचा पिता जयपालसिंह हा माझ्यावर कन्येप्रमाणं प्रेम करित असे. सहासात वर्षांपूर्वी तो इथून निघून गेला. बाळपणीं तो मला कडेवर घेऊन दररोज आपल्या पेढीवर घेऊन जाई. पेढीवर त्याच्या शेजारीं

मी नेहमीं बसलेली असें. व्यापारधंद्यानिमित्त पुष्कळ लोक जयपालाजवळ येत असत. केव्हां केव्हां माझ्यादेखत 'आमच्या सीतेला अनुरूप असा एखादा ब्राह्मण कुळांतला वर आढळला तर आपल्याला कळवा,' असं जयपाल त्या लोकांस सांगत असे! 'माझ्या सीतेला मी दहाहजार रुपये हुंडा देईन!' असें जयपाल म्हणे. सीता हें त्यानंच मला नांव ठेविलं होतं. बाकीचीं सारीं माणसेहि त्यावेळीं मला सीता याच नांवानं हांक मारीत. जयपालाच्या वरील भाषणाचा अर्थ काय हें त्यावेळीं मला कांहींच कळत नव्हतं. पुढं जयपालाला कांहीं दुखणं आलं, आपला व्यापारधंदा आटोपून तो ह्या हवेलींत राहूं लागला. त्याच्या दुखण्याच्या दिवसापासून मी केव्हांहि ह्या हवेलीच्या बाहेर गेल्यें नाहीं. जयपालाचं दुखणं कमी न होतां दिवसेंदिवस वाढतच गेलं. तेव्हां लखनौ येथें त्याला घेऊन जाण्यासाठीं दर्शनसिंह इकडे आला. यापूर्वींहि दर्शनसिंह केव्हां केव्हां बापाला भेटण्यासाठीं म्हणून इकडे येत असे. त्याचंहि माझ्यावर प्रेम असे परंतु ह्या शेवटच्या वेळीं जेव्हां तो इकडे आला, त्या वेळीं आईशीं एकांतांत कांहीं खलबत करून त्यानं मला नृत्यगीत शिकविण्यास आईला सांगितलं. आतां मला पक्कं आठवतं, त्या दोघांचं ह्या बाबतींत बराच वेळ कांहीं गुप्त भाषण झालं होतं. दर्शनसिंहाच्या सांगण्याप्रमाणं आई मला नृत्यगायन शिकवूं लागली. मी त्या वेळीं अवघी दहा वर्षांची होत्यें. आई मला नृत्यगान शिकवित होती, परंतु जयपालाला तें आवडत नव्हतं. तो वारंवार याबद्दल मला राग भरे व मी गायलानाचायला शिकूं नये म्हणून मला कळकळीनं उपदेश करी. आईचीहि जयपालानं या बाबतींत एक दिवस खूप खरडपट्टी काढली व मला यापुढं असे भलभलते नाद लावल्यास आपल्याला ती गोष्ट साफ रुचणार नाहीं असं त्यानं आईला बजावून सांगितलं. दर्शनसिंहालाहि तो पुष्कळ राग भरला कांहीं दिवस त्यांचीं या बाबतींत निकराचीं भांडणं चाललीं होतीं. त्या तिघांचा बराच वाद होऊन शेवटीं जयपालसिंह आईला व दर्शनसिंहाला म्हणाला 'मीं माझ्या पोटच्या कन्येप्रमाणं या अनाथ मुलीचा प्रतिपाळ केला आहे. माझ्या देहांत प्राण असेपर्यंत मी कांहीं इला वाईट मार्गाला लावूं देणार नाहीं!' त्यांच्या ह्या भांडणाचा आणि वादविवादाचा कांहींएक अर्थ मला कळत नसे. माझ्या पोरवया-प्रमाणं नृत्यगान शिकण्यांत मला अतिशय आनंद वाटे. आई मला चोरून नाचायाला गायला शिकवी व मीहि मोठ्या उत्साहानं आणि जयपालाला कळूं न देतां ती कला शिकूं लागल्यें.

"बाप लेकाचं आणि ह्या म्हातारीचं खडाजंगीचं भांडण झालं. त्याच्या दुसऱ्याच दिवशीं जयपालाचं दुखणं विकोपास गेलं. त्याची एकदम वाचाच बंद झाली. कांहीं सांगण्याची अगर कळविण्याची शक्ति त्याला राहिली नाहीं. दर्शनसिंह त्याला इथून लखनौला घेऊन गेला व मी या वृद्ध स्त्रीपाशीं राहूं लागल्यें. ही म्हातारी आतां अधिकच उत्सुकतेनं आणि काळजीनं मला नृत्यगति शिकवूं लागली व मीहि ती कला मोठ्या उत्सुकतेनं शिकूं लागल्यें. ही म्हातारी मला गायालानाचायला शिकवितेवेळीं नेहमीं कुरवाळून मोठ्या प्रेमानं सांगत असे 'बेटा! तूं चांगली गायानाचायाला शिकशील तर खात्रीनं बादशहाची बेगम होऊं शकशील. थोडीशी मोठी झाल्यावर दर्शन तुला बादशाहाच्या रंगमहालांत पाठवील.' म्हातारीचं हें भाषण ऐकलं म्हणजे मला अत्यत आनंद होई मी अधिकच उत्साहानं आणि काळजीनं नृत्यगायनाचा अभ्यास करीं. माळ्याला, दाईला मी नेहमीं आनंदानं सांगें कीं 'मी आतां लवकरच बादशहाची बेगम होणार!' परंतु माझं हें भाषण ऐकतांच तीं गालांतल्या गालांत हंसत. असा क्रम अगदीं परवांपर्यंत चालला होता. मी नेहमीं मोठ्या आनंदांत असें व माझ्यासारखी भाग्यवान् त्रिभुवनांत कुणी नसेल असं मनांत समजत असें

"नुक्तच दाईचं अन् ह्या म्हातारीचं कांहीं गोष्टीवरून कडाक्याचं भांडण झालं. त्यावेळीं दाईनं मला एकांतांत भेटून हलकेच माझ्या कानांत सांगितलं कीं, 'ही म्हातारी जयपाळची राख होण्यापूर्वी वेश्येचा धंदा करित होती. हिच्यासारखी पापी स्त्री जगांत दुसरी नसेल!' राख म्हणजे काय अन् वेश्या म्हणजे कोण, हें मला कांहींच ठाऊक नव्हतं; परंतु दाईनं तें सगळं मला नीट समजावून सांगितलं. माझ्या बापाचा अन् भावाचा ठग लोकांनीं खून केल्याची व पुढं जयपालानं माझा प्रतिपाल केल्याची हकीगत त्याच वेळीं दाईकडून मला समजली. तत्पूर्वी माझा असा समज होता कीं, जयपाळ हा माझा बाप अन् म्हातारी ही माझी आई, परंतु दाईनं सांगितलेली ती एकंदर हकीगत ऐकून माझा भ्रम दूर झाला. दाईनं मला आणखी असंहि सांगितलं कीं 'ह्या पातकी वेश्येच्या मनांत माझ्या जन्माचं वाटोळं करण्याचं आहे. ह्या राक्षसीला पापपुण्याची मुळींच भीति नाहीं.'

"दाईच्या तोंडून माझ्या बापाची व भावाची हकीगत ऐकतांच मला माझ्या बाळपणांतील कित्येक गोष्टी आठवूं लागल्या. लहानपणीं मी दुसऱ्या एका स्त्रीच्या कडेवर बसून खेळत असें. एक वृद्ध गृहस्थ माझं वरचेवर प्रेमानं चुंबन

घेत असे. वगैरे गोष्टी यावेळीं मला अंधुक अंधुक आठवूं लागल्या. परंतु इकडे आल्यापासून त्यांपैकीं कोणाचंहि मला दर्शन झालं नाहीं. ठग लोकांनीं सर्वांचा खून केल्यामुळं बिचारा माझा बाप, भाऊ कोणीहि जिवंत नाहीं.

" ताई ! या जगांत माझं असं ह्मणायला आतां कुणीहि उरलं नाहीं ! धर्म कोणता, अधर्म कोणता, सुपथ कोणता, कुपथ कोणता, हे समजण्याची बुद्धि माझ्या अंगीं नाहीं. आज कितीतरी दिवस ह्या साऱ्या गोष्टींचा मी विचार करित आहें, परंतु मला कांहींच मार्ग सुचत नाहीं दोन वर्षांमागं तूं इथं आलीस. तुला इथं घेऊन येणाऱ्या लोकांनीं म्हातारीला सांगितलं कीं, 'दर्शनसिंहानं धाकट्या मुलीचं नांव नूना अन् मोठ्या मुलीचं नांव मान्ना असं ठेवण्याची आज्ञा केली आहे.' अन् त्या दिवसापासून माझं नांव नूना असं पडलं. जयपालानं माझं नांव सीता असं ठेविलं होतं. हें नांव बदलून मला नूना असं नांव देण्याविषयीं दर्शनसिंहान कां आज्ञा केली, तें कांहीं मला कळत नाहीं. दाईला एकदा मीं याबद्दल विचारलं दिखील, परंतु ती कांहींएक बोलली नाहीं. उलट, माझ्या या उद्धटपणाबद्दल मला राग भरली. अलीकडे ह्या ह्मातारीच्या एकंदर वर्तनांत कांहींतरी गूढार्थ भरला आहे, अशी माझी खात्री झाली आहे परंतु तिच्या हेतूंची मला कांहींच कल्पना होत नाहीं. तुला नि मला लखनौला नेण्यासाठीं लोक यायचे आहेत, हें मला सुमारें महिन्यापूर्वींच ह्या म्हातारीकडून कळलं होतं; म्हातारी त्यावेळीं म्हणाली होती कीं, तुला लखनौला पाठविण्यांत येणार नाहीं. कारण, तुला अद्याप गायानाचायला येत नाहीं, तेव्हां तुझा तिकडे कांहींच उपयोग व्हावयाचा नाहीं. आज लखनौहून हत्ती, पालख्या घेऊन हे दर्शनसिंहाकडून लोक आलले आहेत हे लोक उद्यां मला तिकडे घेऊन जातील असं वाटतं; परंतु आतां काय करावं हें मला कळत नाहीं. जयपाल हा जरी वास्तविक माझा पिता नसला तरी ज्या योगं माझं कल्याण होईल अशीच गोष्ट तो करील ही माझी खात्री आहे. परंतु मागच्या त्या दुखण्यांतून तो बरा झाला कीं अजून त्याच स्थितींत आहे याबद्दल मला कांहींच ठाऊक नाहीं यामुळं मला मोठी भीति पडली आहे. या लोकांनीं काय खलबत केलं आहे, कांहीं तर्क होत नाहीं."

नूनाची ही समग्र हकीगत ती रुग्ण स्त्री एकाग्र चित्तानें स्तब्धपणें ऐकत होती. नूना आतां थांबली, तथापिहि ती स्त्री अद्याप स्तब्धच होती; बराच वेळपर्यंत

कांहींएक बोलली नाही. मनांतल्या मनांत ती कांहीं गंभीर विचार करित होती. नूनाला काय सल्ला द्यावी याचाच तिच्या मनांत विचार चालला होता; परंतु तिच्या मनाचा निश्चय असा कांहींच होईना. थोड्या वेळानें जिन्यांत म्हातारीच्या पायांचा आवाज कानीं पडतांच ती एकदम शुद्धीवर येऊन म्हणाली " नूना, ही अवदसा वर येत आहे वाटतं. कदाचित् इकडेच येईल. चूप, आतां कांहीं बोलूं नको. आज रात्रीं सर्वांची निजानिज झाल्यावर तूं माझ्याजवळ येशील? नूना! खरोखर तूं अभागी आहेस ! तुझं हें दुःख पाहून मला माझ्या दुःखाचाहि विसर पडतो. रात्रीं गुपचुपपणं तूं माझ्यापाशीं ये, आपण या गोष्टीचा विचार करूं. "

नूनानें त्याप्रमाणें करण्याचें कबूल केलें. ती वृद्ध स्त्रीहि तेथें आली. ती म्हणाली " उद्यां सकाळीं आम्हां सर्वांला इथून लखनौला गेलं पाहिजे. दर्शननं मनुष्य पाठवून बोलावलं आहे. लखनौला म्हणे कंपनी बहादुरांचे बडे साहेब येणार आहेत. ते लखनौ इथें बडा दरबार भरविणार आहेत. दूरदूरच्या गांवांहून ह्या समारंभास हजारों लोक जात आहेत. शहरांत नाना प्रकारचे खेळ, तमाशे, नाचरंग व्हावयाचे आहेत. मोठी जत्रा भरायची आहे. ही गम्मत पहाण्याला दर्शननं आपल्याला बोलावलं आहे. उद्यां आपण जायला निघूं. "

म्हातारीच्या या बोलण्यावर त्या दोघी मुलींपैकीं कोणीच कांहींएक बोलली नाहीं. म्हातारीहि नंतर तेथून गेली.

## प्रकरण १२ वें.

## गुप्त मसलत.

शक्या लोभयितुं नाहमैश्वर्येण धनेनवा ।

अनन्या राघवेणाऽहं भास्करेण यथा प्रभा ॥

—सुन्दर काण्डम्—रामायणम्.

सायंकाळ झाला. हळुहळू काळोख पडूं लागला. राजा दर्शनसिंहाकडून आलेले लोक बगीच्यांत एका झाडाखालीं दगडांच्या चुली मांडून स्वयंपाकाची तयारी करूं लागले. मागील प्रकरणांत सांगितलेली वृद्ध स्त्री, केव्हां साधुसिंहाशीं घटकाघटका एकांतांत गोष्टी बोलत होती. केव्हां माडीवर येऊन नूना आणि मान्ना यांच्याशीं विनोदपर भाषण करून त्यांनां हंसविण्याचा आणि त्यांची मर्जी सुप्रसन्न करण्याचा प्रयत्न करित होती.

म्हातारी या वेळीं साधुसिंहाला सांगत होती "बाबा साधु, खरोखर, दर्शनचं नशीब मोठं चांगलं म्हटलं पाहिजे ! मान्ना लखनौला येण्यास कबूल होईल अशी मला तर मुळींच आशा नव्हती; परंतु आज तिचं लक्षण कांहीं निराळंच पहात आहें. तुम्हीं इथं आल्यापासून दररोजचा तिचा तो हट्ट अन् बडबड कांहींच दिसत नाहीं. काय सांगूं तुला, ह्या कारटीन रात्रंदिवस मला अगदीं भंडावून सोडलं होतं. हिच्या आरडाओरडींनीं अन् जळफळाटानं माझं अगदीं डोकं उठलं होतं. मला पाहिलन् पुरे, कीं झालीच हिच्या अंगाची लाही ! मी म्हणजे कुणी वाघ किंवा राक्षस आहें, असं तिला वाटायचं ! परंतु काय आश्चर्य सांगाव ! आज पूर्वीचं सारं तानमान एकदम बदलेल दिसत आहे ! मला वाटतं, नूनानं ह्या कारटीची समजूत केली असेल. खरंच, माझी नूना मोठी गरीब पोरगी आहे. पोर गायला नाचायला सुरेख शिकली असून वाग्कलेंतहि मोठी प्रवीण झाली आहे. परमेश्वर करो अन् बादशहाच्या नजरेंत ही पोरगी लवकर भरो, म्हणजे आजवर केलेल्या श्रमांचं सार्थक होईल अन् दर्शन बादशहाचा वजीर होईल. झाला का तुझा स्वयंपाक ? ठीक आहे तूं जेवायला बस; आतां वर जाऊन तुला मी लोणचं पाठवितें अन् त्या पोरी काय करताहेत हेंहि एकवार पाहून येतें."

आजपर्यंत मान्नानें आपण होऊन कधीं आपलें अन्न शिजविलें नव्हतें, किंवा स्वेच्छेनें कांहीं खाल्लें नव्हतें. नूनानें फारच आग्रह केला ह्मणजे कधीं तरी रात्रीं मान्ना थोडेसें दुध पीत असे; कधीं कधीं थोडीं फलमूलें सेवन करी. दोनदोन चारचार दिवसांत तिला अन्नाचा स्पर्श होत नसे. तीनचार दिवसांनीं नूनानें आपली शिकस्त केली ह्मणजे मान्ना माराकुटीनें एखादी लहान रोटी करून खाई. झातारीचा स्पर्श झालेलें पाणीसुद्धां ती कधीं पीत नसे. झातारीचा ती अगदीं अंतःकरणापासून तिरस्कार करी. मान्नाला झातारी दृष्टीसमोरहि नकोशी वाटे. आजपर्यंत तीं झातारीशीं कधींसुद्धां चांगला शब्द बोलली नाहीं.

परंतु यावेळीं झातारी वर येऊन पहाते तो मान्ना आणि नूना एके ठिकाणीं बसून रोटी तयार करित आहेत असें तिच्या दृष्टीस पडलें. तें पाहून आपली कार्यसिद्धि झाली, नूनानें समजूत घालून बादशहाची विलासदासी व्हावयाला मान्नाकडून संमति मिळविली, असें तिला वाटलें. हंसत हंसत ती ह्मणाली "बेटा मान्ना! आतां तुह्मी समजून पडलीना? नूनानं तुला सर्व गोष्टी नीट समजावून सांगितल्याना? तुह्मीं भिऊं नका. लखनौला गेल्याबरोबर तुह्मी दोघीहि बादशहाच्या दृष्टीस पडाल त्याच्या रंगमहालांत तुमचा प्रवेश झाला, कीं तुमचं ऐश्वर्य मग काय विचारायचं आहे! बादशहाची तुमच्यावर एकदा नजर पडली, कीं, तुमच्या भाग्याला मग सीमा नाहीं असं समजा! सोनं, मोतीं, अमूल्य जवाहिर यांचा तुमच्यावर नुसता वर्षाव होईल! कितीतरी तऱ्हेचीं सुंदर सुंदर उंची वस्त्रं तुह्मांला मिळतील. जगांतील अनंत मूल्यवान् वस्तूंचा बादशहा तुम्हांला नजराणा करील. शेंकडों दासदासी तुमचा शब्द झेलायला हात जोडून उभ्या असतील. तिथं तुम्हांला जें अपार वैभव प्राप्त होईल. त्याची थोडीसुद्धां कल्पना तुम्हांला यावेळीं करतां येणार नाहीं! बेटा, मन स्थिर कर उद्यां सकाळीं आपण सर्वजण लखनौला जाण्यास निघूं."

त्या थेरडीच्या या भाषणानें मान्नाचें हृदय शतधा विदीर्ण झालें. मोठ्या कष्टानें हृदयांतील कोपानल संवरण करून ती खालीं मान घालून बसून राहिली; परंतु नेत्रांतून घळघळ वाहणाऱ्या अश्रूंनां ती थांबवूं शकली नाहीं. कितीवेळ तरी तिच्या डोळ्यां-तून सारखा अश्रुप्रवाह चालला होता. आपल्याशींच ती म्हणाली "चांडाळीण मला धन आणि ऐश्वर्य यांचा मोह घालून माझं मन वळवूं पहात आहे. पण दुष्टेला ठाऊक नाहीं कीं, त्या मेल्या बादशहाचं सिंहासन, राज्य आणि ऐश्वर्य—फार काय—

सगळ्या पृथ्वीचं ऐश्वर्यदेखील मला नाथांच्या चरणापासून एक पळभरहि विचलित करूं शकणार नाहीं ! ”

बादशहाच्या अपार ऐश्वर्याचें, धनाचें आणि सत्तेचें म्हातारी मोठ्या प्रेमभरानें वर्णन करित असतां मान्ना एकाग्र चित्तानें आपल्या प्रिय प्राणपतीचें—अयोध्यानाथाचें चिंतन करित होती. मान्ना खालीं मान घालून आपलें भाषण निमूटपणें ऐकत आहे हें पाहून म्हातारीला अधिकच स्फुरण चढलें. तिने आपली चर्पटपजरी पुढे चालू केली. ती म्हणाली “ बेटा, असं खाली बघून लाजायला नको कांहीं ! बादशहाच्या दरबारांत अमीरउमरावांसमोर असं लाजून अन् खालीं मान घालून कसं चालेल? दरबारांत तुला कुणी विनोदानं बोललं म्हणजे हास्यमुखानं तुलाहि त्याला तसंच उलट उत्तर द्यायला हवं, समजलीस ? कुणीं तुझी थट्टा केली म्हणजे तुलाहि त्याची अदबीनं उलट थट्टा केली पाहिजे. नूना ! या मान्नासारखीच तू दिखील बादशहाजवळ खालीं मान घालून उभी रहाशील ना ? खुळे पोरी ! नीट बोलायचालायला थोडंसं शीक—”

आतां नूनालाहि चांगलें कळून आलें कीं, म्हातारी आपणाला कुमार्गाला लावूं पहात आहे. नूनाला ती परम शत्रु वाटूं लागली; परंतु तिरस्काराचें अल्पहि चिन्ह न दाखवितां तिनें म्हातारीला हंसत हंसत विचारलें “पूर्वी तुम्ही काय बादशहाच्या दरबारांत अमीरउमरावांसमोर कंचनी होऊन नाचत होतां ? ”

म्हातारी पूर्वी नर्तकी कंचनी होती असें बुन्दियेकडून नूनाला समजलें होते; परंतु हल्लीं म्हातारी हें प्राण गेला तरी कोणाजवळ कबूल करित नव्हती. हल्लीं ती ‘वृद्धा नारी पतिव्रता’ झाली होती. दररोज नेमानें गंगास्नान करित असे. तिचें देवतार्चन मोठें होतें. दररोज किती वेळ तरी ती हातांत माळ घेऊन जप करित बसे, आणि लोकांना मोठमोठ्या धर्माच्या गोष्टी सांगत असे. म्हातारीला खिजगवें या हेतूनेंच बुन्दियेच्या समक्ष नूनानें यावेळीं हा प्रश्न तिला मुद्दाम विचारला होता.

नूनाच्या या प्रश्नानें म्हातारी फार खट्टू झाली आणि नूनाचा तिला रागहि आला. परंतु मनांतला भाव मनांत ठेवून तिनें निराळ्याच गोष्टी काढल्या. परंतु नूना तिचा पिच्छा सोडीना. तिनें पुनः विचारलें ” बादशहाच्या दरबारांत नाचायला तुम्ही पूर्वी कधीं गेलां होतां ? ”

म्हातारीला आतां तेथें उभें रहावेना. बुंदियेच्या समक्ष आपली फजिती झाली तर पुढें नेहमीं ती आपणाला या संबंधानें टोमणे देत राहील, असा विचार करून दुसऱ्याच कसल्यातरी एकदोन गोष्टी बोलून म्हातारीनें तेथून पाय काढला आणि खालीं जाऊन ती साधुसिंहाशीं बोलत बसली.

म्हातारी निघून गेल्यावर नूना मान्नाला म्हणाली "गेली एकदाची पीडा! आतां पुनः इथं नाहीं यायची अवदसा!"

स्वयंपाक झाल्यावर थोडथोडा आहार करून मान्ना आणि नूना निजावयाच्या खोलीत गेल्या. थोड्या वेळानें खोलीचीं दारें बंद करून पुढे उभ्या राहिलेल्या संकटांतून आपलें रक्षण कसे करावें, याबद्दल दोघी विचार करूं लागल्या. मान्ना म्हणाली "नूना! प्राण गेला तरी लखनौला जायला मी कबूल व्हावयाची नाहीं. अन् मजवर जुलुम झाला तर त्या वेळीं मी जीव दिल्याशिवाय रहाणार नाहीं! मनुष्यानं हाल तरी किती सोसावयाचे? पण तुला संकटांत एकटी टाकून प्राणत्याग करूं नये असं मला एकवार वाटतं. मी मेल्यें तर तुला या संकटांतून सुटायला कोण सहाय्य करणार आहे?"

"ताई, माझं असं म्हणायला तुझ्याशिवाय या जगांत कोण आहे बरं? यावेळीं जर तूं मला टाकलंस तर माझा सर्व नाश झाल्यावांचून खास रहाणार नाहीं. मी तुला कधीं नाहीं सोडणार–तूं आत्महत्या केलीस तर मीहि आत्महत्या केल्याशिवाय रहाणार नाहीं!"

नूनाचें हे भाषण ऐकून मान्नाच्या नेत्रांतून अश्रु वाहुं लागले. ती स्फुंदस्फुंदून रडूं लागली तिला रडतांना पाहून नूना म्हणाली "ताई, अशी रडूं नकोस गडे! रडूनरडून तूं बेशुद्ध पडशील. हें संकट टाळायला काय उपाय करावा कांहीं कळत नाहीं!"

रडणं थांबवून मान्ना म्हणाली" कसला उपाय? आत्महत्येशिवाय आपल्या धर्म रक्षणाला आतां दुसरा उपाय दिसत नाहीं. पळून जावें म्हटलं,तर तें साधायचं नाहीं. आपण दोघीहि अबला, त्यांतून तरुण. इथून पळून गेलों तर वाटेंत आपण कुणा-भामट्याच्या किंवा चोराच्या हातीं पडूं. त्यांच्या हातून आपली सुटका कोण करणार? देशांत जिकडे तिकडे चोर, दरवडेखोर यांचा सुळसुळाट झाला आहे. त्यांच्या तडाक्यांतून आपली सुटका होणं अशक्य आहे."

बराच वेळपर्यंत दोघीहि स्तब्ध होत्या. साधुसिंह व त्याच्याबरोबरचे लोक सकाळीं निघणार होते, आणि सकाळ व्हावयाला आतां फक्त दोनअडीच प्रहर अवकाश होता. इतक्या अवकाशांत मुक्ततेचा मार्ग शोधून काढला पाहिजे. कांहीं वेळानें नूना म्हणाली " चल, आपण पुरुषाचा वेष घेऊन इथून पळून जाऊं या. "

" नूना, पण पळून जाणार कुठं ? आपल्याला रस्ते ठाऊक नाहींत. जायचं कुठं अन् कसं ? हल्लींचा काळच असा आहे कीं, पुरुषांनांसुद्धां बाहेर जातांना बरोबर तरवार अन् बंदुक बाळगावी लागते पुरुषांचा पोषाख जरी आपण घातला तरी आपण लहान मुलगे दिसू! वाटेंत ठग लोक मुलं पकडतात त्यांच्या हातांत आम्ही खास पडूं. नंतर आपलं खरं रूप प्रकट झाल्याशिवाय रहाणार नाहीं मग त्यांच्या हातून आपलं रक्षण कोण करील ! "

या वेळीं अयोध्येंत चोहोंकडे बेबंदशाहीचें साम्राज्य सुरू होतें कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नव्हता. अर्थात्, चोर, ठग वगैरे लुच्चे लोकांचें अयोध्या हें निवासस्थान होऊन राहिलें होतें. बरोबर शस्त्रें घेतल्याशिवाय कोणाचीहि बाहेर पडण्याची छाती नव्हती. एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांतांत जावयाचें म्हणजे टोळया करून जावें लागे; एकटेंदुकटें जाण्याची मुळींच सोय नव्हती. अशी स्थिति असतां तरुण स्त्रियांनीं पळून जाणें म्हणजे चोरांच्या हातांत आयतेंच जाऊन पडण्यासारखें होतें.

रात्रीचे दोन प्रहर उलटून गेले तरी माईला किंवा नूनाला आत्मरक्षणाचा निर्भय उपाय एकहि सुचेना. बराच वेळ विचार करून माई म्हणाली " नूना ! तो दयाघन परमेश्वर अनाथांचा नाथ आहे. त्याच्याशिवाय आम्हां दीन अबलांनां दुसरा कोण सहाय्यकारी आहे ? त्यानं रक्षण केल्यावर आमचा धर्म नष्ट करण्याचं सामर्थ्य कुणाच्याहि अंगीं नाहीं ! माझी आई मला नेहमीं म्हणत असे ' संकट पडलं म्हणजे सीतापतीचं स्मरण कर—रामनामानं सर्व संकटं दूर होतात. ' व्यर्थ चिंता करून काय होणार ? चल, नूना आपण रामनामाचा जप करूं —त्या भगवंताचं चिंतन करूं. "

त्या असहाय दीन अबलांनां आत्मरक्षणाचा कांहींच मार्ग सुचेना, तेव्हां अत्यंत व्याकुळ चित्तानें दीनदयाघन परमेश्वराचा अनन्यभावानें त्या धांवा करूं लागल्या खरोखर, परमेश्वराचा महिमा अद्भुत आहे ! विश्वनियमनाचें त्याचें कौशल्य अचिंत्य आहे. आपल्या हिताहिताच्या ज्ञानांत कुंठित होऊन मनुष्यानें त्याचें

स्मरण करतांच तो सर्वकाल त्याला सल्ला देऊन खरा मार्ग दाखवितो. संकटपरिहार व्हावा म्हणून मान्ना आणि नूनानें एकाग्रचित्तानें दोन घटका ईश्वराचें स्मरण केलें— पवित्र रामनामाचा जप केला. अकस्मात् त्यांच्या मनांत आशेचा सचार झाला. दोघांनींहि आत्महत्येचा विचार मनांतून घालविला.

मान्ना म्हणाली "नूना! आतां आपल्याला भय नाहीं. चल, आपण लखनौला जाऊं. लखनौंतून आपल्याला सहज सोप्या रीतीनं पळून जातां येईल."

"कसं?"

मान्नाच्या हृदयांत यावेळीं अपूर्व बलसंचार झाला होता. ती म्हणाली "नूना! माझे पति आणि माझा बंधु माझा शोध करित फिरत आहेत, यांत शंका नाहीं. मला धुडाळण्यासाठीं ते सर्व पृथ्वीपर्यटण करतील. त्यांच्या जीवांत जीव आहे, तोंपर्यंत ते माझा शोध करित रहातील, क्षणभरहि विश्रांति घेणार नाहीत! दर्शनसिंहाच्या लोकांनीं मला धरून नेलं ही बातमी जर त्यांनां लागली असेल तर ते लखनौ शहरांतच खात्रीनं माझा शोध करित असतील; म्हणून मला लखनौला गेलंच पाहिजे. तिथ मी गेल्ये, तरच त्यांची माझी भेट होण्याचा संभव आहे. आमचं रक्षण करण्यांत ते आपल्या प्राणांचीहि परवा करणार नाहींत. दर्शन- सिंहाचा किंवा खुद्द बादशहाचा शिरच्छेद करूनहि ते आमची सुटका करतील! आपल्याला या म्हातारडीबरोबर लखनौला गेलंच पाहिजे. लखनौला पोहोंचल्यानंतर आपण पळून जायची तजवीज पाहूं. पण इकडे पहा, त्या थेरडीला यांतला एक शब्दहि कळतां कामा नये हो! तिच्याशीं आपल्याला फार सावधगिरीनं वागलं पाहिजे."

नूना मान्नाचें भाषण लक्ष्यपूर्वक ऐकत होती. ती म्हणाली" ताई, तर मग तुझं लग्न झालं आहे! तुझे पति आहेत तर मग?"

मान्ना अश्रूपूर्ण नयनांनीं म्हणाली "होय नूना, मला पति, पिता, भाऊ, बहिणी सर्व आहेत. मला वाटतं, बाबांनीं माझ्या दुःखानं प्राणत्याग केला असेल. माझ्या दोघी बहिणी मृतप्राय होऊन माझ्या दर्शनासाठीं प्राण धरून राहिल्या असतील. माझे पति आणि बंधु या अभागिनीचा शोध करित देशविदेशांतून भटकत असतील. नूना! माझ्या एका गोष्टीचं स्मरण ठेव. मला जर कधीं आत्महत्या करणं भाग पडलं, अन् परमेश्वराच्या कृपेनं तुझी या नरकांतून मुक्तता झाली, तर माझ्या बाबांनां आणि बंधुभगिनींला माझ्या मृत्यूची वार्ता कळीव. एकवार त्यांन माझा मृत्युशोक सह्य होईल, पण नबाबाच्या अंतःपुरांत माझा

प्रवेश झाला ही बातमी त्यांच्या कानांवर जातांच सर्वजण विषपान करून प्राणत्याग करतील, यांत तिळमात्र शंका नाहीं! सीतापुरचे गंगाप्रसाद शास्त्री माझे जनक—काशीनाथशास्त्री माझा बंधु–राजा दिग्विजयसिंहाची पत्नी राणी नारायणकुमारी माझी ज्येष्ठ भगिनी—"

"ताई, तुझ्या पतीचं नांव काय?"

"पंडित अयोध्यानाथ—"

'पंडित अयोध्यानाथ' हे शब्द मान्नाच्या मुखांतून निघतात तोंच तिच्या डोळ्यांतून अविरल अश्रुवर्षाव होऊं लागला. रडत रडत ती म्हणाली "नूना! तिकडची गोष्ट मनांत आली म्हणजे माझं हृदय फाटून जातं! आमचा विवाह झाल्यावर तिकडून नेहमीं म्हणायचं होत असे, 'आपण जन्मापासूनच शोकानं अन् दुःखानं मृतप्राय झालों आहों.' पण माझं प्रेम, व बाबांचा अन् माझ्या बहिणींचा स्नेहपूर्ण व्यवहार यामुळं तिकडचा पुनर्जन्म झाला. पण आतां तिकडची स्थिति काय झाली असेल? या अभागिनीच्या शोकामुळं तिकडचा—"

"पूर्वी त्यांनां कसलं दुःख होतं?"

"खरोखरच ते चिरदुःखी होते! तेराव्या वर्षी मातृवियोग झाला. नंतर लवकरच चोरांच्या हातून त्यांचा पिता मरण पावला. त्यांच्या लहान बहिणीलाहि चोरांनीं मारली कीं धरून नेली, तें त्यांनांच कळलेलं नाहीं; परंतु तिचा पत्ता नाहीं. हें खरं. माझ्या हृदयावर मस्तक ठेवून आपल्या भगिनीच्या शोकान ते नेहमीं अश्रु ढाळित असत. त्यांचं सांत्वन करावयाचा मी प्रयत्न करित असें; परंतु आतां माझ्या शोकामुळं खचित तिकडून आत्महत्याच करणं होईल!"

"चोरांनीं त्यांच्या बापाचा कसा खून केला?"

"ती हकीगत लांबलचक आहे तिकडच्या तोंडून मीं चोरांच्या अन् ठगांच्या पुष्कळ गोष्टी ऐकिल्या आहेत. अन् म्हणूनच तर इथून पळून जायला मला इतकं भय वाटतं!"

"चोरांनीं काय घरांत शिरून तुझ्या सासऱ्याचा खून केला?"

"नाहीं. लाहोराहून माझे सासरे, पति, माझी एक चार वर्षांची लहान एकुलतीएक नणंद अन् घरांतली पुष्कळ दिवसांची एक मोलकरीण अशी मंडळी सीतापुरला येत होती. वाटेंत चोरांनीं माझ्या सासऱ्याचा अन् त्या मोलकरणीचा खून केला."

" अन् तुझ्या नवऱ्याला काय त्यांनीं सोडून दिलं ? "

" तें माठे आश्चर्य खरं ! ईश्वरेच्छेनंच त्यांचे प्राण वांचले. "

मान्नाची ही हकीगत ऐकून नूना एक दीर्घ निश्वास टाकून म्हणाली " बुंदियेच्या इून मीं ऐकलं होतं कीं, माझे बाबा अन् भाऊ यांनांहि चोरांनींच मारलं. हाय ! ॥ वेळेस त्यांच्याप्रमाणं त्यांनीं मलाहि जर मारून टाकली असती तर मला कष्ट सहन करावे लागतेना ! "

यानतर दोघीहि थोडा वेळ स्तब्ध बसल्या. कांहीं वेळानें मान्ना म्हणाली ' नूना ! आपल्याला दुसरीहि एक तजवीज करून ठेविली पाहिजे. "

" कोणती बरं ? "

" आपल्याला मृत्यूचं कांहीं तरी साधन नेहमीं जवळ बाळगलं पाहिजे. कधीं णीं जर आपल्यावर बलपूर्वक अत्याचार करूं लागला तर आपल्याला तत्क्षणीं ात्महत्या करतां आली पाहिजे. "

" मृत्यूचं कोणतं साधन जवळ बाळगायचं—विष ? "

" नाही, विष नाहीं. "

" तर काय ? "

" अगदीं लहानसा जंबिया. "

" आपल्याला जंबिया कसा बाळगतां येईल ? "

" डोकीच्या केंसांत लपवून ठेवायचा ! तुझ्यापाशीं असले जंबिये आहेत ? "

" आहेत. "

" आतां आणतां येतील ? "

" हो, त्यांत काय झालं ? "

" जा तर, दोन चांगले पाजळलेले जंबिये लवकर घेऊन ये. "

नूनानें आपल्या खोलीतून दोन लहान जंबिये आणून मान्नाच्या हातीं दिले. मान्ना दोन्ही जंबिये लक्षपूर्वक पाहून म्हणाली "जंबिये तर फार उत्तम आहेत. यांचीं टोंक चांगलीं तीक्ष्ण आहेत. वेळ पडली तर अनायासानं छातींत मारून घेता येतील. माझे केश तूं अगोदर बांध; मग मी तुझे बांधीन. "

गेल्या दोन वर्षांत मान्नानें कोणाला आपली केशरचना करूं दिली नव्हती. तिची ती सुदीर्घ केशराशी अगदीं कांतिहीन होऊन गेली होती. नूनानें फणा घेऊन, तेल लावून मान्नाचे केश विंचरले आणि ते बांधतांना त्यांत एक लहान जंबिया लपवून

ठेविला. नंतर मान्नानें नूनाचे केश विंचरण्यास आरंभ केला. केश विंचरतां विंचरतां नूनाच्या मस्तकांत एके जागीं सुमारे तीन आंगळें लांबीचा एक वण मान्नाच्या दृष्टीस पडला. त्या डागावर आपली अंगुलि ठेवून मान्नानें नूनाला विचारलें "नूना! तुझ्या मस्तकावर हें काय ग झालेलं आहे ? एखाद्या शस्त्राच्या जखमेच्या डागाप्रमाणं दिसतो आहे हा डाग !"

" मी इथं यायच्या पूर्वीपासूनच माझ्या मस्तकावर हा डाग आहे. मला अंधुक अंधुक स्मरतं कीं, अगदीं लहानपणीं एका वृद्ध स्त्रीच्या कडेवर बसून मी खेळत असे. एक दिवस तिच्या कडेवरून मी एका दगडावर पडल्यें, त्यामुळं माझ्या मस्तकाला मोठी खोंक पडून तींतून किती तरी रक्त गेलं. त्याच खोंकीचा हा डाग, शस्त्राच्या जखमेचा नव्हे !"

नूनानें हें वृत्त सांगितल्यावर बराच वेळपर्यंत मान्ना स्थिर नेत्रांनीं नूनाच्या तोंडाकडे एकसारखी पहात होती. तें पाहून नूनानें विचारलं "असं काय करत्येस ताई? तुझ्या मनांत काय विचार चालले आहेत ?"

तरीहि मान्ना कांहीं बोलली नाहीं. नूनानें पुनः तोच प्रश्न विचारतांच तिनं उलट विचारलें " इथं यायच्या पूर्वीच्या हकीगतीचं तुला कांहीं स्मरण आहे का ?"

"नाहीं-कांहीं दिखील आठवत नाहीं ! फक्त एवढंच आठवतं कीं, एका काळ-सांवळया स्त्रीच्या मांडीवर बसून लहानपणीं मी खेळत असें. तिचं माझेवर फार प्रेम असे. इथं आल्यावर मला नेहमीं तिची आठवण होऊन रडूं कोसळत असे. अन् अझून दिखील तिच्यासाठीं मला फार वाईट वाटतं." बोलतां बोलतां नूनाचे डोळे भरून आले.

मान्ना स्थिर दृष्टीनें नूनाकडे बघत होती. नूनानें हें पाहून तिला विचारलं" असं काय करत्येस ? तुझ्या मनांत काय येतं ?"

मान्नानें विचारलें " तुझ्या गळयाखालीं छातीजवळ तीन काळेभोर तीळ आहेत का ?"

" आहेत—पण तूं हें कां विचारत्ये आहेस ?"

नूनाच्या प्रश्नाला उत्तर न देतां मान्नानें तिच्या छातीवरील पदर दूर केला. त्याबरोबर नूनाच्या छातीवरील तीन काळे तिळ दृष्टीस पडले. कसल्या तरी गोष्टीचें चिंतन करित मान्ना बराच वेळ स्थिरभावानें बसली होती. मान्ना असें हें वेड्यासारखें काय करित आहे याचा नूनाला कांहींच उमज पडेना. तिनें अधीर होऊन विचारलें " ताई, कसला विचार करित आहेस. सांग गडे !"

मान्नानें एक दीर्घ निश्वास टाकला. बऱ्याच वेळानें ती ह्मणाली " नूना ! परमेश्वराची लीला अगाध आहे! त्याचे खेळ कुणालाहि कळून येत नाहींत. तुझं मुख अगदीं माझ्या पताच्या मुखासारखं आहे, तुझे दांतहि अगदीं तिकडच्यासारखं आहेत, तुझं हंसणंदेखील तिकडल्यासारखच आहे! इतके दिवस मी तुझ्या सहवासात आहें, पण काय बाई चमत्कार— आज हें सारं माझ्या प्रथमच लक्ष्यात आलं. ' चोरांनीं बाबांचा खून केल्यावर त्यांचं अन् बरोबरच्या दासींचं अशीं दोन प्रेतं सांपडलीं, पण माझ्या बहिणीचा मृत देह तिथें मुळीच दृष्टीस पडला नाहीं.' असं मला तिकडून नेहमीं सांगायचं होत असे. त्याचप्रमाण बरेच जण ह्मणत असत कीं. मामजाचा खून करून पोरं धरणाऱ्या ठगांनीच त्यांच्या मुलीला पळवून नेलं असेल पण माझ्या नणंदेचा पत्ता अझूनपर्यंत लागला नव्हता ' माझ्या बहिणीच्या डोक्यावर एक जखमेचा डाग आहे. अन् छातीवर तीन काळे मोर तीळ आहेत ' अशा माझ्या नणंदेच्या खुणा तिकडच्या तोंडून मीं पुष्कळ वेळां ऐकिल्या आहत. त्या सर्व खुणा तुझ्या अंगावर दिसताहेत. तुझ्या डोकींतल्या जखमांचा डाग पाहिल्याबरोबरच माझ्या मनांत ही कल्पना आली. पण निश्चयपूर्वक मला कांहींच सांगता येत नाहीं. ह्मणून तुला विचारतें, इथं येण्याऱ्या पूर्वीच्या गोष्टींच तुला कांहीं स्मरण आहे का ? "

" नाहीं ताई, मला कांहींदेखील स्मरण नाहीं. "

मान्ना स्तब्ध बसून राहिली. नूना ही आपल्या पतीची धाकटी बहीणच असावी, असें तिला निश्चयपूर्वक वाटूं लागलें जों जों ती विचार करी. तों तों या गोष्टीची तिला खात्री वाटूं लागली तिच्या मनांत निरनिराळे विचारतरंग येत होते. विचार करित करित हळुहळू मान्नाने नूनाचे केश बांधून त्यांत जांबया लपवून ठेवल्या. केश बांधून झाल्यावर ती नूनाच्या मुखाकड सतृष्ण नयनांनीं एकसारखी एकाग्र दृष्टीनें पहात राहिली बऱ्याच वेळाने हृदयांतील खळबळ थोडीशी शांत झाल्यावर ती प्रेमभरानें नूनाला ह्मणाली " नूना, तूच माझ्या प्रिय पतीची कनिष्ठ भगिनी, यांत मला तिळमात्र संदेह वाटत नाहीं ! तुझी ओळख पटल्यावर माझान गळलेलें माणिकच मिळालं, असं मला वाटूं लागलं आहे तुझे बंधु तुझ्यासाठीं इतके दिवस सारखे शोक करित आहेत — धाईधाई रडत आहेत. काय त्या दयाघन परमेशाची अद्भुत लीला कीं, अशा या घोर संकटाचे वेळीं त्यान मला हा हरवलेला अमूल्य नीधि प्राप्त करून दिला. हाय ! तुझ्यासाठीं सतत दुःखानं झुरणाऱ्या तुझ्या बंधूच्या

मांडीवर जर मीं तुला एकवार स्वहस्तानं बसविलं असतं, तर आजपर्यंत भोगलेलं सर्व दुःख मी पार विसरून गेल्यें असत्यें; परंतु या मंदभागिनीच्या नशिबीं ते सुख नाहीं—मला ती आशा नाहीं. माझ्या नाथांची भेट होण्यापूर्वीच आपणा दोघींनां आत्महत्या करून घ्यावी लागेल."

असे म्हणून मान्नाने नूनाला प्रेमाने आपल्या मांडीवर बसविलें आणि स्नेहभराने तिचे चुंबन घेतलें. एकमेकांच्या गळयांत गळा घालून दोघीहि स्फुदस्फुदून रडूं लागल्या.

अशा रीतीनें त्या नणंदाभावजयांच्या हितगुजाच्या गोष्टी चालतां चालतां रात्र सरला. साधुसिंह हत्तींच्या माहुतांनां हांका मारू लागला आणि पालख्यांच्या भोयांना जागें करू लागला म्हातारीहि त्याच्या हाकांनी जागी झाली. तिने आदल्या दिवशींच लखनौला जावयाची सर्व तयारी करून ठेविला होती. अंथरुणावरून उठल्याबरोबर म्हातारी मान्नाच्या खोलीशीं येऊन दरवाजा ठोठू लागली नूनाने झटकन् येऊन दार उघडले. म्हातारी खोलीत येऊन पहाते, तो दोघीहिजणींनी आपापले केश विचरून नीटनेटके बांधून ठेविले आहेत असे तिच्या दृष्टीस पडले. तें पाहून तिला फार आनंद झाला बादशहाच्या अंतःपुरांत प्रवेश करून घेण्यासाठीं मोठ्या आनंदाने या आपणच प्रयत्न करावयास लागल्या आहेत, असें म्हातारीला वाटून तिला मोठं समाधान झालें

सर्व तयारी होऊन एका तासांत मंडळी निघाली मान्ना, नूना आणि म्हातारी आपापल्या मेण्यांत बसल्या. तरवार आणि बंदुका या शस्त्रांनी सज्ज होऊन साधुसिंह हत्तीवर बसला. त्याचा हत्ती मेण्यांच्यापुढे चालला होता दुसऱ्या हत्तीवर एकजण बसून मेण्यांच्या पिछाडीनें जाऊ लागला.

## प्रकरण १३ वें.

# गोरखपुर येथील सेशन कोर्ट.

* The association of the most abject superstition with the deepest guilt has been often noticed. The justness of the observation is examplified in the conduct of most classes of Indian delinquents, and remarkably so in that of the Phansigars.

—*Asiatic Researches, Vol. XIII.*

एकंदर वाचकांची—विशेषतः हल्लींच्या स्त्रीवाचकांची—कल्पित कादंबऱ्या आणि नाटके वाचण्याकडे जास्त प्रवृत्ति असल्याचें दिसून येतें. काव्याकडेहि वाचकांची थोडीबहुत प्रवृत्ति आहे. कविकल्पित अलौकिक दाम्पत्यप्रेम, अत्युदात्त पितृमातृभक्ति, अभूतपूर्व सच्चरित्र्य, असाधारण धर्मपरायणता, अत्यंत दारुण निष्ठुराचरण, भीषण अत्याचर, अद्भुत नृसंशता, संसारसागरांतील भयंकर कल्लोल, असलेच विषय वाचकवृंदाला फार प्रिय असतात; परंतु या भरतखंडाच्या इतिहासाचें पर्यालोचन केल्यास वाचकवृंदास असें खास दिसून येईल कीं, आम्हा भरतखंडनिवासियांच्या जीवनाच्या घटनेत अद्भुत व्यवहार, अलौकिक धर्मभाव, स्वर्गीय प्रेम, अगावर शहारे उत्पन्न करणारे भीषण निष्ठुराचरण, यांचीं जीं उदाहरणें दृग्गोचर होतात, त्यांच्यापुढे कवीचा कल्पना, चित्रकारांचें कलम आणि कादंबरीकारांची रचनाशक्ति या सर्वांचा गति कुंठित होऊन जाते! सीतादेवीचें पतिप्रेम, रामचंद्राची पितृभक्ति, महात्मे आणि योगी यांचा धर्मभाव, ठगांची नृशंसता, कांहीं कांहीं मुसलमान बादशहांचें प्रजापीडन, ईस्ट इंडिया कंपनीचा अत्याचार, यांच्यापुढे कोणत्या कवीची कल्पना, कोणत्या कादंबरीकाराची किंवा नाटककाराची रचनाशक्ति कुंठित होणार नाहीं ?

---

* अत्यंत घोर अपराधांचे अत्यंत नीच धर्मभोळेपणाशीं साहचर्य असल्याचें हमेशां दृष्टीस पडतें या सिद्धान्ताची सत्यता हिंदुस्थानांतील बहुतेक लुटारू जातीच्या—त्यांतहि विशेषकरून ठग जातीच्या—वर्तनांत ठळठळीतपणानें दिसून येते.

—एशिआटिक रिसर्चिस्, पुस्तक १३.

हल्लींच्या बहुतेक वाचकांनां 'ठग' हें नांव ऐकल्याबरोबर त्यांच्याविषयीं कांहीं अस्फुट कल्पना येइल हे खरें, परंतु त्यांच्या धर्मकल्पना, त्यांचा धंदा, त्यांच्या टोळ्या वगैरेसंबधाने विशेष माहिती असणे फारसें संभवनीय नाहीं; ह्मणून ठगलोकांसंबंधीं या स्थळीं संक्षिप्त माहिती देण्याचा आमचा मानस आहे.

कोणत्या काळीं, कोणत्या राजाच्या कारकिर्दीत, कशा तऱ्हेने भरतखंडांत हा ठगसंप्रदाय प्रचलित झाला, यासंबंधानें निश्चयात्मक माहिती अद्यापपर्यंत कोणालाहि उपलब्ध झाली नाहीं. कांही शोधकांचे मत असें आहे कीं, मिसर ( इजिप्त ) देशांत प्रथम हा संप्रदाय स्थापन झाला. नतर क्रमाक्रमानें हळुहळू इतर देशांतून ठगीचा प्रसार झाला. दुसरे कांहीं पंडित ह्मणतात की, हिंदुलोकांच्या तंत्रप्रचारित धर्माचें ठगीपथ हे अवश्य भावीफल आहे. परंतु या कथानकांत ठगींच्या समग्र इतिहासाचे पर्यालोचन करण्याचे प्रयोजन नाहीं. गेल्या शतकाच्या प्रारंभीं ठगीच्या अत्याचाराचें स्वरूप काय होतें, एवढ्याबद्दलच प्रस्तुत ठिकाणीं उल्लेख आला ह्मणजे पुरे आहे.

ख्रिस्ती शकाच्या एकोणिसाव्या शतकाच्या प्रारभीं या ठगसंप्रदायावर ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकारीवर्गाची दृष्टि फिरली. ठगांच्या निर्मूलनासाठीं सर वुइल्यम बेंटिंक या थोर पुरुषाच्या कारकिर्दीत पुष्कळ उपाय करण्यांत आले व ते बहुतांशीं फलद्रुपहि झाले. ठगांचें निर्मूलन करण्याच्या कामावर कर्नल स्लीमनची नेमणूक झाली.

त्या काळी कन्याकुमारीपासून काश्मीरपर्यंत सर्व भरतखंड या ठगांच्या अत्याचारानें पीडित होऊन गेले होते. ठग टोळ्या करून रहात असत. बहुधा प्रत्येक टोळींत ऐंशीं नव्वद लोक असत. कांही टोळ्यांत दोन दोनशेपर्यंत ठग असत आणि एकदोन टोळ्यांत तर पांचपांचशे ठग असून ते प्रवाशांचे प्राण हरण करण्याचा आपला धंदा निर्धोकपणे चालवित असत.

या ठगलोकांच्या धर्मकल्पना कांहीं विलक्षणच होत्या. त्यांच्या धर्माची अशी एक कल्पना होती कीं, एकदा पृथ्वीवर लोकसंख्या अधिक झाल्यामुळें भवानीदेवीनें आपल्या भक्तांनां लोकांचा ऱ्हास करण्याची आज्ञा केली. तिची आज्ञा ऐकून भक्तांनी भवानीला विचारले कीं "नरहत्या करणारांनां पृथ्वीवरील सर्व देशांत राजे किंवा शासनकर्ते प्राणदंडाची शिक्षा देतात. तुझ्या आज्ञेप्रमाणे जर हें दुष्कर्म आह्मी करूं लागलों, तर आम्हांलाहि हा राजदंड

भोगावा लागेल. " तेव्हां भवानी आपल्या भक्तजनांनां आश्वासन देऊन म्हणाली, "नरहत्या करतांना रक्तपात करूं नका म्हणजे झालें. त्याप्रमाणेच खून केल्याचें थोडेसुद्धां चिन्ह राहूं देऊं नका. लोकांच्या गळ्याला रुमालाचा फांस घालून त्यांना ठार करावें. तुम्हीं मारलेल्या लोकांचे मृतदेह मी स्वतः नाहींसे करीन. मग देशांतील राजे किंवा शासनकर्ते यांनां तुमच्या कृत्यांचा सुगावा लागणार कसा? या युक्तीनें माझी आज्ञा पाळतां येऊन तुम्हांला राजदंडहि भोगावा लागणार नाहीं." भवानीदेवीनें आपल्या भक्तांनां असा उपदेश केल्या दिवसापासून ठगलोक लोकांच्या गळ्याला रुमालाचा फांस घालून त्यांचा नाश करूं लागले मारलेल्या लोकांचीं प्रेतें भवानीदेवी स्वतः नाहींशी करील अशा पूर्ण समजुतीने प्रेते तेथेंच टाकून ते चालते होत. पण जगांत कांही सवच लोक आंधळेपणाने विश्वास ठेवणारे नसतात. एकदा ठगांच्या एका टोळीने पुष्कळ लोकांना ठार करून त्यांचीं प्रेतें जागच्या जागीच ठेवली आणि भवानी या प्रेतांना खरोखरच लपविते कीं काय ते आपल्या डोळयांनीं प्रत्यक्ष पहावे म्हणून ते त्या स्थानापासून कांही अंतरावरच्या एका झाडींत लपून बसले. कांहीं वेळानें कालीदेवी नग्नस्थितींतच तेथे येऊन मृतदेह भक्षण करूं लागली. अकस्मात् कालीची दृष्टि त्या झाडींत लपलेल्या ठगावर गेली. त्यावळीं नग्नावस्थेंत ती नरमांस भक्षण करित होती; अशा स्थितींत आपण इतरांच्या दृष्टीस पडलो, याची तिला फार लाज वाटू लागली. अत्यत कोपाविष्ट होऊन त्या अविश्वासी ठगांनां तिनें शाप दिला कीं "आजपासून तुह्मा ठगाचे मी रक्षण कारण नाही! तुम्ही मारलेल्या लोकांचे देहहि मी लपविणार नाही!" भवानीदेवीच्या या शापानें ठग फारच घाबरले. भवानीचे चरण घट्ट धरून त्यांनी मनःपूर्वक क्षमा मागून तिची पुष्कळ स्तुति केली. त्यांच्या स्तुतीने संतुष्ट होऊन कालीन सदयातःकरणाने त्यांनां उःशाप दिला कीं, "मी प्रेते तर आतां लपविणार नाहीच! पण तुमच्या रक्षणार्थ तुह्माला मी एक कुऱ्हाड देते." असे म्हणून देवीने त्यांनां एक कुऱ्हाड दिली आणि तेव्हापासूनच ठग लोकांत कुऱ्हाड बरोबर बाळगण्याची चाल पडली. काली देवीच्या पूजेच्या वेळीं ठगलोकांच्या गुरूला खांद्यावर एक कुऱ्हाड घऊन सर्वांच्या पुढे चालावे लागतें.

ज्याप्रमाणें सैन्यांत मेजर, कप्तान, स्वार, शिपाई इत्यादि निरनिराळ्या पदवीचे लोक असतात, त्याप्रमाणें ठगांच्या टोळयांतहि निरनिराळ्या हुद्दयांचो माणसें असत. ठगलोकांच्या प्रत्येक टोळींत सभ्य लोकांसारखा पोषाक करून, वाटसरू

लोकांना फसवून आपल्या जाळयांत आणण्याचें काम करणारे दहाबाराजण असत. त्यांना ठगांच्या भाषेंत 'साथे' असें ह्मणत ठगलोकांची एक निराळीच भाषा होती. तिचें नांव 'रामासी' भाषा. जे ठगांच्या टोळींत हा धंदा शिकण्यासाठीं शिष्य म्हणून प्रवेश करीत, त्यांना ही रामासी भाषा शिकविली जात असे. जे ठग प्रवाशांच्या गळयाला रुमालाचा फांस घालून त्याचा जीव घेत त्यांना 'भर्तोत' किंवा 'बर्क' अशी संज्ञा होती. लोकांच्या गळयाला रुमालाचा फांस घालतांना या भर्तोतांना सहाय्य करावयाला जे ठग त्याच्याजवळ उभे असत त्यांना 'सार्मसिया' असें ह्मणत असत

ठगांच्या रुमालांस बळी पडलेल्या लोकांची शवें लपविण्याचें काम जेव्हां भवानी देवीनें सोडून दिलें, तेव्हांपासून ठग लोकांच्या टोळींत एक नवीनच पदवी उत्पन्न करावी लागली. त्यांच्या टोळींत पूर्वी 'लगाई' नांवाची जागा नव्हती; परंतु वर सांगितलेल्या प्रसंगापासून 'लगाई' नांवानें टोळींत आणखी एक जागा उत्पन्न करण्याचे ठगांना प्रयोजन पडलें. टोळींतील पुष्कळ ठगांना हे 'लगाई' चें काम करावें लागे. वाटसरू लोकांना आपल्या जाळयांत पकडून त्यांचा प्राण घेण्याच्या वेळेस हे 'लगाई' ठग एखाद्या नदीजवळ किंवा नेमलेल्या स्थळाच्या आसपास खड्डे तयार करून ठेवीत असत प्रवाशांना मारण्यापूर्वीच त्याच्यासाठी हे खड्डे खणले जात त्यांचा जीव घेतल्यावर लागलीच 'लगाई' ठग त्या प्रवाशांची प्रेतें या खड्डयांत आणून पुरीत 'लगाई' या शब्दाचा अर्थ 'खड्डे खोदणारे लोक' असा आहे.

एखाद्या नूतन धर्माची स्थापना झाल्यावर कालक्रमाने हळुहळू त्या धर्माचें अवलंबन करणाऱ्या लोकांत निरनिराळे पंथ आणि संप्रदाय उत्पन्न होतात. याच नियमाप्रमाणे कांहीं काळ लोटल्यावर ठगलोकांतहि निरनिराळे भेद आणि संप्रदाय उत्पन्न झाले. एकोणिसाव्या शतकाच्या प्रथम पादाचे सुमारास ठग लोकांत सुमारें दहाबारा भिन्न भिन्न पंथ प्रचलित होते. प्रस्तुत कथानकांत त्यांपैकीं फक्त 'मेघपूना' (Megpuna) संप्रदाय, ह्मणजे मुलें धरणारे ठग, आणि रुमालाने मुसाफरांचे प्राण हरण करणारे ठग, या दोन पंथांचा संबंध आला आहे हे ठग कधीं सन्याशाच्या वेषानें, कधीं फकिरांच्या वेषानें, तर कधीं व्यापाऱ्यांच्या वेषानें देशपर्यटन करित असत; परंतु बहुतेक ठग संसारत्यागी साधूच्याच वेषानें फिरत असत.

या कथानकांत वर्णिलेल्या गोष्टीचे प्रसंगीं गोरखपुर, गाजीपूर, दिल्ली आणि इतर दुसऱ्या शहरांत शंभर दीडशें ठग लोक पकडले गेले होते. गोरखपुरच्या

सेशन कोर्टांत अगोदरच ठगांच्या चौकशीला आरंभ झाला होता गाजीपूर, दिल्ली वगैरे ठिकाणीं पकडलेल्या ठगांची चौकशी गोरखपुरच्या ठगांबरोबरच झालेली बरी, असा विचार करून दिल्ली वगैरे ठिकाणीं पकडलेल्या ठगांनीं सरकारी चौकशीसाठीं गोरखपुरला पाठविलें होतें. इंग्रजी कायद्याप्रमाणें पुराव्यानें अपराधाची शाबिती झाल्याशिवाय कोणालाहि शिक्षा करतां येत नाहीं. आणि अनेक प्रयत्न करूनहि पोलिसाला सर्व ठगांच्या विरुद्ध पुरावा गोळा करतां आला नाहीं म्हणून त्या शंभर दीडशें ठगांतून पधरासोळाजणांनां क्षमा करण्याचे वचन देऊन त्यांना इतरांविरुद्ध साक्षी करण्यांत आलें होते! इतर ठगानां हातापायात बिड्या घालून सेशन कोर्टात उभे केलें होतें साक्षी करण्यांत आलेल्या ठगांची एकामागून एक साक्ष घेण्यांत येत होती. पुढे लिहिल्याप्रमाणे त्यानां कोर्टाकडून प्रश्न विचारण्यांत येत होते, व ठग त्यांची उत्तरे देत होते.

"तुझे नांव काय?"

"क्षेमा जमादार."

"तुझा धंदा काय?"

"मेघपूना ठगीचा—म्हणजे वाटसरांचे खून करून त्यांच्या लहान मुलांची चोरी करण्याचा."

"कुणाकडून हा धंदा सुरू झाला?"

"मुलतानच्या अलिकरामाकडून चाळीस वर्षांपूर्वी मी अलिकरामाचा शिष्य होतो"

"कोणकोणत्या देशांत तू खून केले आहेस?"

"जयपुर, बिकानेर, भरतपुर, पंजाब, अयोध्या आणि प्रयाग इतक्या प्रदेशांत मीं खून केले आहेत."

"आपल्या बायकोला बरोबर घेऊन तू देशांतून फिरत होतास?"

"होय. आमच्या बायका नेहमीं आमच्या बरोबरच असतात खून करून प्रवाशांची मुले आम्ही पळवून आणल्यावर आमच्या बायकाच त्याचें पालनपोषण करतात."

"प्रवाशांचीं मुलें तुम्हीं कां पळवतां?"

"त्यांनां पुढें आम्ही विकतों."

"तुम्ही मुलें कुणाला विकतां? आणि त्यांची तुम्हांला काय किंमत येते?"

" वेश्या, कंचनी, नायकिणी आणि बडे लोक ह्या मुलांना विकत घेतात. त्यांचे आम्हांला पाऊणशें एशीं रुपये येतात. मुलींचे तर शंभर दीडशें रुपये येतात."

"तुम्ही कोणत्या देवांची आणि देवींची पूजा करतां?"

"आम्ही भवानीची पूजा करतों. लहानलहान मुलांमुलींनां विकून आम्हांला जे पैसे मिळतात त्यांपैकीं थोडथोडे आम्ही भवानीच्या पूजेत खर्च करतों."

"शहाजहानपुरच्या आणि मथुरेच्या खुनांचे वेळीं तूं हजर होतास का?"

"होय, होतों."

"आणखी कोणकोण तेथें हजर होते?"

"रतनदास, देवीदास, देवीदासाची बायको गंगा, दुसरा क्षेमा, त्याची बायको भक्ति, बैराम कोतवाल, सालगा, जानकीदास, छत्रदास, तिलकनायक, स्वरूपी आणि दुसरे पुष्कळ लोक तेथे हजर होते."

या क्षेमा जमादारानंतर रुमालवाल्या ठगांच्या टोळीपैकीं शेख एनायतची साक्ष पुढीलप्रमाणें सुरू झाली:—

"तुझें नाव काय?"

"शेख एनायत."

"तुझ्या टोळीचा तू नाईक आहेस का?"

"नाहीं, मी नाईक नाही."

"मग तुझ्या टोळीचा मुख्य कोण?"

"पूर्वी माझा बाप डिंगू नाईक होता. हल्लीं गुरुबक्ष नाईक आहे."

"तुझ्या टोळींत कितीजण ठग आहेत?"

"पूर्वी तीनशें होते. पण आतां आमच्या तीन टोळया झाल्या असून प्रत्येक टोळींत ऐशीं नव्वद लोक आहेत."

"तीनशे लोक एकत्रच देशभर फिरत असत?"

"नाहीं निरनिराळ्या रस्त्यांनीं जाऊन कामाच्या वेळीं ते एके ठिकाणीं जमत होते. त्यांपैकीं काही संन्याशाच्या वेषानें, काही फकिरांच्या वेषानें, आणि कांहींजण शिपायांच्या वेषाने फिरत. हे सर्व एकाच टोळींतल आहेत असें कुणालाहि ओळखतां येणे शक्य नसे."

"नबाब सबजीखांचा खून तुमच्याच टोळींतल्या लोकांनीं केला का?"

"होय नबाब सबजीखांचा खून आम्हींच केला."

" सबजीखांचा खून तुम्हीं कुठें आणि कसा केला ? "

" भोपाळचे नबाब वजीर महम्मद यांचा काका नबाब सबजीखां आणि त्याचा मुलगा हे हैद्राबादच्या निजामाच्या फौजेंत नोकरी करावयाला गेले होते. मध्यंतरीं नबाब सबजीखां आणि त्याचा मुलगा यांत तंटा लागला. सबजीखां पन्नास घोडेस्वार आणि आपल्या दासदासी यांनां बरोबर घेऊन स्वदेशांत परत यावयाला निघाला. त्याच्याबरोबर तरवारी, बंदुका वगैरे शस्त्रें भरपूर होतीं. सबजीखां आणि त्याच्या बरोबरचे लोक यांचा खून करावयाचे आमच्या मनांत आलें. आमच्या टोळीचे सांथे दलिलखां, खलिलखां व शिवबक्ष यांनीं नबाबाच्या लोकांकडे जाऊन 'आम्ही घोडे घेऊन विक्रीकरतां दक्षिणेकडे गेलों होतों; आतां परत देशीं जात आहों,' असें त्यांनां भासविले. त्यांच्या गप्पांनीं सबजीखां त्याच्यावर फार खूष झाला. कांहीं वेळानें आमच्या टोळीतले आणखी पांच असामि फकिरांच्या वेषानें दुसऱ्याच दिशेनें येऊन नबाबाच्या लोकानां मिळाले. 'आपल्याबरोबरच आम्ही देशी जाणार आहों,' असें त्यांनीं नबाबाला सांगितले. पूर्वीं आलेल्या तिघाजणांशीं यांचा परिचय असेल अशी कल्पनासुद्धां नबाबाच्या लोकांनां आली नाहीं. या प्रमाणेच हळुहळू निरनिराळया दिशाकडून आमच्या टोळींतले सर्व लोक नबाबाच्या लोकांनां येऊन मिळाले. दोन दिवसपर्यन्त आम्ही नबाबाच्या लोकांबरोबर उत्तरेकडे जात होतों. दुसऱ्या दिवशी रात्रीं आम्हीं बेत ठरविला, कीं, उद्या या सर्वांनां जगांतून नाहींसें करावयाचें! माझा बाप हिंगु याने इशारा करतांच आमच्या टोळींतील एका एका इसमाने नबाबाच्या लोकांपैकीं एकेकाच्या गळयाला रुमालाचा फांस घालावयाचा, असें निश्चित झाले. खूण कोठल्या शब्दानीं द्यावयाची हेंहि त्याचवेळीं ठरले. 'पान लेओ' असे शब्द हिंगूच्या तोंडून निघतांच ज्याने त्यानें आपापला बळी पाडावयाचा! याप्रमाणे नबाबाच्या लोकांनां ठार करावयाची व्यवस्था चोख झाली.

" दुसऱ्या दिवशीं आम्ही एका नदीकांठीं एका धर्मशाळेशीं येऊन पोहोचलों. पूर्वींच ठरल्याप्रमाणे आमच्या टोळींतले लगाई लोक लांकडें आणण्याचा बहाणा करून नदीजवळच्या जंगलांत प्रेते पुरण्यासाठीं खड्डा खणूं लागले. इकडे आमचा सोथां दलिलखां नबाबाला म्हणाला 'हुजुर! तीन दिवसपर्यंत सारखे चालून चालून आम्ही अगदीं दमून गेलों आहों. आता ऊनहि बरेंच झालें आहे. ऊन कमी होईपर्यंत आपण येथेंच पडून थोडीशी विश्रांति घ्यावी, असें मला वाटतें.

मग हुजूरचा काय हुकुम होइल तो खरा !' दलिलखांवर नबाबाची फार मेहेरबानी होती. नबाब त्याच्या बोलण्यानें खूष होऊन म्हणाला 'बहुत आच्छा ! आज येथेंच आराम करूं.'

"सदासर्वदा नबाब भांगेच्या रंगांत गुंग असे म्हणून त्याला सबजीखां असें म्हणत असत. नबाबानें आपल्या लौंडीला भांग तयार करून आणावयाला सांगितलें. थोडया वेळानें दासीनें भांगेचे तीन प्याले तयार करून आणले. नबाबानें तिची फार प्रशंसा केली. दासी हंसूं लागली. नबाबानें एक प्याला गट्ट करून जवळ बसलेल्या दोघानां दोन प्याले दिले. आणखी एक प्याला थंडाई आणावयाला त्यानें दासीला हुकूम केला. त्याप्रमाणें दासी हंसत हंसत पुन: भांग तयार करावयाला गेली. त्याच्यापूर्वीच आमच्या टोळीतले दोनदोन असामी मोठ्या सफाईनें नबाबाच्या प्रत्येक इसमाच्या मागें बसून होते. सर्व तयारी बरोबर आहे असें पाहून माझ्या बापानें 'पान लेओ' असें म्हणून खूण केली—त्याबरोबर निमिषार्धांत आमच्या टोळींतल्या साठ असामींनीं नबाबाच्या साठ लोकांच्या गळ्याला रुमालांचे फांस घालून त्यांची प्रेतें पाडलीं. नबाबाच्या लोकांला हात उचलण्याचीहि संधि मिळाली नाही आमच्या लोकांनीं इतक्या चतुराईनें काम केलें कीं, नबाबाच्या लोकांनां एक शब्दहि तोंडावाटे काढतां आला नाहीं यांप्रमाणें एका निमिषांत आम्हीं साठजणांचे खून केले—पण लवमात्र आवाज कुठे झाला नाहीं. नबाब सबजीखां बसला होता त्या जागेपासून वीस हातांवर त्याची दासी भांग तयार करित होती पण तिला या प्रकारांपैकीं कांहींएक समजलें नाहीं. मेलेले लोक जिभा बाहेर काढून पडले होते. त्यांच्या तोंडातून लाळ गळत होती. भांगेचा प्याला हातांत घेऊन दासी हळुहळू नबाबाच्या जवळ येऊन पहाते, तों नबाब तोंड वांसून पडला आहे. नबाब मेला हें तिला त्या वेळपर्यंत कळून आलें नाहीं. ती बाहेरून नबाबाच्या दासीसारखी वागे, पण खरोखर लग्नाच्या बायकोपेक्षांहि नबाबावर तिचें अत्यंत प्रेम होतें नबाबाला उठविण्यासाठीं ती त्याच्या अंगावर हात टाकणार, तों आमच्या टोळींतला एकजण तिचा खून करावयाला पुढें सरसावला. त्या दासीवर माझी नजर गेली होती तिला बरोबर घेऊन जावयाचा मीं मनांत निश्चय केला होता. मीं तिचा खून करूं दिला नाहीं; परंतु नबाब आणि त्याच्या बरोबरचे सर्व लोक हे आमच्या हातून मारले गेले असें जेव्हां तिला कळून आलें, तेव्हां ती नबाबाच्या शोकानें अत्यंत विव्हळ होऊन शोक करूं लागली. जवळजवळ

वीस कोसपर्यंत मीं तिला वळजबरीनें आपल्याबरोबर आणली, पण माझ्याबरोबर जावयाला ती कांहींकेल्या राजी होईना. तेव्हां मींहि तरवारीने तिचे दोन तुकडे करून रस्त्यांतच फेंकून दिले. नंतर कांहीं दिवसांनीं मी जबलपुरला जाऊन पोहोंचलों."

"आणखी कुठे तू खून केले आहेस ?"

"बुंदेलखंडांत पुष्कळ ठिकाणीं मीं खून केले आहेत. जबलपुर आणि नागपुर प्रांतांतहि मी पुष्कळ हत्या केल्या आहेत. गेल्या दहाबारा वर्षांत मीं चारपांचशें लोकांचे खून केले आहेत."

"बंगाल किंवा बहार देशांत तूं कधीं गेला आहेस का ?"

"आमच्या टोळींतील लोक निरनिराळे होऊन एक भाग राजमहाल आणि मुर्शिदाबादेकडे गेला होता. ते लोक जलमार्गाने तिकडे गेले होते; दुसरा भाग हाटियाकडे गेला. असे मी ऐकले आहे."

"येथे हजर आहेत त्यांपैकीं कोण कोण राजमहालच्या खुनांच्या वेळेला होते ?"

"मी स्वत: राजमहालाला गेलो नव्हतो; पण नसीर आणि साहेबखां तिकडे गेले होते असें मीं ऐकले आहे."

"तूं मुसलमान असून कालीची पूजा करतोस ?"

"काली आणि फतेमा एकच !"

शेख एनायतची साक्ष झाल्यावर मुलें चोरणाऱ्या ठगांच्या दुसऱ्या टोळींतील आमरी नांवाच्या स्त्रीची साक्ष घेण्यास सुरुवात झाली. तिला विचारलें "तुझें नांव काय ?"

"आमरी उर्फ कुंभा."

"तूं पूर्वी दिल्लीच्या तुरुंगांत होतीस ना ?"

"आठ वर्षांपूर्वी मी चार वर्षे दिल्लीच्या तुरुंगांत होत्यें."

"कोणत्या अपराधामुळे तुला शिक्षा झाली होती ?"

"दिल्लीजवळ तीन प्रवाशांचा खून केल्याच्या अपराधावरून."

"तुला कशी पकडली ?"

"आमच्या टोळींतल्या लोकांनी दोन पुरुष आणि एक बायको अशा तिघांचा खून करून त्यांचीं प्रेतं नदींत फेकून दिलीं. त्यांच्याबरोबर एक तीनचार वर्षांची मुलगी होती. दुसऱ्या दिवशीं मी त्या मुलीला घेऊन जात होत्ये ती मुलगी फार रडू लागली. वाटेंत एक साहेब आम्हाला पकडायला आल्यामुळे मी मुलाला

रस्त्यांतच टाकून देऊन पळून जाऊं लागल्यें. टोळींतले दुसरे सगळे लोक पळून गेले; मी मात्र एका शिपायाच्या हातांत सांपडल्यें "

" ती मुलगी हल्लीं कुठे आहे ? "

" त्या मुलीला साहेबानं नेल हल्लीं ती कुठं आहे तें मला माहीत नाहीं. "

" तुमच्या टोळीचा नाईक कोण ? "

" आमच्या टोळीचे नाईक माझं यजमान जीवनदास. मी टोळीची जमादारीण होत्यें. "

" तुमच्या टोळींत किती लोक होते ? "

" चाळीस. "

" त्याचीं नावें सांग पाहू. "

" माझा मुलगा रूपा. त्याच्या दोन बायका राधा आणि रुक्मिणी, माझे घरधनी जीवनदास, मगलदास, इमामबक्ष, मनाखां, गणश अन् दुसरं बरेच आहत. हा म्हातारा ब्राह्मण आमच्या टोळात दहा वर्षांपूर्वी होता. याला आह्मी शाळिग्रामसिंह ह्मणत असू "

सेशन जज्ज मि. बुइलसन यांनीं या वेळीं आमरीचं साक्ष घेण्याचें बंद करून तिनें दाखावलेल्या वृद्ध ब्राह्मणाची साक्ष घेण्याचें ठरविलें. कारण, तो ब्राम्हण अगदीं मृत्यूच्या दाराशी येऊन ठप होता आणखी एखादा दिवस फार तर तो वाचेल असे वाटल्यावरून सेशन जज्जानें त्याचीच साक्ष अगोदर घेण्याचा निश्चय केला.

त्या वृद्ध मनुष्याला हलण्याचीहि शक्ति राहिली नव्हती. ता कोटाच्या बाहेर एका जीण घोंगडीवर पडला होता. ठगानां पकडणाऱ्या पोलिसनें त्याला सन्याशाच्या वेषांत फिरतांना पाहून हाहि ठगच असेल असें समजून त्याला पकडून आणले होतें. त्याला उभं राहून साक्ष देण्याची शक्ति नाहीं असें पाहून जज्ज साहेब त्याच्या घोंगडीजवळ बसून त्याची साक्ष घेऊं लागले साहेबानें त्याला प्रश्न करतांच तो ढळढळां रडूं लागला. तो म्हणाला " साहेब, मी घोर पातकी आहें! तुम्हीं मला अगोदर फांशीं द्या! माझ्या बंधू या मार्गाचे अवलंबन मीं न केल्यामुळें माझी ही अशी दशा झाली आहे! साहेब, मला अगोदर फासावर चढवा! "

साहेब त्या वृद्ध ब्राम्हणाला नीट समजावून सागूं लागला. मृदु शब्दांनीं त्याने विचारलें " दिल्लीच्या खुनाचे वेळीं तू तथें हजर होतास कीं नाहीं ? तसेंच दुसरं कोणकोण तेथें हजर होते, साग बरे. "

" साहेब, माझ्या प्रश्नाचें तुम्हीं अगोदर उत्तर दिल्याशिवाय मी तुमच्या प्रश्नांचीं उत्तरें देणार नाहीं! तुम्हीं माझं काय कराल ? मला फांशीं द्याल ? मला तर तेंच पाहिजे आहे! "

त्या वृद्ध ब्राम्हणाचें हें भाषण ऐकून साहेब मोठ्या विचारांत पडला. साहेबानें त्याला विचारलें " तुझे काय प्रश्न आहेत, विचार पाहूं ? "

म्हातारा थोडासा स्थिर होऊन म्हणाला " साहेब, मला आपणाला इतकेंच विचारावयाचें आहे कीं. देशाचा राजा जर या ठगांप्रमाणें आणि दरोडेखोरांप्रमाणें प्रजेचें सर्वस्व हरण करूं लागला, आणि राज्यांतील स्त्रियांवर अत्याचार करूं लागला, तर त्याचा न्याय कोण करणार ? "

साहेबाला म्हाताऱ्याचे भाषण कांहींच समजले नाहीं. तो वृद्ध ब्राह्मण साहेबाला पुनः पुनः विचारूं लागला " देशाच्या राजानेंच प्रजेचें सर्वस्व हरण केले, तर त्याचा न्याय कोण करणार ? "

त्याचा हा प्रश्न ऐकून साहेब गोंधळांत पडला. तो म्हणाला " तूं काय म्हणतोस तें मला मुळींच समजत नाहीं तू आपली सर्व हकीगत मला सांग, म्हणजे तुझें बोलणें माझ्या नीट लक्ष्यांत येईल. "

वृद्ध ब्राह्मण रडत रडत म्हणाला " साहेब, माझ्या बेचाळीस पूर्वजांत कोणीं चोरी किंवा दरोडेगिरी केली नव्हती ! मी अत्यंत पापी म्हणूनच मी या चोरांच्या टोळींत शिरलो. साहेब, माझा सर्व वृत्तांत सांगताना माझें हृदय फाटून जातें ! "

साहेबाने गोड शब्दांनीं त्या वृद्ध ब्राम्हणाचे सांत्वन केलें. थोड्या वेळानें म्हातारा बोलूं लागला " साहेब, माझें नांव पंडित बलदेवप्रसाद. माझ्या वडील भावाचें नांव पंडित देवीप्रसाद. आम्ही दोघे बंधु सीतापुरच्या पंडित शंभुप्रसादाचे पुत्र. पंडित शंभुप्रसादाप्रमाणे या देशांत कोणीहि ज्योतिषी झाला नाहीं ! अयोध्येचा वजीर नबाब सादतअल्ली हद्दपार होऊन भटकत असतां माझ्या बापाशीं त्याची गांठ पडून आपल्या भविष्याची फलाफल गणना करण्यास त्याने माझ्या बापाला विनंति केली. माझ्या बापाने गणित करून सादतअल्लीला सांगितले कीं ' तुला निश्चयपूर्वक अयोध्येचे सिंहासन प्राप्त होईल ' माझ्या बापाच्या भविष्याप्रमाणें पुढें कांहीं वर्षांनीं सादतअल्ली खरोखरच अयोध्येच्या गादीवर बसला. गादी मिळाल्यावर कृतज्ञताबुद्धीनें सादतअल्लीनें माझ्या पित्याला लहानशी जहागीर देऊन तिच्यावरचा कर माफ केला; परंतु सादतअल्लीच्या मृत्युनंतर गाजीउद्दीन हैदराचे कारकिर्दींत सीतापुर परगण्याचा तालुकदार इब्राहिमखां यानें त्या कर माफ केलेल्या जहागिरीबद्दल आमच्याजवळ सात वर्षांच्या कराची मागणी केली. आम्ही गरीब ब्राम्हण ! सात वर्षांच्या कराची रकम आम्ही कुठून देणार ?

आमच्याकडून कराचा वसूल झाला नाहीं ही सबब दाखवून त्या दुराचारी नीच तालुकदारानें माझी स्त्री, भावजय, आणि माझ्या दोन मुली यांच्यावर घोर अत्याचार केला अरेरे! त्या घोर अत्याचाराचें स्मरण झालें म्हणजे हृदय फाटून जातें! बिचाऱ्या माझ्या त्या निरपराध मुली! त्यांनीं जन्मांत कोणाचा लवमात्र अन्याय केला नव्हता. हाय! मनुष्यानें मनुष्यावरच असा दारुण अत्याचार करावा काय? साहेब! या ठगांना तुम्ही प्राणदंडाचा हुकूम दिला आहे. ठग कधीं स्त्रीजातीची इज्जत नष्ट करित नाहींत! गळ्याला फास लावून प्राण घेतात! त्या नराधम इब्राहिमखानें जर माझ्या मुलींच्या गळ्याला फास लावून त्यांचे प्राण घेतले असत, तर त्याचें मला इतकें दुःख झालें नसतें! साहेब! आपण प्रत्यक्ष जाऊन पहा. शरयूच्या डोहांत माझ्या दोन्ही कन्यांच्या हाडांचे सांपळे आपल्या दृष्टीस पडतील! शेकडो ब्राम्हण स्त्रियांचा कलंक शरयूनें आपल्या पाटोंत घालून ठेविला आहे!"

त्या घोर प्रसंगाच्या स्मरणानें आणि बोलण्याच्या श्रमानें विगलित होऊन तो वृद्ध ब्राम्हण मूर्च्छित पडला आणि प्रेताप्रमाणें चेतनाविहीन झाला.

बुल्सन साहेब फार दयाळु होता. त्यानें आपल्या नोकरांनां म्हाताऱ्याच्या मस्तकावर पाणी ओतण्यास सांगितलें. सुमारें दोन घटकांनी मोठ्या प्रयत्नानें तो वृद्ध ब्राम्हण शुद्धीवर आला व हळुहळू आपली पुढील हकीगत सांगू लागला. ब्राम्हण म्हणाला " साहेब, आपणालाहि मुलेंबाळ असतील. अपत्यस्नेह म्हणजे काय असतो हें आपणाला चांगलें ठाऊक असेल. दुष्ट इब्राहिमखानें तो घोर अत्याचार केल्यानंतर, निर्दय होऊन मीं अपत्यस्नेह हृदयांतून पार काढून टाकला. मी आणि माझा भाऊ, आमच्या बायका आणि मुली यांनां म्हणालों ' देश पापाणीवांत बुडून गेला आहे, देशावर देवाचा कोप झाला आहे, जा, तुम्ही सर्वजणी शरयूच्या डोहाचा आश्रय घ्या. शरयु तुमच्या जीवनांचा कलंक धुवून काढील. तुमची लज्जा आणि अपमान शरयु निवारण करील! ' आमच्या उपदेशाप्रमाणें चौघांहि स्त्रियांनीं शरयु नदींत उड्या टाकून म्लेंच्छांच्या संस्पर्शस्वरूप पापाचें प्रायश्चित घेतलें. आम्हीं दोघांहि बंधूंनीं आमच्या एकंदर परिवाराला परमेश्वराच्या निरापद राज्यांत धाडून देऊन स्वतः संसारश्रमाचा त्याग करण्याचा दृढ संकल्प केला. माझा ज्येष्ठ बंधु अत्यंत धार्मिक असल्यामुळें साधुसंगाचा लाभ व्हावा म्हणून तो हिमाचलाकडे निघून गेला. मलाहि आपल्याबरोबर येण्यास त्यानें सांगितलें. परंतु मला काय दुर्बुद्धि सुचली कोण जाणे! इब्राहिमखांच्या कृतीचा सूड उगवि-

ण्याची वासना माझ्या हृदयांत प्रबल झाली. या वासनेचा परिहार मला कशानेंहि करतां येईना इब्राहिमखांवर सूड घेण्याच्या बुद्धीनें प्रेरित होऊन मी या ठगांच्या टोळींत शिरलों. ठगांच्या सहाय्यानें कधींतरी इब्राहिमवर सूड उगवीन, असा मीं मनांत निश्चय केला; परंतु प्रतिहिंसा आणि दुर्मति मनुष्याला केवळ दुःख आणि कष्ट यांच्याकडेच ओढून नेतात. मी या ठगलोकांच्या टोळींत शिरल्यावर सुमारें महिन्याभरानें या ठगांनीं दिल्ली जवळच्या नदीतीरावर एक पुरुष आणि दोन स्त्रिया अशा तिघांचे खून केले. एक पुरुष आणि ती स्त्री यांचीं शवें त्यांनीं नदींत फेंकून दिलीं. दुसऱ्या पुरुषाचें प्रेत तसेंच तीरावर पडून राहिलें होतें. सकाळीं तें प्रेत पाहून माझें हृदय विदीर्ण झालें. शव पाहतांच तें कोणाचें प्रेत हें मी ताबडतोब ओळखिलें. माझ्या आत्याचा दीर पंडित शांतप्रसाद याचें तें प्रेत होतें! पंडित शांतप्रसाद लाहोरास रहात असे. तो दिल्लीला कशासाठीं येत होता, तें मला समजेना. या ठगांनीं त्या तीनजणांचा खून करून त्यांच्याबरोबरच्या एका लहान मुलीला हस्तगत करून घेतली होती. ती मुलगी माझ्या दृष्टीस पडतांच ती शांतप्रसादाची कन्या असावी, असा चटकन माझा तर्क झाला. तेव्हांपासून मला मोठी चिंता लागून राहिली. त्या मुलीचें आतां काय करावें, तें मला सुचेना. माझ्याबरोबरच्या ठगांना माझ्या मनांतील विचाराचा यत्किंचित् सुगावा लागतांच ते अगोदर माझाच प्राण घेतील, हें मला ठाऊक होतें या प्रकारच्या विचारांत मी गुग आहे, तों एक साहेब आमच्या टोळीला धरण्यासाठीं आमच्या मागोमाग धावत येत आहे असें पाहून आम्हीं सर्वांनीं तेथून पोबारा केला. साहेबाच्या लोकांनीं या आमरी जमादारणीला मात्र पकडलें. तिच्याजवळ असलेल्या शांतप्रसादाच्या मुलीला साहेब कानपुरला घेऊन गेला. पुढें मी असें ऐकलें कीं, जयपालसिंह नांवाच्या एका व्यापाऱ्यानें त्या मुलीला साहेबापासून घेऊन आपल्या स्वतःच्या मुलीप्रमाणें तिचें प्रतिपालन केलें आणि एका ब्राम्हणाच्या मुलाशीं तिचा विवाह करून दिला. यानंतर मी ठगांना सोडून देऊन संन्याशाच्या वेषानें देशभर भ्रमण करूं लागलो. इब्राहिमखांचा सूड उगविण्याची माझी वासना अजून-पर्यंत लवमात्रहि कमी झाली नव्हती पण मीं नुकतेंच ऐकलें कीं, सीतापुरची राणी नारायणकुमारी हिच्या तरवारीला इब्राहिमखां बळी पडला. ही बातमी खरी किंवा खोटी हें पाहण्यासाठीं मी सीतापुरास चाललों होतों, इतक्यांत मी संन्याशाच्या वेषानें सीतापुरास जात आहें असें पाहून शिपायांनीं मला धरलें. मी ठग, दरोडे खोर

आहे या संशयानें मला त्यांनीं पकडून आणिलें ! साहेब, मी चोर नाहीं—मला फांशीं—"

इतकें बोलून तो वृद्ध बोलण्याच्या श्रमानें अत्यंत क्लांत होऊन पडला. त्याच्या तोंडांतून फेस येऊं लागला. थोड्याच वेळांत त्याला घरघर लागली आणि दोनतीन तासांनी म्हातारा संसाराच्या त्रासांतून कायमचा मुक्त झाला !

तो वृद्ध ब्राह्मण ही कथा सांगत असतां, भगवीं वस्त्रें परिधान केलेला, अत्यंत सुंदर असा एक तरुण पुरुष ही सर्व कथा अगदी लक्ष्यपूर्वक ऐकत होता हा युवक सन्याशाच्या वेषांत फिरत असतां ठग समजून यालाहि शिपायांनीं धरून मॅजिस्ट्रेटाकडे चौकशीसाठीं पाठवून दिले होते. चौकशीत मजिस्ट्रेटाला त्याच्याविरुद्ध कांहीं पुरावा असल्याचे दिसून आलें नाही त्याच्यावर एकाहि गुन्ह्याची शाबिती झाली नाहीं. पण मॅजिस्ट्रेटानें त्याला सोडून दिलें नाही. त्याला इतर ठगांविरुद्ध साक्षी करून सेशनकोर्टात पाठविले. त्या म्हाताऱ्याचा मृत्यु झाल्यानंतर सेशनजज्जाजवळ जाऊन हात जोडून हा तरुण म्हणाला "हुजूर ! दिल्लीजवळ माझा बाप पंडित शांतप्रसाद आणि आमची एक परिचारिका या दोघांचे या ठगांनीं खून केले. ठगांनीं केलेल्या आघातांनी मीहि अचेतन होऊन पडलो होतो मी मेलों असें समजून मला यांनीं नदींत फेकून दिले पण नदीत पाणी अधिक नव्हतें. यांनी फेकून दिल्यावर मी सुक्या वाळूत पडलो सकाळच्या सुमारास मी शुद्धीवर आल्यावर एका शिपायानें मला नदातून उठवून सीतापुरला पाठवून दिले. हल्लीं मी भगवीं वस्त्रें परिधान करून सन्याशाच्या वेषानें देशपर्यटन करित होतो शिपायांनीं मला उगीचच्या उगीच धरून इकडे पाठवून दिल. या ठगांशी माझा कधींहि संबंध नव्हता आणि यांपैकीं एकाहि ठगाला मी ओळखित नाहीं."

त्या तरुणाची हकीगत ऐकून सेशन जज्जानें त्याला सोडून दिलें. त्याला साक्ष द्यावी लागली नाहीं.

## प्रकरण १४ वें.

# संकटांवर संकटें !

यदि दुःखमिद प्राप्त काकुत्स्थ ! न सहिष्यसे ।
प्राकृतश्चल्पसत्वश्चेतरः कः साहिष्यति ॥
आश्वसिहि नरश्रेष्ठ ! प्राणिनः कस्य नापदः ।
सस्पृशंत्यग्निवद्राजन ! क्षणेन व्यपयान्ति च ॥

—अरण्यकाण्डम्—रामायणम् ।

मागील प्रकरणांत उल्लेख केलेल्या वृद्ध ब्राह्मणाच्या मृत्युनतर, त्या भगवी वस्त्रे परिधान केलेल्या तरुण पुरुषाने मोठ्या भक्तीने आणि श्रद्धेने त्या मृत ब्राम्हणाची अत्येष्टी क्रिया समाप्त करून तो कानपुरास निघाला. या तरुणाचे नांव पंडित अयोध्यानाथ. याच प्रकरणांत आम्ही वाचकांस पडित अयोध्यानाथाचा परिचय करून देत आहों.

अयोध्येच्या अतर्भुत सीतापुर जिल्ह्यांत पुष्कळ काश्मिरी ब्राम्हणांची घरे होतीं. हे सर्व ब्राम्हण वेद, उपनिषदे, वगैरे नाना प्रकारच्या शास्त्राध्ययनांत आपलें आयुष्य घालवित असत. प्ररतुत कथानकाचे वेळच्या अयोध्येतील अराजकतेमुळें हे ब्राम्हण किंवा त्यांची निवासस्थाने याचा मागमूसहि अयोध्येत राहिला नव्हता. अठराशें सत्तावन सालच्या बडानतर अयोध्येत आणि वायव्येकडील प्रांतांत शास्त्रज्ञ ब्राम्हण, किंवा जुन्या उच्च घराण्यांतील पडित, अथवा प्राचीन सभ्य कुलांतील गृहस्थ कोठेहि दिसून येत नसत. इसवी सन १७७२ त रोहिला युद्धाचे वेळीं इंग्रजांचे सैन्य अयोध्येंत शिरल्यानंतर अयोध्येंत प्राचीन उच्च कुलांतील लोकांची संख्या उत्तरोत्तर कमीकमीच होत गेली. ब्राम्हण पडितांचा वर्ग समूळ लुप्त होऊन त्यांच्या जागी दुकानदारवर्गांत एकदोन नवी उच्च घराणीं उदयास येऊ लागलीं. अयोध्येत आणि वायव्येकडील प्रांतांत अनेक शास्त्रव्यवसायी ब्राम्हण होते, हें, हल्लीच्या तेथल्या स्थितीवरून पाहतां कोणालाहि खरें वाटणार नाहीं. तिकडील लोकांनां ही गोष्ट सांगितली तर ते हसूंच लागतील. हल्लीं बहुतेक लोकांचा समज असा आहे कीं, अयोध्या आणि वायव्येकडील प्रांत यांत केवळ मजूर आणि व्यापारी यांचीच कायती वस्ती आहे; परंतु मुसलमानांच्या अमलांतहि या प्रदेशांत शास्त्रानुशीलनाचा एकदम समूळ लोप झालेला नव्हता.

या कथानकांत गोंवलेल्या काळाच्या पूर्वी तीसचाळीस वर्षे पंडित ज्वालाप्रसाद आणि पंडित शांतप्रसाद नांवाचे दोघे बंधु सीतापुरांत रहात असत. ज्वालाप्रसाद हा राजा दिग्विजयसिंहाच्या घरचा पंडित होता शांतप्रसाद हा आपला मामा शंभुप्रसाद याच्यापाशीं ज्योतिषशास्त्राचे अध्ययन करण्याकरितां सपरिवार लाहोरला गेला होता. लाहोरांत विद्वान् ज्योतिर्वेत्ता म्हणून त्याची विलक्षण ख्याती होऊन त्याच्यावर लक्ष्मीचीहि चांगली कृपा झाली होती. प्रस्तुत कथानकांतील काळाच्या पूर्वी पधरा सोळा वर्षे शांतप्रसादाची बायको, एक वर्ष वयाची एक मुलगी आणि तेरा वर्षांचा एक मुलगा अशी दोन अपत्यें मागें ठेवून परलोकवासी झाली. शांतप्रसादाला स्त्रीवियोग झाल्यानंतर, त्याचा ज्येष्ठबंधु पंडित ज्वालाप्रसाद हा मुलाला आणि मुलीला सीतापुराला पाठविण्याविषयीं आपल्या भावाला वारवार आग्रह करित असे. आपल्या भावाच्या पराकाष्ठेच्या आग्रहावरून, स्त्रीवियोगानतर तीन वर्षांनीं शांतप्रसाद आपलीं दोन अपत्ये आणि घरची एक वृद्ध परिचारिका यांसह सीतापुरास गावयास निघाला. शांतप्रसादाच्या मुलाचें नांव अयोध्यानाथ आणि मुलीचें नांव कैलासेश्वरी. या वेळीं अयोध्यानाथाच्या वयाला सोळा वर्षे पुरीं झालीं होतीं. सीतापुराला येतेवेळीं दिल्लीजवळ नदीच्या तीरीं शांतप्रसाद, त्याची दोन मुलें आणि परिचारिका यांच्यावर चोरांनीं हल्ला केला. त्या हल्ल्यांत शांतप्रसाद आणि ती दासी हीं दोघें ठार झालीं आणि अयोध्यानाथ अचेतन होऊन पडला. तिघेहि मेलीं असे समजून चोरांनीं त्यांना नदींत फेंकून दिले. दासीचें शव थेट नदीत पडलें; शांतप्रसादाचा देह तरिावरच राहिला आणि अयोध्यानाथाचे पाय पाण्यांत आणि मस्तक वाळूवर पडलें. शांतप्रसादाच्या चार वर्षांच्या मुलीला घेऊन चोर रात्रीच्या रात्रींच पळून गेले.

सकाळीं अयोध्यानाथ शुद्धीवर येऊन पाहतो, तों आपल्या पित्याचा मृतदेह आपल्या शेजारी पडला आहे. आपल्या परम प्रिय तातांचें शव मांडीवर घेऊन तो शोक करू लागला. एक प्रहरपर्यंत तो मुक्तकंठानें सारखा रडत होता. कर्मधर्मसयोगाने इतक्यांत एक शिपाई तेथे आला. अयोध्यानाथाची ती विपन्नावस्था पाहून त्याला त्याची दया आली अयोध्यानाथाला तो आपल्या घरीं घेऊन गेला. त्याच्या पित्याचें प्रेत त्या शिपायानें ठाण्यावर पाठविलें.

एकदोन दिवसानीं अयोध्यानाथाला त्या शिपायानें सितापुरास पाठविलें. सीतापुरास अयोध्यानाथ आपला चुलता ज्वालाप्रसाद याच्या घरीं राहूं लागला; परंतु

चुलत्याच्या समागमाचें सुखहि त्याला फारसें मिळालें नाहीं. कांहीं वर्षांनीं ज्वाला प्रसाद व त्याची स्त्री मरण पावली, आणि अयोध्यानाथ पुन: आश्रयहीन झाला.

ज्वालाप्रसादाच्या मृत्यूपूर्वी अयोध्यानाथानें त्याच्यापाशीं वेद, स्मृति, न्याय, दर्शन इत्यादि विविध शास्त्रांचें अध्ययन केलें होतें. अयोध्यानाथ चांगला शास्त्रज्ञ, सच्चरित्र, आणि अत्यंत रूपवान् होता. ज्वालाप्रसादाच्या मृत्युनंतर कांहीं वर्षांनीं सीतापुरचा प्रसिद्ध जमीनदार गंगाप्रसादशास्त्री याची तिसरी मुलगी मानकुमारी हिच्याशीं अयोध्यानाथाचा विवाह झाला. पितृमातृहीन अयोध्यानाथ लग्नानंतर आपल्या सासऱ्याच्याच घरीं राहूं लागला.

पितृवियोगानंतर अयोध्यानाथ दु:खांत उदासीनतेने काळ कंठित असे. त्याची कनिष्ठ भगिनी कैलासेश्वरी हिच्याबद्दल तो सर्वदा चिंता करित बसे. चोरांनीं कैलासेश्वरीला ठार मारलें, किंवा ते तिला घेऊन पळाले, याबद्दल त्याला निश्चयात्मक असें कांहींच कळले नव्हतें. बहिणीच्या या अनिश्चित परिणामामुळेंच अयोध्यानाथाचें हृदय असह्य शोकानलांत जळत होतें; परंतु त्याच्या विवाहानतर मानकुमारीचें सदाचरण, पतिनिष्ठा आणि निष्कपट प्रेम, त्याचप्रमाणें गंगाप्रसादशास्त्री आणि त्याच्या दुसऱ्या दोघी मुली यांचा त्याच्याबद्दल स्नेहपूर्ण व्यवहार, काशीनाथाची त्याच्याबद्दल आत्मनिरपेक्ष प्रीति आणि नि:स्वार्थ बंधुता या सर्वांमुळे मृतप्राय अयोध्यानाथाचा पुनर्जन्म झाला. त्याचें शोकदग्ध हृदय स्नेहवारि-वर्षावानें सुशांतिल झाले.

परंतु अयोध्यानाथाचे हें सुख चिरस्थाई झाले नाहीं. त्याच्या विवाहाला सातआठ वर्षें झाल्यानंतर एके दिवशीं रात्रीं चोरांच्या वेषानें सुमारें पन्नास लोक गंगाप्रसादाच्या वाड्यांत शिरले व त्यांनीं गंगाप्रसाद, काशीनाथ, अयोध्यानाथ आणि घरचे चाकरनोकर यांनां बांधून टाकले. त्यानंतर मानकुमारीचे हातपाय बांधून तिला घेऊन ते चालते झाले. सकाळीं गांवच्या लोकांनां हीं बातमी कळून ते गंगाप्रसादाच्या घरीं आले आणि त्यांनीं सर्वांनां मोकळें केलें; परंतु मानकुमारी-साठीं ते सर्व अत्यन्त शोकाकुल झाले. वृद्ध गंगाप्रसाद कन्येच्या शोकाने एकदम ज्ञानशून्य होऊन पडला, काशीनाथ आणि अयोध्यानाथ यांनीं थोडेंबहुत धैर्य धरून ते मानकुमारीच्या शोधाच्या तजविजीस लागले. गंगाप्रसादाला राणी नारायण कुमारीकडे ठेवून ते दोघे मानकुमारीचा शोध लावण्याकरितां बाहेर पडले. सतत सहा महिनेपर्यन्त निरनिराळ्या ठिकाणच्या चोरांच्या राहण्याच्या जागीं त्यांनीं शोध

केला; परंतु मानकुमारीला कोणीं कोठें पळवून नेलें, याचा त्यांनां यत्किंचित्‌हि शोध लागला नाहीं. बराच शोध केल्यानंतर राजा दर्शनसिंहानें काढून टाकलेल्या एका नोकराकडून त्यांनां अशी बातमी लागली कीं, मानकुमारीला दर्शनसिंहाच्या लोकांनी पळवून नेले आहे; दर्शनसिंह नृत्यगायन शिकविण्यासाठीं तिला पंजाबांत पाठविणार आहे; आणि नृत्यगीत शिकवून ती तयार झाल्यावर तिला तो नबाबाच्या झनान्यांत पाठविणार आहे.

ही बातमी ऐकून काशीनाथ आणि अयोध्यानाथ यांनां अत्यन्त दु:ख झालें. परतु ते तसेच गिळून ते लाहोराकडे निघून गेले. लाहोर, मुलतान इत्यादि पुष्कळ ठिकाणीं त्यांनीं मानकुमारीचा शोध केला, परतु तिचा पत्ता लागला नाहीं.

याप्रकारें मानकुमारीच्या शोधासबधीं काशीनाथाची पूर्ण निराशा झाली. भगिनीच्या शोकाने त्याला जवळ जवळ वेड लागले. पजाबांतून परत फिरतांना तो अयोध्यानाथाला ह्मणाला "मला वाटते, दर्शनसिहाच्या लोकांनी मानकुमारीला पजाबांतून लखनौला नेली असावी; इतकेंच नाहीं, तर त्या पापी नीच दर्शनसिहाने आतापर्यन्त तिला नबाबाच्या अंत:पुरांत खास पाठविले असेल ! हाय ! आमच्या पवित्र कुलाला कोण हा भयकर कलक! मानकुमारी मेली असती, तर तो तिचा शोक मीं कसा तरी सहन केला असता; पण माझी भगिनी यवनांच्या अत:पुरांत गेली, हें मनांत येतांच माझे हृदय शतधा विदीर्ण होते ! खादिरांगाराच्या शय्येवर लोळल्या-प्रमाणे माझ्या शरीराला अनत वेदना होतात. आतां प्राण धारण करण्याची मला इच्छा नाहीं आत्महत्या करून माझ्या हृदयांतील दारुण यातना मी शांत करीन. मृत्युशिवाय मला आतां दुसरा मित्र नाहीं ! "

पत्नीचा शोध कोठेहि लागला नाही, यामुळे अयोध्यानाथहि अपार दु:खसागरांत बुडून गेला होता; परंतु तो अत्यंत धीर प्रकृतीचा आणि शांतस्वभावाचा असल्या-मुळें काशीनाथाचें सांत्वन करूं लागला. तो म्हणाला " ही काय तुमची आत्महत्या करण्याची वेळ ? या संसारांत कोणावर सकटें येत नाहीत ? प्राणिमात्राला संकटें आहेच! पण शांतपणानें सकटांशीं टक्कर देण्यांतच खरे धैर्य आहे. तुम्ही आत्महत्या केलीत तर तुमच्या वृद्ध पित्याची काय दशा होईल ? अगोदरच ते मृतप्राय झाले आहेत. त्यांतून तुम्हीं आत्महत्या केल्यावर पुत्रशोकानें ते प्राणत्याग करतील, यांत संशय नाहीं. पितृहत्येचें पातक मस्तकावर घ्यायला तुम्ही तयार आहां काय ? "

काशीनाथ ह्मणाला " आतां धीर तरी कोठवर धरूं ? धैर्यावलंबन करण्याचें माझ्या अंगी सामर्थ्य नाहीं. त्या नीचांनीं मानकुमारीला पळवून नेल्याला दीड वर्ष झालें मानकुमारीनें अद्यूनपर्यंत आत्महत्या केली नसेल तर ती यावेळीं नबाबाच्या झनान्यांतच खास असली पाहिजे; परतु ही दारुण वार्ता माझ्या कानीं येण्याच्या अगोदरच मी आत्महत्या करून ती अमंगळ वार्ता ऐकण्याचें टाळीन. "

" आत्महत्या हें महत्पाप आहे. या ससारांत जीं जी पातकें आहेत, त्यांमध्ये आत्महत्येसारखें मोठें पाप कोणतेंच नाहीं. आत्महत्येच्या भयंकर पातकाला पितृहत्येच्या दारूण पापाची भर तुह्मी कां घालता ? मनांतली ही भयकर चिंता तुह्मी टाकून द्या. "

आत्महत्या केली असतां पितृहत्याहि होणार, या विचारानें काशीनाथ कांही वेळ स्तंभित होऊन गेला. पित्याला कष्ट होतील, या कल्पनेनें त्याची मावळलेली सदसद्विचारशक्ति जागृत झाली. परतु कांही वेळानें त्याचें मन पूर्वस्थितीला आलें. तो ह्मणाला " या ससारांत पापपुण्याचा विचार करतो आहे कोण ? "

" परमेश्वर ! "

" तर मग मी आत्महत्या करून त्याच परमेश्वरापाशीं जाईन! तो निद्रित आहे काय?हा भीषण अत्याचार त्याच्या दृष्टीस पडला नाहीं काय ! अयोध्येंतील शेकडो निरपराध कुलस्त्रियांचा आर्तनाद आणि शोकाच्या किंकाळया त्याच्या कानांवर जात नाहींत काय ? आत्महत्या करून मी त्याच्याजवळ जाणार. माझी फिर्याद मीच स्वत: त्याच्याजवळ जाऊन करणार. "

अयोध्यानाथ निरनिराळ्या शास्त्रांतील वचनें आणि कथा सांगून काशीनाथाचे मन वळवूं लागला. तो ह्मणाला"आह्मी सगळेजण आपापल्या पापांची फळें भोगतों आहों. परमेश्वरावर वृथा दोषारोप कां करावा ? "

काशीनाथ विशेषसा शास्त्रज्ञ नव्हता. तो अत्यंत सरल हृदयी होता. हृदयांतील प्रबल आवेग आणि मनोविकार यांचा नेहमीं त्याच्यावर पगडा बसत असे. वेळोवेळीं निरनिराळ्या विषयानुरोधानें तो हिताहितज्ञानशून्य बनत असे. त्याने अयोध्यानाथाला विचारलें " आतां तुह्मी काय करणार ? "

अयोध्यानाथ ह्मणाला" मानकुमारी माझी प्राणप्रतिमा-माझें जीवनसर्वस्व आहे. जितके दिवस या देहांत प्राण असेल तोंपर्यंत मी तिचा शोध करित राहीन. तिळमात्रहि विसांवा घेणार नाहीं! तिनें आत्महत्या केली अशी जेव्हां माझी खात्री

होईल, तेव्हां मी या संसाराचा त्याग करीन आणि अरण्यांत जाऊन ईश्वरचिंतनांत सर्व आयुष्य खर्च करीन. ''

अशा प्रकारच्या गोष्टी बोलत बोलत ते उभयतां गंगानदीच्या जवळून जाणाऱ्या रस्त्याने दक्षिणेकडे चालले होते. हळुहळू ते नदीतीरावर येऊन पोहोचले ते स्थान नदीच्या प्रवाहापासून सुमारे वीस हात उचीवर होतें. तेथून नदींत कोणी पडले तर त्याला पुन: तीरावर येणे शक्य नव्हते. या स्थळी पोहोचताच काशीनाथाला पुन: ती भ्रांतावस्था प्राप्त झाली. त्याचवेळी आत्महत्येची अत्यंत प्रबल इच्छा त्याच्या मनांत झटकन् उत्पन्न झाली. "अयोध्यानाथ! हा मी चाललों! पुन: कधीं भेटणार नाहीं!" असे म्हणून काशीनाथाने झपकन् नदीत उडी टाकली व क्षणार्धांत तो दिसेनासा झाला

किनाऱ्यावरून जलप्रवाहाकडे जावयाला रस्ता नव्हता. त्या प्रसंगीं काय करावें तें अयोध्यानाथाला कांहीं सुचेना. हतबुद्ध होऊन तो प्रवाहाकडे पहात तेथेंच उभा राहिला. नदीतीरावर कोणी चिटपांखरूहि नव्हते. जवळपास मनुष्याचा शब्दहि ऐकूं येत नव्हता. अयोध्यानाथ किंकर्तव्यता मूढ होऊन खालीं बसला. काय करावे! प्रत्यक्ष आपल्या डोळयांदेखत आपला मेहुणा नदींत उडी घेतो आणि त्याला वर काढावयाला आपला काहीं इलाज चालत नाहीं ! थोड्या वेळानें काशीनाथाचे शरीर पाण्यावर तरंगून येईल असे त्याला वाटले; परंतु एक प्रहरपर्यंत त्याचे शरीर वर आलें नाहीं. अयोध्यानाथाची सर्व आशा खुटली. काशीनाथ गंगेत बुडून मेला, अशी त्याची खात्री झाली. अयोध्यानाथावर सकटांचा वर्षाव होऊ लागला !

काशीनाथाच्या शोकाने त्याचें हृदय दग्ध होऊन गेले. त्याची निस्सीम परोपकार वृत्ति आणि वैराग्य यांचें स्मरण होऊन अयोध्यानाथ सारखे अश्रुविसर्जन करू लागला; परंतु तो विलक्षण धीर प्रकृतीचा मनुष्य होता. सकटप्रसगीं त्याचें हृदय डळमळत नसे लहानपणापासून शोक दु:खाचे प्रसगीं धैर्यावलबन करावयाला त्याने आपल्या मनाला चांगलें शिक्षण दिलें होतें. अयोध्यानाथ चांगला शास्त्रज्ञ, धर्मशील आणि कर्तव्यपरायण तरुण होता. याहि प्रसंगीं त्याचें मन डगमगले नाहीं. काशीनाथाच्या मृत्यूची वार्ता आपले वृद्ध श्वशुर आणि त्यांच्या दोन विधवा मुली यांच्या कानांवर कशी घालावी, त्यांचे सांत्वन कसें करावें, याबद्दल अयोध्यानाथाच्या मनांत अनेक विचारतरंग येऊं लागले. बराच वेळ विचार केल्यानंतर प्रथम आपणाला सीतापुरलाच गेलें पाहिजे, असें त्यानें ठरविलें. तेथें जाऊन नारायणकुमारीच्या

सल्ला घेऊन नंतर मानकुमारीच्या शोधाला लखनौला जावयाचें, असा त्यानें निश्चय केला.

काशीनाथाच्या आत्महत्येनंतर सातव्या दिवशीं अयोध्यानाथ सीतापुरला पोहोंचला. गेल्याबरोबर काशीनाथाच्या मृत्यूचा सर्व वृत्तांत त्याने नारायणकुमारी आणि चांदकुमारी यांनां सांगितला. आपल्या बंधूचें निधनवृत्त ऐकून चांदकुमारीच्या शोकाला पारावार राहिला नाहीं. तिचें धैर्य गळून गेलें. परंतु अयोध्यानाथाप्रमाणें नारायणकुमारीहि धीरवृत्तीची होती. ती चांदकुमारीचे सांत्वन करूं लागली. काशीनाथाच्या आत्महत्येची बातमी वृद्ध आणि आसन्नमरण गंगाप्रसादाच्या कानांवर जाऊ द्यावयाची नाहीं, असा त्या त्रिवर्गाचा निश्चय झाला.

मानकुमारीच्या शोधासंबंधीं पुढे काय करावे, याबद्दल नारायणकुमारीची संमती घेऊन अयोध्यानाथ लखनौला गेला. तीनचार दिवसांनीं तो लखनौला पोहोंचला. तेथे पोहोंचतांच तो मानकुमारीचा शोध अगदीं बारकाईने करूं लागला.

कधीं संन्याशाच्या वेषानें, कधीं भविष्य पाहणाऱ्या कुडबुड्या जोशाच्या वेषाने तर कधीं फेरीवाल्या व्यापाऱ्याच्या वेषानें अयोध्यानाथ लखनौत आपल्या पत्नीचा ठिकठिकाणीं शोध करूं लागला. लखनौला येतांना त्याने सीतापुराहून बरोबर पुष्कळ द्रव्य आणिलें होते. हळुहळू त्याने बादशहाच्या महालांतील खोजांशीं संधान बांधिले. द्रव्याच्या योगाने या जगांत काय वाटेल ते होऊं शकते! बादशहाच्या महालांतील खोजांपैकीं खुरसद अल्ली नांवाच्या खोजाशी अयोध्यानाथाचा विशेष परिचय झाला होता. एके दिवशीं खुरसदअल्लीच्या हातांत पन्नास रुपये देऊन अयोध्यानाथानें त्याला विचारले " भाई, नबाबाच्या महालांत जी एक ठेगणी ठुसकं अशी कंचनी नवीनच आली आहे, तिच्याशी नबाबाने निका लावला का?"

खुरसदअल्ली ह्मणाला " कुदसिया सुलतान बेगम मेल्यानंतर कांही दिवसांनं नबाबांनीं तिच्याशीं निका लावला?"

" कुदसिया सुलतान बेगम ही कोण!"

खुरसदअल्लीनें आश्चर्यचकित होऊन विचारिले " तूं रहाणार कुठचा? तूं कधं कुदसिया बेगमचें नांव ऐकले नाहींस?"

" नाहीं, मीं ह्या बेगमेचें नांव ऐकलें नाही."

खुरसदअल्ली अयोध्यानाथाला पुढील हकीगत सांगू लागला. तो ह्मणाला "मुल्ले जामानियांनीं प्रथम दिल्लीच्या बादशहाच्या मुलीशीं विवाह केला. तिचें नांव ताजमहाल

बेगम त्यानंतर त्यांनीं कुदसिया सुलतान बेगमेशीं निका लावला. कुदसिया बेगमेवर मुलके जामानियांची फार प्रीति होती. त्यांची स्वारी सदासर्वदा कुदसिया सुलतान बेगमेच्याच महालांत पडलेली असे. मुलके जामानिया बडे लोक! कांहीं दिवसांनीं त्यांनीं पुन: एका सुंदरीशीं निका लावला. तिचे नांव नूरमहाल. त्यानंतर नबाबांनीं अमीर उद्–दौल्याच्या बहिणीशीं लग्न केलें ही बेगम पूर्वी नर्तकी कचनी होती. नूरमहाल, अफझलमहाल, आयेसमहाल, मलिका झमानी यांपैकीं कुणालाहि बादशहाचें मन वश करून घेता आले नाहीं. या लग्नानतर दहापधरा दिवसांतच मुलके जामानिया फिरून कुदसिया बेगमेच्याच महालांत जाऊं लागले. कुदसिया बेगम मरून तीन महिने झाले. कुदसिया बेगमेकरितां नबाबांनां फार दु.ख झाले आणि ह्मणूनच कुदसिया बेगम मेल्यानंतर दोन महिन्यांनंतर खास महालांतील या नवीन पांखराशीं त्यांनीं निका लावला."

" ही नवीन स्त्री हिंदु आहे काय ? "

" हिंदु कीं मुसलमान, कुणाला ठाऊक ! "

" या नवीन स्त्रीला कोणत्या देशांतून आणली बरें ? "

" तिला राजा दर्शनसिंहाने आणली. त्यानें कोणत्या देशांतून तिला आणले कुणाला माहीत ? "

खुरसदअल्लीनें सांगितलेली हकीकत ऐकून अयोध्यानाथ मनांत समजून चुकला कीं, ही नवी बेगम मानकुमारी खास नव्हे. मानकुमारी महा साध्वी. ती कधींहि स्वधर्मत्याग करून नबाबाची बेगम होऊन रहाणार नाही. असा प्रसंग तिच्यावर आला तर ती आत्महत्या करून आपली सुटका करून घेईल, अशी अयोध्यानाथाची खात्री होती.

बादशहाच्या झनान्यांत मानकुमारी नाहीं असें समजल्यावर मानकुमारीने आत्महत्या केली, या गोष्टीबद्दल अयोध्यानाथाची पक्की खात्री झाली. तो लागलीच लखनौहून निघाला. अगोदर सीतापुरास जाऊन नारायणकुमारी, चांदकुमारी व आपले वृद्ध श्वशुर यांनां बरोबर घेऊन सीतापुराहून काशीला निघून जाऊ, असा अयोध्यानाथानें मनांत विचार केला होता. मनुष्याला जितके प्रयत्न करतां येणें शक्य आहे, तितके प्रयत्न आपण मानकुमारीचा शोध लावण्यासाठीं केले आहेत, आतां दैवावर विश्वास ठेवण्यापलीकडे दुसरा कांहीं उपाय राहिला नाहीं, असें त्याला वाटलें.

अशा प्रकारें विचार करित करित तो सीतापुराला जावयाला निघाला. परंतु सीतापुरास पोंचण्यापूर्वीच त्याला अशी बातमी लागली कीं, राणी नारायणकुमारी सीतापुर सोडून नेपाळाकडे पळून गेली. बिचाऱ्या हतभाग्य अयोध्यानाथावर हे आणखी एक नवेंच संकट आलें ! आतां पुढें काय करावें ! बराच वेळ विचार करून त्यानें ठरविलें कीं, आतां सर्व हवाला दैवावरच ठेविला पाहिजे. त्याशिवाय गत्यन्तर नाहीं. आपण जे जे प्रयत्न केले, ते ते सर्व व्यर्थ गेले. असा विचार करून संन्याशाच्या वेषानें तो काशीला निघाला. तरुण वयांत सन्याशाच्या वेषानें अयोध्यानाथाला देशभ्रमण करतांना पाहून ठगांनां पकडणाऱ्या शिपायांनीं ह्याहि ठगच असेल असे समजून त्याला धरून गोरखपुरला चौकशीला पाठविलें. गोरखपुरला घडलेली हकीगत मागील प्रकरणांत वाचकांनां कळलीच आहे.

## प्रकारण १५ वें.

# दैवबळ.

आदित्य ! भो ! लोककृताकृतज्ञ ! लोकस्य सत्यानृतकर्मसाक्षिन् !
मम प्रिया सा क्व गता हृता वा शंसस्व मे शोकहतस्य सर्वम् ॥
लोकेषु सर्वेषु न चास्ति किंचित् यत्ते न नित्यं विदितं भवेत्तत् ॥
शंसस्व वायो ! कुलपालिनीं तां मृता हृता वा पथि वर्तते वा ॥

—अरण्यकाण्डम्—रामायणम् ।

श्रावण महिन्याचे दिवस. सूर्याचा प्रखर ताप पडला होता. प्रहर, सवा प्रहर दिवस होतांच रस्त्यांतून कोणालाहि हिंडतांफिरतां येत नव्हते. आकाशांत मेघांचे लवमात्र चिन्ह दिसत नव्हतें श्रावण महिन्यांत सूर्य वारंवार मेघावृत होत असल्यामुळें दिवसास लोकांनां रस्त्यांतून हिंडण्याफिरण्यास फारसे कठीण पडत नाहीं; परंतु आज तीनचार दिवस झाले, पर्जन्याचें अल्पसुद्धां चिन्ह दिसत नव्हतें. याप्रमाणें सूर्यतापाने रस्ते दिवसा बंद होते, व रात्रीं प्रवास करणे चोरांच्या भयाने धोक्याचे असल्यामुळें रात्रीच्या वेळीहि कोणी रस्त्यांतून फिरकत नव्हते. चोहोंकडे चोरांचा आणि दरोडेखोरांचा भयंकर अत्याचार चालला होता; परंतु चोरांचा बंदोबस्त करण्यासाठी नेमलेल्या सरकारी अधिकाऱ्यांचा जुलुम तर खुद्द चोरांच्या अत्याचारापेक्षांहि भयंकर होता ! चोरांच्या आणि दरोडेखोरांच्या बंदोबस्ताकरितां पुष्कळ शिपायांची योजना झाली होती. रात्रीं रस्त्यांतून लोकांनां जातायेतांना, बघून हे शिपाई त्यांनां चोर म्हणून बेलाशक धरून नेत आणि चौकशीसाठीं मॅजिस्ट्रेटकडे पाठवून देत. पुष्कळांनां अपराधावांचून शिक्षाहि होत असे ! कांहीं लोक दोनदोन तीनतीन महिने कारागृहवास भोगून पुढें चौकशींत निरपराधी ठरून सुटत असत. असा चाहींकडे गोंधळ माजून राहिला होता !

कानपुरापासून थोड्याच अंतरावर रस्त्याच्या बाजूस एका विशाळ अशोक वृक्षाच्या शीतळ छायेला एक प्रवासी विश्रांति घेत बसला होता. हा प्रवासी तरुण होता, याच्या अंगावर भगवीं वस्त्रें होतीं. तो अत्यंत रूपवान् होता. तरीहि त्याच्या मुखमंडलावर शोकाची आणि विषण्णतेची छाया पडली होती; परंतु त्याच्या मुखावर स्नेह आणि दयेचा भाव स्पष्टपणें दृग्गोचर होत होता.

कांहीं तरुण स्त्रिया गंगास्नान करून पाण्याच्या कळशा कडेवर घेऊन ओल्या वस्त्रांनिशींच त्या अशोकवृक्षाच्या बाजूच्या रस्त्यानें आपापल्या घरीं चालल्या होत्या. या तरुण संन्याशाकडे त्यांची दृष्टि गेली. त्याला पाहून एकजण दुसरीला ह्मणाली " अहाहा ! किती सुंदर हा तरुण ! अन् एवढया लहान वयांत संन्यासी झाला ! "

दुसरी ह्मणते " मला वाटत, याला आईबाप कुणी नाहीत ! "

तिसरी ह्मणाली " बाप असेल कदाचित्—पण आईमात्र खास नाहीं ! "

चवथी हंसत हंसत ह्मणते " मला वाटतं, याची आई मेल्यावर याच्या बापान दुसरं लग्न केलं असावं ! "

यावर पांचवी ह्मणाली "छे ग,तसं नसेल ! मला वाटतं, बादशहाच्या लोकांनी याचं घरदार लुटलं असेल अन् वैतागान यान सन्यास घेतला असेल. अयोध्येचे कितीतरी लोक घरदार सोडून संन्यासी होताहेत ! "

त्या तरूण संन्याशासंबधीं अशा प्रकारचे तर्कवितर्क करित करित त्या तरुणी आपापल्या घरीं निघून गेल्या.

आमच्या तरुण संन्याशाला या स्थळीं येऊन फार वेळ झाला नव्हता. सध्याकाळच्या सुमारास सूर्याचा प्रखर ताप कमी झाल्यावर शहरांत जावे असा त्याने विचार केला होता. त्या अशोकवृक्षाच्या घनदाट शीतळ छायेनें त्या पथिकाचे वाटेचे श्रम हळुहळू दूर झाले. थोड्याच वेळांत तो ताजातवाना झाला. एकाग्र चित्तानें विचार करित तो आपल्याशीच बोलूं लागला " मनुष्याचे यत्न, प्रयत्न, श्रम सर्व व्यर्थ आहेत ! त्यांनीं कांहींसुद्धां होत नाही! हा दुस्तर भवसागर पार व्हावयाला दैवबलाशिवाय अन्य उपाय नाही ! दैवबलानें असंभव संभवनीय होतें, दुष्कर कार्य सुकर होते आणि असाध्य सहज साध्य होतें ! गेलीं बारा वर्षे कैलासेश्वरीच्या शोकानें माझे हृदय दग्ध होत होते. या जन्मांत तिची माझी भेट होईल अशी मला आशा नव्हती; परंतु भगवंताची करणी अचिंतनीय आहे ! त्याचा महिमा खरोखर अगाध आहे ! कैलासेश्वरी अझून जीवंत आहे आणि ती एका दयाळु गृहस्थाच्या हातीं लागली आहे. ईश्वराची इच्छा असेल तर आजच तिची भेट होईल. दयाघन परमेश्वरा ! केवळ तुझ्याच इच्छेने सर्व कांहीं घडून येतें. दैवबळ ह्मणजे दुसरें कांहीं नाहीं–केवळ तुझें कौशल्य–तुझे खेळ! माझ्या प्राणेश्वरीला दैव-योगानें जर एखाद्या सज्जनाचा आश्रय मिळाला असेल, तर तुझ्याच कृपेनें एक

दिवस तिचीहि भेट होईल! हाय ! पण माझ्या अदर्शनाने, बंधुभगिनींच्या वियोगानें तिला आजपर्यंत किती कष्ट भोगावे लागले असतील ! ''

अशा रीतीनें विचार करित करित सूर्याकडे पाहून तो तरुण हात जोडून ह्मणाला " हे सर्वसाक्षी सूर्यनारायणा ! या पृथ्वीवरील सर्व प्रदेश तुझ्या दृष्टीला पडतात. मनुष्यांचीं सर्व कर्में तुझ्याच दृष्टीखाली घडतात. माझी प्राणप्रतिमा कुठं आहे? माझी हृदयेश्वरी कुठें आहे ते कृपा करून मला सांग. हे वायो ! तूझी गति सर्वत्र आहे. तुला ठाऊक नाहीं असे कांहींहि नाही.मी कोणत्या देशांत गेलो असतां मला प्रियेचा लाभ होईल, हें सांग बरे ! ''

त्या अशोक वृक्षाला संबोधून तो तरुण ह्मणाला " बा अशोका! पथिकांचे श्रम तूं दूर करतोस, सर्व जगताचा शोक तूं दूर करतोस, ह्मणून तुला अशोक ह्मणतात. माझ्या हृदयांतील प्रबल दुःख आणि शोक तू नाहींसा कर! ''

या तरुणानें गोरखपुर सोडल्याला आज पांचसहा दिवस झाले. इतक्या दिवसांत त्याला सामान्य फलमूलांशिवाय दुसरें कांहींहि खावयास मिळालें नाहीं. क्षुधेनें आणि तृषेनें त्याचे प्राण कासावीस होऊं लागले. येतांना रस्त्यांत त्याने कांहीं फळे मुळे जमवून आणिलीं होतीं. क्षुधानिवारणार्थ तीं तो खाऊं लागला. फलाहार संपवून दुपारचें ऊन अमळ कमी झाल्यावर तो कानपुर शहराकडे जाऊं लागला. कांनपुरांत पोहोंचतांच तो तडक बाजारांत गेला. या तरुणाची ओळख वाचकांस पूर्वींच झाली आहे—ह्याचे नांव पडित अयोध्यानाथ !

कानपुरच्या बाजारांत मेघराजसिंह, लेकराज पांडे, दिग्गज शुक्ल, बद्रीलाल त्रवाडी, लाला हनुमान प्रसाद, दुर्जनसिंह, आणि मान्नालाल पांडे, यांच्या पेढया मुख्य मुख्य होत्या. लेकराज पांड्याच्या पेढीजवळ पुष्कळ लोक जमले आहेत असें पाहून अयोध्यानाथ तिकडेच प्रथम गेला. तेथें जमलेल्या लोकांपैकीं एकजणाला त्यानें विचारलें " भाई, जयपालसिंहाची पेढी कुठें आहे, आपणाला ठाऊक आहे ?''

त्यानें उत्तर दिलें " जयपालसिंह कोण? मला नाहीं ठाऊक बुवा ! ''

इतक्यांत दुसरा एकजण ह्मणाला "होय होय, पूर्वी जयपालसिंहाची पेढी इथे होती, पण बरेच दिवस झाले, तो इथून व्यापारधंदा बंद करून कुठे दुसरीकडे गेला. ''

अयोध्यानाथानें विचारिलें " तो कुठे गेला, आपल्याला ठाऊक आहे? ''

"नाहीं. तो कुठें गेला तें माहीत नाहीं, '' असें ह्मणून तो इसम आपल्या कामाला निघून गेला.

तेथून जवळच बद्रीलाल त्रवाड्याची पेढी होती. तेथें जाऊन अयोध्यानाथानें जयपालसिंहाविषयीं दुसऱ्या एकजणाला माहिती विचारिली. तेथें तीनचार जण बसले होते. त्यांतून एकजण ह्मणाला "जयपालसिंह पन्नास वर्षांपूर्वींच इथून निघून गेला."

दुसरा ह्मणाला "छे छे! पन्नास वर्षे कुठून होतील? त्याला जाऊन वीस एक वर्षे झाली असतील–अधिक नाहीं!"

तिसरा ह्मणाला 'हां वीस वर्षे ठेवली आहेत! अरे साठ वर्षे झाली असतील साठ! माझें लग्न झाल्यानंतर दुसऱ्याच वर्षी जयपालसिंह इथून निघून गेला."

या तिसऱ्या इसमाचे वय वीसबावीस वर्षांहून अधिक नव्हते. त्याचें लग्न होऊन फार तर पांचसहा वर्षे झालीं असतील अयोध्यानाथ ताबडतोब समजला कीं, हे लोक टवाळ आहेत यांनां माहिती विचारण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तेथून जवळच एका पेढीत एक रुभ्य गृहस्थ बसलेला अयोध्यानाथाच्या दृष्टीस पडला. त्याच्याजवळ जाऊन अयोध्यानाथानें विचारलें "महाराज, जयपालसिंहाची पेढी कुठें आहे, आपणाला ठाऊक आहे?"

त्या गृहस्थानें उत्तर दिलें "जयपालसिंहाची पेढी हल्लीं इथें नाही. कांही वर्षांपूर्वी तो इथून निघून गेला. कदाचित् तो मेलाहि असेल, असे मला वाटते. इथून दक्षिणेकडे गेलें, ह्मणजे काहीं अतरावर जयपालसिंहाची बाग दिसते. तेथेंच त्याची मंडळी असते. तिकडे जाऊन त्यांनां तुम्ही माहिती विचारा."

अयोध्यानाथाला ही माहिती मिळतांच तो दक्षिणेकडे जाऊं लागला. थोडासा दूर गेल्यावर त्याला समोरच एक बाग दिसली. बागेच्या बाहेर त्याला कोणी मनुष्य न दिसल्यामुळें तो तसाच बागेत शिरला. बागेत एक लहानसे दुमजली घर होते. हळुहळू अयोध्यानाथ त्या घराच्या दरवाजापाशीं पोंचला. घराच्या दरवाजाशींच एक स्त्री बागेंतील माळयाशी रडत रडत कांहीं बोलत होती. अयोध्यानाथ लक्ष्यपूर्वक तिचें बोलणें ऐकूं लागला.

ती स्त्री रडत रडत ह्मणत होती "दुष्ट, नष्ट चांडाळीण अवदसा मेली! दररोज मेली गंगास्नान करते, जप करते, अन् करणी पहा कशी राक्षीसणीची! मुलीचे पालनपोषण करून वाढवलीन् ती याचसाठीं वाटतं! बादशहाच्या रगमहालांत पाठवायला तिला घेऊन गेली! डाकीण मेली!"

त्या स्त्रीचे हें भाषण अयोध्यानाथानें सर्व ऐकलें शेवटचे वाक्य ऐकून त्याचें हृदय कांपूं लागलें. त्याच्या मनांत अनेक विचार येऊं लागले. ही मुलगी कोण?

बादशहाच्या रंगमहालांत तिला पाठवावयाला कोण घेऊन गेली ? ही स्त्री कोण ? ती 'अवदसा' कोण? इत्यादि अनेक प्रश्न त्याच्या मनांत उभे राहिले. परंतु मनांतले विचार गुप्त राखून त्या स्त्रीजवळ जाऊन त्यानें विचारलें "जयपालसिंहाची ही बाग काय ? जयपालसिंह येथे आहेत का ? "

ती स्त्री खालीं मान घालून सारखी रडत होती. अयोध्यानाथाचा तो प्रश्न ऐकून विरक्तभावानें ती ह्मणाली "होय, जयपालसिंहांचीच ही बाग. ते इथं असते, तर माझ्या सीतेला लखनौला पाठवायला कुणाला धीर झाला असता ! " असे म्हणून ती मोठ्यानें रडूं लागली.

त्या स्त्रीचे हें भाषण ऐकून व तिची चर्या वगैरे पाहून अयोध्यानाथाला अधिकाधिक शंका येऊ लागल्या. त्यानें विचारलें "जयपालसिंह मृत्यु पावले काय ?"

ती स्त्री कांहीं उत्तर देणार, तो माळी मध्येच ह्मणाला "नाहीं, ते अद्यापि जिवंत आहेत. आजारी पडल्यामुळे ते इथून गेले आहेत. आपण इथे कुणाला शोधित आहां ? "

अयोध्यानाथानें विचारले "जयपालसिहाने जी एक मुलगी बाळगिली होती, ती हल्लीं कुठे आहे ? "

अयोध्यानाथाचा हा प्रश्न ऐकून ती स्त्री त्याच्याकडे बारकाईनें पाहूं लागली. अझूनपर्यन्त तिनें अयोध्यानाथाकडे एकदासुद्धां पाहिलें नव्हतें. अयोध्यानाथाचीं भगवीं वस्त्रें पाहून तिनें विचारलें "महाराज, आपणाला भविष्य बघतां येतं का ? त्या दिवशीं इथं एक जोशी आला होता, त्यानं माझी सीता खास परत येईल— त्या अवदसेजवळ ती रहायची नाहीं, असं मला सांगितलं. त्याला मीं चार पैसे दिले. आपणाला मी दोन आणे देत्ये--

तिचे भाषण ऐकतांच अयोध्यानाथानें एक दीर्घ निश्वास टाकला. आपल्या सर्व आशा खास विफल झाल्या, असेंच त्याला वाटलें. आपली भगिनी कैलासेश्वरी हिला कोणींतरी लखनौला नेऊन ठेवली असावी, असा त्यानें तर्क केला. संकटकाळीं अयोध्यानाथाला दुप्पट धैर्य चढत असे. मनांतला भाव गुप्त ठेवून त्यानें विचारलें " तुझी सीता कोण ? तिचें काय झाले ? "

" स्वामीजी ! आपण इथ बसा. मी आपल्याला सगळी कथा सांगत्यें मग तुझी नीट गणित करून सांगा बरं, माझी सीता कधीं इथं फिरून येईल ती ! ती माझ्याजवळ फिरून आल्याशिवाय रहायची नाहीं ! "

" तुझ्या सीतेचे काय झालें आहे ? "

" माझ्या सीतेला बादशहाच्या झनानखान्यांत पाठविण्यासाठीं ती अवदसा तिला घेऊन लखनौला गेली आहे. "

" कोण ? "

" तीच राक्षसीण-अवदसा-"

" सीता काय तुझी मुलगी ? "

" सीता कांहीं माझी स्वतःची मुलगी नाहीं. गंगा ही माझी स्वतःची मुलगी ! गगेचा नवरा मेल्यावर दर्शनसिंहानं तिला लखनौला नेऊन बादशहाच्या झनान्यांतली दासी केली. माझी गगा आतां माझ्या दृष्टीस पडेल ! "

" सीता ही कुणाची मुलगी ? "

" सीतेला आईबाप कुणी नाहींत. तिचे आईबाप, भाऊ या सर्वांचा ठगांनीं खून केल्यावर त्या निराश्रित पोरीला दर्शनसिंह्याच्या बापानं इथ आणली. पुष्कळ वर्ष मी याच घरी आहें. दर्शनसिंहाची आई मरायच्या पूर्वीपासून मी इथ आहे. "

त्या स्त्रीनें सांगितलेली ही तुटक हकीगत ऐकून अयोध्यानाथाला कळून चुकलें कीं, आपली भगिनी कैलासेश्वरी हिलाच ही ' सीता ' ह्मणून ह्मणत आहे; परंतु त्या स्त्रीनें सांगितलेली हकीगत ऐकून-जी आशा धरून अयोध्यानाथ तेथे आला होता, ती त्याची आशा आतां समूळ नष्ट झाली तो स्वतःशींच ह्मणाला " हाय ! परमेश्वरा ! एकदा मीं कैलासेश्वरीची आशा सोडून दिली होती; परतु ती आशा पुनः माझ्या हृदयांत उत्तेजित झाली. तिची गांठ येथें पडेल ह्मणून मी किती आशेने येथें आलों. परतु हाय ! येथे तिची भेट तर झाली नाहींच, पण तिच्या-बद्दल अमंगळ वार्ता मात्र कानीं आली. ही दारुण वार्ता मीं ऐकली नसती तर फार चांगले झालें असतें ! "

कांही वेळानें विचारांतून जागें झाल्यासारखे करून अयोध्यानाथानें त्या स्त्रीला विचारिले "जयपालसिंहानें ज्या मुलीचें पालनपोषण केलें, तिचेंच नांव सीता काय?"

" होय. जयपालसिंहाचं तिच्यावर फार प्रेम होतं. "

" तर मग जयपालसिंहाने सीतेला लखनौला नेऊं कशी दिली ? "

" ते इथं असते, तर या मेल्या अवदसेला माझ्या सीतेला तिकडे घेऊन जायचा धीर तरी झाला असता ? "

अयोध्यानाथाला ती स्त्री काय सांगत होती तें समजेना. त्यानें पुनः विचारलें " ती अवदसा कोण ? "

" त्या सटवीला आपण कधी पाहिली नाही वाटत? पूर्वी ती नर्तकी कंचनी होती. दर्शनसिहाची आई मेल्यावर जयपालसिहांनीं तिला इथं आणली. जयपालसिह जेव्हां फार आजारी पडेल, तेव्हां ही मेली अवदसा त्यांनां तोंडसुद्धां दाखवित नसे. त्यांच्या आजारीपणांत माझी सीताच त्यांच्याजवळ बसून राही, अन् मी घरांतल कामधाम करित असे. "

अयोध्यानाथाची आतां थोडथोडी समजूत पडत चालली. त्याने विचारलें " हल्लीं जयपालसिंह कुठे आहेत ? "

" दर्शनसिह त्यांनां लखनौला घेऊन गेला आहे. "

ही स्त्री ज्याचा 'दर्शनसिंह' ह्मणून वारवार उलेख करते, तो दर्शनसिंह कोण? जयपालसिह काय बादशहाचा सेनापति दर्शनसिंह याचा बाप ? असे विचारतरग अयोध्यानाथाच्या मनांत येऊ लागले, आपली खात्री करून घेण्यासाठी त्याने विचारलें " तू कोणत्या दर्शनसिहाची गोष्ट सांगत आहेस ? अयोध्येच्या बादशहाच्या दरबारांतील राजा दर्शनसिह–हाच का तूं ह्मणतेस तो दर्शनसिह ? "

ती स्त्री क्रोधस्वरानें ह्मणाली " होय, तो दर्शनसिंह ! मोठा मेला राजा झाला आहे ! जळल त्या मेल्या राजाच लक्षण ! फुटलं त्याचं कपाळ ! लोकांच्या पोरी धरधरून त्यांनां मेला बादशहाच्या महालांत पाठवितो. माझ्या गगेलादिखील त्यानच नेलीन् , अन् नबाबाच्या महालांत दासी करून ठेवलीन्. आतां गगेची जात गेली; ती बाटली. आतां ती परत आली तरी तिला घरांत घेतां यायची नाही. "

" पण तुझ्या गगेला तूं जाऊं कशी दिलीस ? "

" मी कशी जाऊ देईन ? दर्शनसिंहाच्या लोकांनीं तिला फुसलावून नेली. मला हे अगोदर कळतं, तर त्या मेल्यांचं टाळकंच फोडून टाकलं असत ! "

बोलतां बोलतां ती स्त्री स्फुंदस्फुंदून रडूं लागली. कांहीं वेळाने थोडीशी स्थिर होऊन ती ह्मणाली " महाराज ! तुह्माला काय सांगूं त्या राक्षसाचीं कृत्य ? त्यानं कितीतरी पोरी पकडून आणल्या होत्या. त्यांत एक माझ्या सीतेहून मोठी पण तिच्यासारखीच सुंदर अशी मुलगी त्यान एकदा आणली होती. तिला कुठून पळवून आणली होती तें मला कळलं नाही. ती मोठ्या घराण्यांतली मुलगी अन् मोठ्या घराण्यांतलीच सून असावी, असं मला वाटतं. इथं आणल्यापासूनच

तची फक्त मरणाचीच इच्छा होती. कांहीं दिवसांनीं तिला वेड लागल्यासारखं झाल. भ्रमांत ती ‘ बाबा, दादा, ताई, प्राणेश्वर, अयोध्यानाथ ’ इतकंच मोठमोठ्यान ओरडत असे. माझ्या सीतेवर मात्र पहिल्यापासून तिच फार प्रेम असे. सिता जवळ गेली म्हणजे ती तिच तोंड कुरवाळी अन् ‘ हेच माझे अयोध्यानाथ —माझे प्राणेश्वर ’ असं म्हणे. एक वर्षपर्यंत ती अशी आजारी होती. एकदा तर ती जगते का मरते अशी स्थिति झाली होती. माझी सीता तिच्या-जवळ नेहमीं बसून राही तिचा गळा सुकला म्हणजे तिच्या तोंडांत दुध घाली तीन चार महिने झाले, ती मुलगी थोडीशी बरी झाली आहे त्या मुलीलाहि ते चांडाळ लखनौला घेऊन गेले आहेत ”

त्या स्त्रीनें सांगितलेली ही हृदयद्रावक हकीगत ऐकून अयोध्यानाथाच्या अंगावर शहारे आले त्याच्या मनात शंका आली की बहुधा दर्शनसिंहाच्या लोकांनी मानकुमारीलाहि याच घरात आणून ठेवली असेल आपला हा तर्क कितपत खरा आहे. हे पहावे म्हणून त्याने विचारले “ त्या मुलीला दर्शनसिंहाने कोणत्या देशाहून आणले होते ? ”

“ कुणीकडून त्यान तिला आणली, ते मला कळल नाही ”

“ तिने कधी तुला आपल्या बापाचे किंवा नवऱ्याचे नाव सांगितले नाही ? ”

“ नाही- कधींहि सांगितल नाही अन् ती बोलणार तरी कशी ? आणल्यापासून थोड्याच दिवसात तिच डोकं फिरलं—नंतर पुढं ती भयंकर आजारी पडली. आणि जेव्हां ती थोडीशी बरी झाली तेव्हांपासून रात्रंदिवस सारख रडूनरडून आपल लुगडं ओलं चिंब करून टाकित असे. ”

“ राजा दर्शनसिंहाच्या लोकानी तिला इथेच आणून ठेवले होते काय ? ”

“ होय महाराज तिला इथच आणून ठेवली होती अन् या सगळ्या अनर्थाच कारण कोण म्हणाल तर ती अवदसा! मी आपणाला मघाशी सांगितलंच आहे की, ती पूर्वी नर्तकी कचनी होती. दर्शनसिंहाच्या बापान म्हातारपणीं तिला आपल्या पदरी ठेवल दर्शनसिंह सुंदरसुंदर मुली लांबलांबून पळवून आणून इथ ठेवित असे अन् त्यांनां गाणनाचणं शिकवायचं काम हिला सांगत असे. ”

“ तुझ्या सीतेलासुद्धां तिनें गायलानाचायला शिकवले होते का ? ”

“ माझी सीता नऊ वर्षांची झाल्यावर दर्शनसिंहाच्या बापानं तिच्या लग्नाचं निश्चित केलं. सीतेचं लग्न झालं असतं तर मीहि तिच्याबरोबर निघून गेल्यें असत्यें.

त्या मेलीजवळ कद्धींकद्धीं राहिल्ये नसल्ये ! पण पुढं दर्शनसिंहाचा बाप दुखण्यानं पडला, अन् त्यामुळ सातेच लग्नहि झालं नाही. दर्शनसिहान जयपालसिंहाला इथून नेलं तेव्हां ते शुद्धीवर नव्हते. जातांना त्या अवद्सेला दर्शनसिहान सीतेला नाचायलागायला शिकवायला सांगितल होत. त्याप्रमाण ती सीतेला शिकवू लागली. ज्या मुलीला वेड लागलं होत तिला नाचायला शिकण्याविषयी ती आग्रह करू लागली की, ती पोरगी तिला शिव्या देऊन धुडकावून लावित असे ''

" तर मग तुझी सीता बादशहाच्या रंगमहालांत जायला कबूल झाली ? "

" नाही नाही ! सीता लहान होती तेव्हां ' तुला बादशहाकडे पाठवायचं ' असं ती बाई तिला म्हणत असे तेव्हा बरंवाईट तिला कांही कळत नसे सिता मोठी झाल्यावर सर्व गोष्टी मी तिला नीट समजावून सांगितल्या माझी सीता मोठी गुणांची पोर होती महाराज, मी सांगितलेल्या गोष्टी तुम्ही कुणाला सांगू नका हो ! तुमच्या एकट्याजवळच मी त्या सांगितल्या आहेत. आणखी तुम्हाला एक गोष्ट सांगायची आहे. पण दर्शनसिहाला तुम्ही कांही सांगणार नाहीं ना ? "

" नाहीं, मी कुणाजवळ कांही बोलणार नाही. तुला काय सांगायचं ते माझ्याजवळ निर्भयपणे सांग, मुळीच भिऊ नकोस तुझ्या सीतेला परत तुला आणून देण्याचा मी होईल तितका प्रयत्न करीन "

" स्वामीजी ! तुम्ही माझ्या सीतेला परत आणून द्याल ? तर मग मी तुम्हाला दहा रुपये देईन. तुम्ही वर चला तुम्हाला मी ती सगळी हकीगत सांगत्ये तुम्ही लखनौला जाल का ? तर मग आपल्याबरोबर माझ्या गंगालाहि घेऊन या.''

असे म्हणून ती स्त्री अयोध्यानाथाला आपल्याबरोबर माडीवर घेऊन गेली. ही स्त्री कोण, हें वाचकानां सांगण्याचे कारण नाहीं मागच्या एका प्रकरणांत सांगितलेली दर्शनसिहाच्या घरची बुदिया दाई ती हीच, हे वाचकाच्या अगोदरच लक्ष्यांत आलें असेल.

बुंदिया अयोध्यानाथाला बरोबर घेऊन माडीवरच्या दिवाणखान्यांत गेली. बुदियेला कुठेंहि आपपर भाव नव्हता सगळयांना ती आपलेच असें समजत असे. मागच्या एका प्रकरणांत उल्लेख केलल्या ज्ञातारांशिवाय ती सर्व पृथ्वीत कोणालाहि शत्रु समजत नसे. सगळयांजवळ ती आपल्या मनांतील गोष्टी सांगे. परंतु तिची मुलगी गंगा हिला दर्शनसिंहानें फुसलावून लखनौला नेल्यापासून ती त्यालाहि आपला परम शत्रु समजत असे आणि त्याला फार भीत असे. या दोघांशिवाय सर्व पृथ्वी तिला मित्राप्रमाणें वाटे.

बुंदिया फार सद्गुणी स्त्री होती. सर्व जन्मांत ती कधींहि कुमार्गाने गेली नाहीं. तिचा नवरा मेल्यावर ती आपल्या जांवयाकडे रहात असे. कांहीं दिवसांनीं तिचा जांवईहि वारल्यावर ती आपल्या विधवा कन्येसह जयपालसिहाकडे नोकरीस राहिली. जयपालसिहाने तिला आपल्या बायकोच्या शुश्रुषेकरितां ठेविली होती जवळजवळ वीसबावीस वर्षे ती याच घरी राहिली होती. तीनचार वर्षापूर्वी राजा दर्शनसिहाच्या लोकांनी बुदियेची मुलगी गंगा हिला लखनौला नेले. बुदियेचे वय कमीत कमी पन्नास वर्षांचे होते बुदियेला संसारव्यवहाराचे ज्ञान विशेषसे नव्हतें. बुदियेला सर्वजण खुळी आणि निर्बुद्ध समजत असत, परतु तिच्या हृदयांतील स्वाभाविक धर्मभाव अत्यन्त प्रबळ होता. अनृताचरण आणि कपटव्यवहार याचा तिला फार तिटकारा वाटे आणि ह्मणूनच वेळोवेळी घरातील त्या वृद्ध स्त्रीशी तिचे तटेबखेडे होत असत. ह्मातारी नेहमी जयपालसिहाची संपत्ति लुटून न्यावयाचा प्रयत्न करित असे. बुदिया त्या कामांत तिला होईल तितका अडथळा करी. कुमार्गगामी स्त्रियांचा ती अत्यत द्वेष करित असे. ह्मातारीशी बुदियेचा समेट होणे ही गोष्ट सर्प आणि मुगुस याचा समेट होण्याइतकीच असभवनीय होती

अयोध्यानाथाला माडीवर नेऊन बुदियेने त्याला मान्ना आणि नूना यांजविषयीं पुष्कळ गोष्टी सांगितल्या. अयोध्यानाथाला तिने सांगितलेल्या सर्व गोष्टींचा येथें उल्लेख करण्याचे कारण नाही पुष्कळ गोष्टी सांगितल्यावर शेवटी ती ह्मणाली "लखनौला जावयाच्या पूर्व रात्री मान्ना आणि नूना एके ठिकाणीं निजल्या होत्या. नूना म्हणजे माझी सीता जाणार म्हणून मला फार दुःख झाल. मान्ना आणि नूना काय काय गोष्टी बोलतात, त्या ऐकण्यासाठी मी सारी रात्र त्यांच्या खोलीच्या दाराशी उभी होत्ये. त्यांच्या सगळ्या गोष्टी कांही मला ऐकू आल्या नाहीत, परतु मान्ना आणि नूना यांनी आपापल्या केसांत लहानसे जबिये लपवून ठेविले ते मी पाहिले. बादशहा किंवा दुसरा कुणी आपल सतीत्व नष्ट करणार अस दिसून येतांच आत्महत्या करावयाची, असा त्यांनीं दृढनिश्चय केला. मान्नानं नूनाला आपल्या बापाचं आणि नवऱ्याच नाव सांगितल ते मीं ऐकलं. बापाच नांव गंगाराम कीं गगानाथ असं कायसं तिन सांगितल, ते नीटसं माझ्या ध्यानांत राहिलं नाही; परंतु तिन आपल्या नवऱ्याच नांव पडित अयोध्यानाथ असं सांगितलं तें मात्र माझ्या चांगलं लक्ष्यांत राहिल आहे. शेवटीं मान्ना नूनाला ह्मणाली "तूं माझी नणंद आहेस यात मला मुळींच संशय वाटत नाहीं. तुझी भेट झाल्यानं माझान गिळलेलं माणिक मला परत मिळालं!"

बुंदियेनं सांगितलेली सर्व हकीगत ऐकल्यावर आपली स्त्री मानकुमारी हिला ईशानसिंहानें याच घरीं आणून ठेवली होती, व आपली भगिनी कैलासेश्वरी हीच बुंदियेची सीता किंवा नूना, या दोन गोष्टींबद्दल अयोध्यानाथाला आतां तिळमात्र संशय राहिला नाहीं.

अयोध्यानाथ या स्थळीं येण्यापूर्वी पांच दिवस मानकुमारी आणि कैलासेश्वरी यांनां बरोबर घेऊन म्हातारी लखनौला निघून गेली होती. बुंदियेला बरोबर घेऊन लखनौला जावयाचा अयोध्यानाथानें निश्चय केला. लखनौला जावयाला बुंदियाहि कबूल झाली, परंतु या संसारांत मनुष्यानें इच्छिलेलें कार्य नेहमीं त्याच्या इच्छेप्रमाणें घडून येतेच, असे नाहीं. भवितव्याच्या प्रवाहाबरोबर मनुष्य वाहत असतो— आणि चिरकालपर्यंत भवितव्याच्या स्रोताबरोबरच तो वाहत राहील ! कानपुरला आल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं अयोध्यानाथाला भयंकर ज्वर आला. इतका कीं, तो एकदम अंथरुणाला खिळला. त्याची सेवाशुश्रूषा करण्याचें काम बुंदियेवर पडलें आणि तिनेंहि तें मनोभावानें केलें. परंतु दोन वर्षेपर्यन्त सारखा अविश्रान्त प्रवास, अनियमित आहार, उपासतापास, आणि मानसिक कष्ट यांचा त्याच्या शरीरावर एकदम दारुण परिणाम झाला. जवळजवळ तीन महिनेपर्यंत तो मृतप्राय अवस्थेत अंथरुणाला खिळून राहिला होता. त्याला हलण्याचीहि शक्ति नव्हती. तेव्हां अर्थात्‌च लखनौला जाणें लांबणीवर पडलें. या भयंकर रुग्णावस्थेत अयोध्यानाथ सदासर्वदा केवळ परमेश्वराचें चिंतन करित असे. तो मनांत नेहमीं विचार करी कीं, दैवविपाक आणि दैवबल हीं भिन्न नाहींत. दैवबलानेंच आपली पत्नी आणि भगिनी यांची एके ठिकाणीं गांठ घालून दिली, दैवबलानेंच आपणाला आपली स्त्री आणि बहीण यांची वर्तमान स्थिति कळून आली, आणि दैवबलच त्यांच्या उद्धाराचामार्ग आपणाला दाखवून देईल. याप्रमाणें मनाला धीर देऊन भाद्रपद, आश्विन आणि कार्तिक हे तीन महिने अयोध्यानाथानें कानपुरांत जयपालसिंहाच्या बागेतील घरांत काढले. प्रथम त्यानें आपण कोण याची बुंदियेला ओळख दिली नाहीं; परंतु आपली भयंकर स्थिति पाहून त्यानें बुंदियेला सर्व हकीगत सांगून म्हटलें "बुंदिये ! आपल्या पोटच्या कन्येप्रमाणें तूं माझ्या बहिणीचें प्रतिपालन केलें आहेस. जर मला येथेंच मृत्यु आला, आणि माझ्या मृत्यूनंतर माझी भगिनी आणि पत्नी यांची तुझी भेट झाली, तर त्यांनां माझी हकीगत सांग."

## प्रकरण १६ वें.

# विषय केवळ दुःखमूलच !

* Then I looked on all the works that my hands had wrought and the labour that I had laboured to do; and, behold, all was vanity and vexation of spirits, and there was no profit under the Sun.

—*Ecclesiastes Chapter II—II.*

श्रावण महिना बहुतेक सपत आला होता. भाद्रपदाच्या प्रारभींच गव्हर्नर जनरल लॉर्ड वुइल्यम बेंटिक लखनौला येणार होता. त्यानिमित्त जिकडून तिकडून लोकांचे थवेच्या थवे राजधानींत जमू लागले. दिवसेंदिवस त्या लोकारण्याचा विस्तार झपाट्याने वाढूं लागला. बादशहाचा दिलजान दोस्त सरफराजखां यानें अजबखान्यांत निरनिराळ्या पशुपक्ष्यांची भरती करून अगदीं उत्तम तयारी करून ठेवली होती. पशुपक्ष्यांचीं युद्धे, कंचनीनर्तकींची नाचगाणीं, यांतच नासिरुद्दिन हैदर मोठ्या ख्यालीखुशालीनें दिवस काढित होता. वरून पहाणाराला तो मोठा सुखी आहे असें वाटत असे, परंतु खरोखर पाहिले तर त्याला कशापासूनहि स्थायी सुख किंवा चिर शांति मिळत नव्हती.

गोमती नदीच्या तीरीं, घाटासमोर एक सुरम्य उंच जागा तयार करण्यांत आली होती. गव्हर्नर जनरल, रेसिडेंट, खुद्द बादशहा, बादशहाचे दिलजान दोस्त-पंचायतन वगैरे खास मडळी याच जागीं बसून निरनिराळ्या पशूंचीं युद्धे पहाणार होती. याच जागेच्या समोर पशूंच्या युद्धासाठीं प्रशस्त रंगभूमि मुद्दाम तयार करण्यांत आली होती.

बादशहाच्या अजबखान्यांत या वेळीं दीडशे हत्ती, चार सिंह, चौदा वाघ, दहा गेंडे, तीस रानरेडे, सात उंट, दहा आस्वलें आणि इतर निरनिराळे पशु होते.

---

* माझ्या हातून जीं जीं कर्में घडलीं होतीं—आजपर्यन्त जे जे श्रम मीं केले होते, त्यांचें मीं सिंहावलोकन केलें, तों काय आश्चर्य! जिकडे तिकडे निःसारता आणि मनःक्षोभ यांशिवाय मला कांहीं दिसून आलें नाहीं. सर्व भूतलावर खरा लाभ कोठेंहि आढळला नाहीं. —इकलिझिआस्टिस् भाग २-२.

या सर्व पशूंत कोणाचें किती बल आहे, कोणत्या पशूच्या अंगीं किती पराक्रम आहे, त्याप्रमाणेंच त्यांनां युद्धासाठीं कोणत्या प्रकारचें शिक्षण दिले आहे हें पहाण्यासाठीं मुख्य समारंभाच्या अगोदर या पशूंच्या युद्धाची एक रंगाची तालीम करून घेण्यांत येणार होती. या तालमीत जे पशु विशेष पराक्रम करतील, त्यांचीच युद्धें खुद्द गव्हर्नर जनरलपुढें करून दाखविण्यांत येणार होती.

उंट म्हटला म्हणजे अगदी गरीब, शांत प्राणी. त्यांचीं युद्धें होत नाहींत. परंतु नासिरुद्दिन हैदराच्या पशुशाळेतील उटांनां युद्धासाठीं तयार करण्यांत आले होते! त्यांचा मूळ स्वभाव बदलून टाकण्यांत आला होता! पशूचा ईश्वरदत्त स्वभाव पालटणें म्हणजे अतिशय कठिण काम! परतु सध्या अयोध्येत सर्व प्राण्यांच्या नैसर्गिक स्वभावाचा विपर्यास स्पष्टपणे दिसून येत होता! अयोध्येंत तरुण तरुणींच्या वेषाने फिरत होते! प्रत्यक्ष जन्मदाते आईबाप आपापल्या मुलींनां बादशहाच्या 'मुताही' स्त्रिया करून त्याच्या झनानखान्यांत स्वहस्ताने लोटित होते! सदाचारसंपन्न, पवित्र, धर्मनिष्ठ ब्राह्मणकुलांत जन्म घेऊन शेंकडों तरुण लोक ठगांच्या आणि चोरांच्या टोळ्यांत शिरत होते! ज्या देशाच्या शासनपध्दतीला श्रेष्ठ मनुष्यप्राण्याच्या नैसर्गिक स्वभावांत आणि प्रकृतीत परिवर्तन करणे सहज साध्य होऊन गेलें होतें—ज्या देशांतील प्रचलित धर्माच्या योगाने मनुष्यमात्राला निर्दय, हिंसक आणि पापी बनविले होतें, त्या देशांत उंटासारख्या गरीब प्राण्याचा स्वभाव बदलणे फारसे कठिण नाही!

कोणताहि पशु मत झाल्याशिवाय, त्याला वीरश्री चढल्याशिवाय युध्दांत कसून लढत नाही. यासाठीं युध्दाच्या अगोदर पशूंनां कृत्रिम रीतीने मत्त करावें लागतें. मुसलमानांनां 'मत्त' हा शब्द नीट रीतीने उच्चारतां येत नाहीं, म्हणून लखनौचा बादशहा व त्याच्या दरबारांतील अमीरउमराव 'मत्त' शब्दाबद्दल 'मस्त' शब्द वापरित असत. इंग्रज लोक त्या शब्दाचा 'मास्ट' असा तिसराच अपभ्रंश करीत. दरबारांतिल हिंदु लोकांनां 'मत्त' हा शब्द उच्चारण्यास जरी मुळीच कठीण जात नसे, तरी नबाबाचें किंवा इंग्रजांचें अनुकरण करून ते 'मस्त' किंवा 'मास्ट' असें म्हणत असत!

स्वतः नासिरुद्दिन हैदर, इंग्लिश रेसिडेंट, बादशहाच्या दरबारांतील दोस्त पचायतन, वजीर हकीम मेहेंदी अलीखां, राजा दर्शनसिंह, नायब दिवाण राजा

मेवारामसिंह हे निरनिराळया पशूंचीं युद्धें पाहण्यासाठीं आज मुद्दाम तयार केलेल्या त्या उच्च गच्चीवर विराजमान झाले होते. सर्व तयारी होतांच सर्फराजखानें अजबखान्यावरील पशुरक्षकांनां दोघां उंटांनां ' मास्ट ' करण्याचा हुकूम केला. उंटांनां मत्त करतांना त्यांच्या पोटाला टोचून टोंचून फेस काढावा लागतो. रक्षकांनी दोघा उंटांनां ' मास्ट ' करून रंगभूमीवर आणिलें. दोघांहि उंटांच्या तोंडांतून फेस बाहेर येत होता. फेस पडतां पडतां उन्मत्त होऊन दोघेहि उंट एकमेकांवर धावले व त्यांची लढाई झाली. पण थोडक्याच वेळांत एक उंट पराजय पावून उंटांचे युद्ध संपले.

उंटाच्या लढाईनतर गेंड्यांच्या युद्धास सुरुवात झाली. गेंडा हेसुद्धां शांत प्रकृतीचें जनावर आहे. गाजिउद्दिन हैदरच्या कारकिर्दींत गेड्यांवर हौदे घालून कांहीं लोक मौजेने स्वारी करित असत, असा बिशप हिबरचा एके ठिकाणीं ' चक्षुर्वैसत्यं ' उल्लेख आहे ! परंतु अयोध्येच्या सध्याच्या अवस्थेत गेड्यांची ती शान्त प्रकृति पालटून गेली होती. तेहि लढाई करावयास शिकले होते. दोन गेडयांची गांठ पडली पुरे, कीं, जिगीषामदाने उन्मत्त होऊन ते एकमेकांवर ईर्षेनें तुटून पडत !

गेडयांचे युद्ध आटोपल्यावर रक्षकांनी रगभूमीवर दोन वाघ आणिले अयोध्येच्या बादशहाच्या अजबखान्यांतील ती दोन अजब रत्नेच होती ! त्यांपैकी एकाचे नांव ' बुडिया ' व दुसऱ्याचे नांव ' तराईवाला ' 'तिराई' नावाचे नेपाळांत एक अरण्य आहे, तेथून या वाघाला पकडून आणले होतें, म्हणून याचे नांव ' तराईवाला ' असें पडले होते. या वाघांचें युध्द लागण्यापूर्वी बादशहा त्या युध्दाच्या परिणामाविषयीं आपल्याशीं पैज मारावयास रेसिडेंटला आग्रह करूं लागला. रेसिडेंटाने जरा अवज्ञतेने उत्तर केले " मुलके जामानियांनीं मला क्षमा करावी; पैज मारायला माझ्यापाशीं पैसे नाहींत ! "

बादशहानें पैजेविषयीं उपक्रम केला होता. आतां जवळ हजर असलेल्या लोकांपैकी कोणी त्याच्याशी पैज मारण्यास कबूल झाला नाहीं तर त्यांत बादशहाचा अत्यन्त अपमान झाल्यासारखें होईल, असा विचार करून तेथें हजर असलेल्या खास दरबारांतील दोस्त-पंचायतनापैकी बादशहाचा इंग्रजी शिक्षक पुढें येऊन हात जोडून म्हणाला "मुलके जामानिया! मी पैज मारण्यास तयार आहें. या युध्दांत ' बुडिया ' हरेल. ' बुडिया ' हरला नाहीं तर मी मुलके जामानियांस पांचशें असरफी देईन. "

'बुडिया' कधींहि हरणार नाहीं, हें इंग्रजी शिक्षकास अगदीं पक्कें माहीत होतें; परंतु बादशहाशीं पैज मारावयाची म्हणजे बादशहा ती जिंकेल अशीच मारिली पाहिजे ! नासीर म्हणाला "या लढाईंत 'तराईवाला' हरेल. 'तराईवाला' पराजित झाला नाहीं तर मीहि पांचशे असरफी हरेन."

शेवटीं, युध्दांत 'तराईवाला' हरला. बादशहाला पैज जिंकल्याबद्दल मोठा अभिमान वाटू लागला शिक्षकाकडे जयदर्शक मुद्रेनें पाहून तो पांचशे असरफांची मागणी करूं लागला. आपण पैज हरलो असे कबूल करून शिक्षकहि बादशहाला पांचशे असरफी देण्यास तयार झाला.

वाघांची लढाई संपल्यावर हत्तीच्या युध्दास प्रारभ झाला. बादशहाच्या पीलखान्यांत 'मालियार' नांवाचा एक प्रचड हत्ती होता. आजपर्यंत नवीन नवीन हत्तीशी लढाया मारून 'मालियार'नें कमीत कमी शभर वेळ तरी जय मिळविला असेल यध्द करतां करतां एकदा त्याचा एक दांतहि मोडला होता. आज दुसऱ्या एका प्रचंड हत्तीशी 'मालियार'ची लढाई लागली. दोघांहि हत्तीचे माहुत आपापल्या हत्तीनां पुढे करून लढण्याबद्दल उत्तेजन देत होते. ज्याचा हत्ती जिंकेल त्या माहुताला मोठे इनाम मिळणार होते, म्हणून आपल्या हत्तीने लढाई जिंकण्याबद्दल दोघेहि माहुत परकाष्ठेचे श्रम करित होते. थोड्याच वेळांत 'मलियार'चा प्रतिद्वंद्वी हत्ती पराजित होऊन पळून जाऊ लागला. 'मालियार'हि एखाद्या धीरप्रकृति वीराप्रमाणें पळणाऱ्या शत्रूला दया दाखवून युध्दापासून विरत झाला; परतु गच्चीवरून बादशहाने हुकूम केला "मलियारला पुनः मस्त करा !"

साहेबहि ओरडले "या वेळी मालियारला 'मास्ट' केलाच पाहिजे !"

हत्तीचा माहुत बक्षिसाच्या आशेनें ललचावून, पराभूत झालेल्या हत्तीच्या मागे 'मालियार'ने ईर्षेने धावत जावें म्हणून अंकुशाने त्याला वारंवार टोचूं लागला. 'मालियार'ला तें सहन झाले नाही. एका क्षणांत त्याने सोंडेनें माहुताला खालीं पाडून आपल्या पायांखाली चिरडून टाकले. माहुत तत्क्षणीं ठार झाला! 'मालियार' मृत माहुताचा एक एक हात जोराने उपटून काढून लीलेने अंतरिक्षांत उडवू लागला.

मृत माहुताची स्त्री आपल्या लहान मुलाला कडेवर घेऊन जवळच उभी होती. नवरा मेलेला पाहून ती मुलाला उराशीं धरून हत्तीकडे धावत जाऊं लागली. हा प्रकार गच्चीवर बसलेल्या रेसिडेंटाच्या नजरेस येतांच समोर असलेल्या

घोडेस्वारांनां त्यानें हत्तीला हांकून देण्याविषयीं हुकूम केला. “ माहुताच्या बायकोचे प्राण वांचवा ! ” असें तो मोठमोठ्याने ओरडूं लागला. रेसिडेंटच्या हुकुमानें घोडेस्वार शस्त्रें सज्ज करून हत्तीकडे जाणार, त्याच्या अगोदरच ती स्त्री हत्तीजवळ जाऊन पोहोचली! हत्तीकडे रागाने पहात ती ह्मणाली “निर्दया मालियार! दुष्टा! तूच माझ्या नवऱ्याला मारून आमच्या घराचा आसरा नाहींसा केलास नव्हे ? आतां मला तरी कशाला जिवंत ठेवतोस ? मलाहि मारून टाक, ह्मणजे सुटलास एकदाचा ! ”

रेसिडेंटला आणि दुसऱ्या सर्व लोकांनां वाटलें की, तो उन्मत्त हत्ती आतां माहुताच्या स्त्रीपुत्राला खास ठार करणार ! परंतु काय आश्चर्य ! माहुताची स्त्री जवळ जातांच ‘ मालियार ’ शांत होऊन उभा राहिला ! तिच्या आर्तनादानें आणि रुदनाने हत्तीला दुःख होऊन तो नेत्रांतून अश्रुविसर्जन करूं लागला ! माहुताच्या देहावरील पाय त्याने काढून घेतला. इतक्यात घोडेस्वारहि येऊन ठेपले व आपल्या लांब भाल्यानीं हत्तीला टोंचून हाकलूं लागले. त्याबरोबर हत्ती चवताळून त्यांच्या अंगावर धावून गेला. स्वारांच्या अगदीं जीवावर बेतल्यामुळे त्यांनीं ‘यःपलायते’ केले ! हा कठीण प्रसंग पाहून गच्चीवरून बादशहानें माहुताच्या स्त्रीला हत्तीला शांत करण्यास सांगितले. तिनें हत्तीला नुसता इशारा करतांच तो परत फिरला. माहुताचा लहान मुलगा हत्तीची सोंड धरून बागडूं लागला आणि हत्तीहि त्याच्याशीं खेळूं लागला ! मृत माहुताच्या सर्व कुटुंबाशीं ‘ मालियार ’ अगदीं माणसाळून गेला होता.

‘ मालियार ’ला पीलखान्यांत घेऊन जाण्याविषयी बादशहाने माहुताच्या स्त्रीला हुकूम केला. तिनें खूण करतांच हत्ती खालीं बसला व माहुताची स्त्री मुलासह त्याच्यावर आरोहण करून निघून गेली. त्यावेळची ‘मालियार’ची शान्तवृत्ति पाहून याच प्राण्यानें अर्ध्या घटकेपूर्वी आपल्या पालकाला ठार केले असेल, असें कोणालाहि वाटलें नसतें ! याप्रमाणें पशुयुद्ध समाप्त झाले.

दुसऱ्या दिवशीं पक्ष्यांचीं युद्धें लावण्यांत आलीं. त्यांत कोंबडयांचें व खबुतरांचे युद्ध फार प्रेक्षणीय झालें. एका जातीच्या पक्ष्याचें दुसऱ्या जातीच्या पक्ष्याशीं युद्ध —अशींहि युद्धें बरींच झाली.

यानंतर कांहीं दिवसांनीं हरिणांच्या लढाया लावण्यांत आल्या. एकाच प्रकारानें नासीरचें नेहमीं मनोरंजन होणें शक्य नव्हतें. त्याला दररोज नवीन नवीन करमणुकी

लागत असत. बादशहाच्या मनोरंजनाकरितां दरबारच्या लोकांनां नित्य नवे नवे प्रकार शोधून काढावे लागत.

पक्ष्यांच्या लढायांनीं नासीरचें बरेच मनोरंजन झाले होतें या करमणुकीनें तो फार संतुष्ट झाला. पशुपक्ष्यांच्या युद्धाचे काम सर्फराजखांवर सोपविण्यांत आलें होतें व तें त्यानें उत्तम प्रकाराने पार पाडलें होतें; यामुळें सर्फराजखांवर बादशहाची बहाल मर्जी होऊन तो त्याची फार प्रशंसा करू लागला, परंतु बादशहाच्या मुखांतून सर्फराजखांची प्रशंसा ऐकून राजा दर्शनसिंहाला अत्यंत विषाद वाटूं लागला. त्या स्तुतीचे प्रत्येक अक्षर दर्शनसिंहाच्या हृदयाला सर्पदंशाप्रमाणे व्यथा करूं लागलें. दर्शनसिंहावर बादशहाने जी कामगिरी सोपविली होती, ती त्याच्याकडून अद्यापपर्यन्त बजवली गेली नव्हती. मान्ना आणि नूना लखनौला पोहोंचल्यानंतर दुसऱ्याच दिवशी मान्ना भयंकर रीतीनें आजारी पडली. तिच्याने बिछान्यावरुनहि उठवेना. फरीदबक्ष राजवाड्यापासून सुमारे एक कोस अंतरावर गोमती नदीच्या दुसऱ्या तीरावरील एका बगीच्यात मान्ना आणि नूना त्या वृद्ध स्त्रीसह रहात असत. दर्शनसिंहानें नेमलेले पहारेवाले बागेसभोंवती सर्वकाल जागरूकतेने पहारा करीत.

मान्नाच्या आजारीपणामुळे दर्शनसिंहाला घोर चिंता लागून राहिली. काश्मिरी कंचनी आणण्याच्या खर्चासाठीं बादशहाकडून त्याने एक लक्ष रुपये घेतले होते. मान्ना आणि नूना यांपैकीं कोणीहि काश्मिरी कंचनी नव्हती. दर्शनसिंहाने त्यांची नांवे मात्र काश्मिरी कंचनीचीं ठेविली होतीं, व काश्मिरी नर्तकी म्हणून त्यांना त्याने कानपुराहून लखनौला आणिलें होते त्याच्या या सर्व व्यूहाची लवमात्र जरी परिस्फुटता झाली असती, तर दर्शनसिंहाला पदच्युत व्हावे लागून कडक शिक्षा भोगावी लागली असती. बादशहाला आपण काश्मिरी कंचनी नजर केल्यावर आपण त्याचे प्रियपात्र होऊं, अशी त्याने मनांत मोठी आशा बाळगिली होती, आणि या आशेच्या पायावर त्यानें मनोरथरूपी एक टोलेजंग इमारत उठविली होती. हकीम मेहेंदिखांच्या जागेवर आपली वजीर म्हणून नेमणूक होईल, ही इच्छा त्या इमारतीचा कळस होऊन राहिली होती. हकीम मेहेंदिखां जरी वजीर असला, तरी बादशहाच्या खास दरबारांत कांहीं त्याला स्थान नव्हतें. आपणाला मुख्य वजिराची जागा मिळाल्यावर आपण दोहींकडे काम करूं; मुख्य वजीर म्हणून राज्यशकट हांकूं व बादशहाच्या खास दरबारांत सर्फराजखांच्या पदावर विराजमान होऊं, अशी

राजा दर्शनसिंहाला फार आशा होती सर्फराजखां खास दरबारांत जरी प्रधान-पदावर विराजमान झाला होता, तरी वस्तरा कांहीं त्याच्या हातून सुटला नव्हता. अझूनहि सर्फराजखां दररोज बादशहाची केशरचना करित असे. बादशहाचा वस्तरा आणि ब्रश अझूनपर्यंत त्याच्याच हातांत होता. सर्फराजखांला पदच्युत केल्यावर आपण त्याच्या जागीं दुसरा एक विलायती न्हावी आणू, असा दर्शन-सिंहानें आपल्या मनांत पक्का निश्चय करून ठेविला होता. सर्फराजखांप्रमाणे दर्शन-सिंहाला वस्तरा हातांत वागविणें शक्य नव्हते, ह्मणून तर तो विलायतेहून दुसरा हजाम आणविणार होता! परंतु मान्नाच्या आजारीपणानें दर्शनसिंहानें बांधलेल्या ह्या मनोरथरूपी इमारतीचे मजले धडाधड कोसळू लागले! त्याच्या सर्व कल्पना आणि आशा विफल होण्याचा रंग दिसू लागला! दररोज सायंकाळीं गोमतीतीरावरील त्या बागेंत जाऊन दर्शनसिंह ह्मातारीशीं गुप्त खलबते करित बसे. मान्नाला लवकर आरोग्य प्राप्त व्हावे ह्मणून म्हातारी रात्रंदिवस रामनामाचा जप करित होती!

पशुपक्ष्यांची युद्धे समाप्त झाल्यावर नासीरच्या मनोरंजनार्थ दुसरी कांहीं करमणूक मिळेना, तेव्हां काश्मिरी कंचनी आणण्याबद्दल त्यानें दर्शनसिंहाला हुकूम केला. बादशहाला या वेळीं काय सबब सांगावी, याबद्दल दर्शनसिंहाला जरा विचार पडला, परंतु धीर करून तो ह्मणाला " मुलके जामानिया! मान्ना आणि नूना नांवाच्या दोन प्रसिद्ध काश्मिरी कंचनी पंजाबहून नुकत्याच येथें येऊन पोहोचल्या आहेत, परंतु उन्हाळयाच्या भयंकर तापानें मान्ना आजारी पडली आहे. ह्मणून निदान चारपांच दिवस तरी तिला दरबारांत मुजरा करायला येणे शक्य नाहीं, या कसुरीबद्दल हुजुरांनीं माफी करावी. "

बादशहाला याप्रमाणे सबब सांगून तेवढी वेळ मारून नेल्यावर सायंकाळीं दर्शनसिंह बगीच्यांत ह्मातारीकडे आला. दरबारांत घडलेली हकीगत त्यानें तिला सांगितली व " पुढे काय करावे?" असा प्रश्न केला. वृद्धा ह्मणाली "काय करावं! मान्नाचं दुखणं तर दिवसेदिवस सारखं वाढत आहे, दुखण्याचं पाऊल मागं नाहीं. या दुखण्यांतून ती ह्मणजे उठेल, अशी मला कांहीं आशा दिसत नाहीं. मग आतां एकट्या नूनालाच बादशहाच्या झनान्यांत पाठवून दे दुसरा कांहीं इलाज नाहीं!"

दर्शनसिंह ह्मणाला " नूनाला तरी ' मुताही ' म्हणून बादशहाकडे पाठवून आपला कांहीं फायदा होईल असें मला वाटत नाहीं. हल्लीं बादशहाच्या झनान्यांत ' मुताही ' स्त्रियांची संख्या जवळजवळ तीनशें आहे. त्या निरनिराळ्या महालांत

रहातात. कांहींकांहीं महालांतल्या 'मूताहि' स्त्रियांनां बादशहानें अद्यूनपर्यंत पाहिले देखील नाहीं ! "

'मुताही' स्त्री ह्मणजे काय प्रकार आहे, याबद्दल वाचक बरेच विस्मयांत पडले असतील. याठिकाणीं बादशहाच्या जनानखान्याची रचना व त्यांतील मुख्यमुख्य नियम वाचकांनां समजावून देणें आवश्यक आहे.

दिल्लीच्या बादशहाची कन्या ही नासिरुद्दिन हैदरची मुख्य बेगम होती. लग्नानंतर ती 'ताजमहाल' या नांवानें सर्वत्र परिचित आहे. तिचा महाल अगदीं स्वतंत्र वेगळा होता. तिच्या महालांत असख्य दासदासी आणि कमीतकमी पन्नास स्त्री-शिपाई होते. नासीरचें तिच्यावर प्रेम नव्हतें, तरी सर्वत्र तिचा मान व आदर मोठा होता. तिची पदमर्यादा सर्वजण मानित असत. ती सर्वांत श्रेष्ठ बेगम होती, याविषयीं कोणी कधींहि वाद केला नाहीं. दुसऱ्या कोणत्याहि बेगमेवर नासीरचें जरी अत्यंत प्रेम असलें, किंवा दुसरी कोणतीहि बेगम जरी नासीरच्या हृदयावर ताबा चालवित असली, तरी तिला ताजमहाल बेगमेबरोबर एका आसनावर किंवा समान आसनावर बसतां येणे शक्य नव्हतें. इतर सर्व बेगमानां ताजमहाल बेगमला मनांत नसलें तरी मान द्यावा लागत असे; परंतु जरी ताजमहाल बेगमेचा चोहोंकडे मोठा मान होता, जरी तिचा अधिकार मोठा होता, तरी ती पतिप्रेमाला सर्वथा वंचित झाली होती. नासीर बहुधा तिचें कधीं दर्शनहि घेत नसे.

ताजमहाल बेगम जरी पतिप्रेमाला व पतिसुखाला सर्वस्वी वंचित झाली होती तरी तिचे उच्चपद, श्रेष्ठ अधिकार, उच्च वंशसंभवाबद्दलचा तिचा सदभिमान व सद्गुणांकडे तिचा नैसर्गिक ओढा, यामुळे ती कधीं सत्पथापासून केंसभरहि ढळली नाहीं. विदेशीय लोकांची अशी कल्पना असते कीं, पतिसुखाला किंवा पतिप्रेमाला वंचित झालेल्या बेगमा बहुधा कुपथगामिनी होतात. परंतु या भारतवर्षांतील हिंदु आणि मुसलमान स्त्रियांच्या चरित्राची रचना फार उच्च दर्जाची आणि निराळ्याच प्रकारची आहे. अयोध्येच्या या साध्वी ताजमहाल बेगमेनें आपली पदमर्यादा सोडून पवित्र नारीधर्माचें विसर्जन केल्याचा कोणत्याहि इतिहासकारानें कोठेंहि यत्किंचितहि उल्लेख केलेला नाहीं.

कांहीं हीनकुलोद्भव स्त्रियांनांहि नासीरनें आपल्या बेगमपदावर आरूढ केलें होतें. त्यांच्याबद्दल निरनिराळ्या तऱ्हेच्या अनेक कंड्या उठत असत. नासीरच्या 'मुताही'

स्त्रियांबद्दलहि लोकापवाद कांहीं कमी नव्हता; परंतु ताजमहाल बेगम ही परम साध्वी होती, या गोष्टीबद्दल कोणी लवमात्रहि संशय प्रदर्शित केलेला नाहीं.

नबाबाच्या दुसऱ्या बेगमेचें नांव कुदसिया बेगम ही बेगम निवर्तल्याला फार दिवस झाले नव्हते. तिसऱ्या बेगमेचे नांव बादशा बेगम. चवथी बेगम नबाब आक्तार महाल. पांचवी नबाब नूरमहाल सहावी नबाब आयेस महाल, सातवी अफझल महाल, आठवी मलिका झमानी वगैरे वगैरे सर्वांचीं नांवें सांगत बसत नाही. या बेगमांपैकीं कांहीं जणी पूर्वी नासीरच्या नाटकशाळा व कांहीं 'मुताही' स्त्रिया होत्या. इंग्रज लेखकांनीं बादशहाच्या सर्व 'मुताही' स्त्रियांनां नाटकशाळा ह्मणून ह्मटले आहे. परतु नाटकशाळा आणि 'मुताही' स्त्रिया यांच्यामध्ये वास्तविक फार मोठा भेद आहे एखाद्या मुसलमानाच्या सुदर कन्येवर बादशहाची नजर गेली, की, ती कन्या बादशहाच्या झनानखान्यांत 'मुताही' स्त्री ह्मणून आणिली जात असे. बादशहापासून तिला मूल झाले ह्मणजे तिला निराळा महाल आणि स्वतत्र दासदासी ठेवण्यासाठीं बादशहाकडून योग्य तनखा मिळत असे. पुष्कळ मुसलमान लोक आपल्या मुलींनां किंवा बहिणींनां बादशहाच्या झनानखान्यांत 'मुताही' स्त्रिया करून पाठविण्याविषयीं फार प्रयत्न करित असत. बादशहाहि या लोकांवर मेहरबानी करून त्यांच्या मुली किंवा भगिनी यांनां आपल्या 'मुताही' स्त्रिया म्हणून झनानखान्यांत ठेवून घेई; परतु या रीतीनें ज्या स्त्रिया 'मुताही' ह्मणून झनान्यांत येत त्यांपैकीं बहुतेकांनां बादशहाचें वर्षानुवर्ष दर्शनहि घडत नसे! त्यांनां फक्त वार्षिक तनखा मिळत असे या सर्व मुताहि स्त्रियांनां रहाण्याकरितां मोठ्या चाळी बांधलेल्या असत, त्यांची रचना मुबईतील भायखळयावरील घोड्यांच्या तबेल्याप्रमाणे असे! एका लांबच लांब चाळींत दहा किंवा बारा खोल्या केलेल्या असत व या प्रत्येक खोलीत एक एक 'मुताही' स्त्री रहात असे!

'मुताही' स्त्रियांशिवाय एखाद्या कंचनीवर किंवा नाटकशाळेवर बादशहा कधीं अनुरक्त झाला ह्मणजे तिच्याशीं निका करून तो तिला आपली बेगम करी. आयेस महालही बेगम होण्यापूर्वी बादशहाची नाटकशाळाच होती. आक्तार महाल बेगम ही पूर्वी 'मुताही' स्त्री होती. बादशहाची त्यांच्यावर मर्जी बसल्यामुळें त्यांच्याशीं विवाह करून त्यानें त्यांनां बेगम केलें. बादशहाच्या झनान्यांतील स्त्रियांनां उन्नति करून घेण्याचे हे दोन मार्ग होते. यापैकीं दुसरा मार्ग दर्शनसिंहाला पसंत पडला;

मान्ना आणि नूना यांचा झनानखान्यांत प्रथम नाटकशाळेच्या रूपानें प्रवेश करून द्यावा, असें त्यानें ठरविलें. याप्रमाणे त्यांचा एकदा नाटकशाळा ह्मणून झनानखान्यांत प्रवेश झाला ह्मणजे त्यांच्या अप्रतिम लावण्याच्या जोरावर त्या लौकरच बादशहाच्या बेगमपदावर आरुढ होतील, अशी दर्शनसिंहाची पक्की खात्री होती. त्याला पक्के माहीत होते की, 'मुताही' स्त्रियांपेक्षां नाटकशाळांनां बादशहाच्या बेगमपदाचा लाभ होणे अधिक सुलभ आहे! पुष्कळ 'मुताही' स्त्रियांनां बादशहाचे कधी दर्शनसुध्दां घडत नाहीं मान्ना आणि नूना यांचा नाटकशाळा ह्मणून जर बादशहाच्या अंतःपुरांत प्रवेश होईल, तर भाग्यक्रमाने त्या लवकरच बेगमा झाल्याशिवाय रहाणार नाहीत, असे दर्शनसिंहाला खात्रीपूर्वक वाटत होते.

राजा दर्शनसिंहाने जरी याप्रमाणें मान्ना आणि नूना यांनां बादशहाच्या झनान्यांत नाटकशाळा म्हणून पाठविण्याचें ठरविले होतें, तरी अद्यापि त्याला तसे करण्यास योग्य संधि सांपडली नाहीं! मान्नाच्या आजारीपणामुळे तर आतां तो मोठ्या संकटांत पडला होता या प्रसंगीं काय केले असतां बादशहाची आपल्यावर खप्पा मर्जी होणार नाही, हे त्याला समजेना. चार दिवसांच्या आंत काश्मिरी कंचनीनां दरबारांत घेऊन येतो असे त्याने बादशहाजवळ कबूल केलें होतें. चार दिवसांपैकी तीन दिवस तर निघून गेले! दर्शनसिंह अत्यंत चिंताकुल झाला!

परंतु एकेकाच्या नशीबाचा जोर किती विलक्षण असतो पहा! मनुष्य संकटांत सांपडला असतां कधी कधी आकस्मिक एखादी विलक्षण गोष्ट घडून येऊन त्याच्यावरचे संकट टळते! आज लखनौ शहरात जर पुढील विलक्षण गोष्ट घडून आली नसती, तर नासीरच्या कोपानलांत दर्शनसिंह भस्म होऊन गेला असता!

मृत कुदसिया बेगमेच्या विनतीवरून नासिरुद्दिननें मना जान नांवाच्या एका मुलाला आपला पुत्र ह्मणून कबूल केले होते; परंतु कुदसिया बेगमेच्या मृत्युनंतर तिला दिलेलें वचन विसरून बादशहा मना जानचा पुत्र ह्मणून स्वीकार करण्यास नाकबूल झाला. याच सुमारास गव्हर्नर जनरल लॉर्ड वुइल्यम बेंटिक लखनौला येणार होता. मना जानला आपला पुत्र म्हणून जर गव्हर्नर जनरलच्या पुढें या प्रसंगीं उभा केला, तर आपल्यामागें मना जानलाच अयोध्येची गादी मिळेल, असा विचार नासिरुद्दिनच्या मनांत आला; ह्मणून मना जानला या वेळीं लखनौहून दुसरीकडे कोठें तरी पाठविला पाहिजे, किंवा तें नच साधल्यास त्याचा प्राणनाशहि केला पाहिजे, असा बादशहानें निश्चय केला.

या वेळीं मना जान हा गाजिउद्दीन हैदरची वडी बेगम जनाबे आलि हिच्या संरक्षणाखालीं होता मना जानला तिच्यापासून दूर करून आपल्या हस्तगत करून घेण्यासाठी बादशहा जारीने प्रयत्न करूं लागला, परतु जनाबे आलीला नासीरचा हा दुष्ट हेतु केव्हांच कळून चुकला होता. मना जानला बादशहाच्या स्वाधीन करण्यास ती मुळीच कबूल होईना.

नासीर अत्यत कृतघ्न होता! नासीरचा बाप गाजीउद्दिन हैदर हा गादीवर असता त्याने एकदा नासीरला ठार मारण्याचा विचार केला होता, परतु जनाबे आलीनेच त्या वेळी नासीरचे प्राणरक्षण केले परतु आतां तोच नासीर आपल्या प्राणदात्या आईवर उठला! मना जानला हस्तगत करण्याचे आपले सर्व उपाय निष्फळ झाले असे पाहून नासीर आपली माता जनाबे आलि हिला लखनौतून बाहेर हांकून देण्यास उद्युक्त झाला ! इग्रजांचे सैन्य किंवा दर्शनसिहाच्या हाताखालचे शिपाई यांनी जनाबे आलीच्या महालांत शिरून तिला हांकून दिली असती, तर ती गोष्ट नासीरला अत्यत लांच्छनास्पद झाली असती. म्हणून नासिरुद्दिनने आपल्या सर्व बेगमांच्या महालांतील एकंदर स्त्री-शिपाई गोळा केले. स्त्री-शिपायांचा हा उल्लेख वाचून वाचकानां कदाचित आश्चर्य वाटेल. परंतु मुसलमान बादशहांच्या झनानखान्यांत स्त्री-सैन्य ठेवण्याची चाल होती या स्त्री-सैन्यापैकीं बहुतेक शिपाई काफ्री जातीचे असत. परतु अलीकडे दर्शनसिहाने अयोध्येंतील नीच जातीच्या स्त्रियांनाहि या सैन्यांत येण्याची मुभा ठेविली होती. या स्त्री-सैन्यांत इतर सैन्याप्रमाणेच कॅप्टन्, लेफ्टनंट, स्वार, पायदळ वगैरे निरनिराळया अधिकाराच्या स्त्रिया होत्या या सैन्यांतील स्त्रिया शिपायांप्रमाणेच पोषाक करित असत. साधारण स्त्रियाप्रमाणे त्या आपल्या केशांची वेणी किंवा बुचडा बांधित नसत, तर बैराग्याप्रमाणे माथ्यावर केसांचा जटाजूट बांधीत व वर शिपाईबाण्याची पगडी ठेवात. त्यामुळें त्याचे बहुतेक केंस झांकून जात असत. त्यांच्या हातांत बंदुक व कमरेला तलवार लटकलेली असे या सैनिकांनां पाहून हे स्त्रीजातीचे आहेत, असे कोणाला सहज ओळखतां येत नसे. इग्लिश पध्दतीच्या कोटानें झांकलेला त्यांचा वक्षःप्रदेश किंचित् उंच दिसे, यामुळेंच बारकाईनं पाहणारांस त्यांच्या स्त्रीत्वाची कल्पना करतां येई.

नासीरच्या ताजमहाल बेगमेच्या महालांत सुमारें पन्नास स्त्री-शिपाई होते. इतर बेगमांच्या महालांतून त्यांच्या योग्यतेप्रमाणें वीसपासून तीसपर्यंत स्त्री-शिपाई

असत. सर्व बेगमांच्या महालांतील एकंदर स्त्री-सैनिक ऐके ठिकाणी जमून बादशहाच्या हुकुमाने गाजीउद्दीन हैदरची बडी बेगम जनाबे आलि हिच्या महालावर चाल करून गेले. परतु जनाब आलि बेगमच्या महालांतहि सुमारे दीडशे स्त्री-सैनिक होत. मागील प्रकरणांत जिचा उल्लेख आला आहे ती . बुदियेची मुलगी गगा जनाबे आलीच्या महालांतील स्त्री-सैनिकांवर कॅप्टन् होती.

नासीरने पाठविलेले स्त्री-सैन्य जनाबे आलि बेगमेच्या महालावर हल्ला करण्यास येत आहे ही बातमी समजतांच जनाबे आलीचे स्त्री-सैनिकहि त्यांच्यांशी दोन हात करावयाला शस्त्रास्त्रांसह सिद्ध झाले. बदुका, तरवारी, ब्यागनेट हातांत घेऊन तेहि शत्रुसैन्यावर तुटून पडले दोन्ही पक्षांची लढाई जुपली. दोन्ही सैन्यातून बदुकांच्या गोळ्यांचा वर्षाव होऊ लागला. जनाबे आलीच्या सैन्यांतील तीन शिपाई जखमी झाले, परंतु नासीरच्या पक्षाकडील दहाबारा सैनिक ताबडतोब ठार झाले! दोन्ही पक्षांत भयकर रण माजून राहिले. वजीर मेहेंदी अल्लीने या सग्रामाची बातमी ताबडतोब इंग्लिश रसिडेंटकडे पाठविली. तत्क्षणी रेसिडेंट घोडा दौडित रणभूमीवर येऊन दाखल झाला व त्याने नासीरला दोन गोष्टी समजावून सांगून युद्धापासून परावृत्त केले रेसिडेंटच्या हुकुमाने उभयपक्षांतील योद्धे निघून गेले. नासीरचा इष्ट हेतु सिद्धीस गेला नाही

वर वर्णन केलेल्या युद्धामुळेच दर्शनसिंहाचा बचाव झाला ज्या दिवशी मान्रा आणि नूना यांना दरबारांत आणण्याचे त्याने बादशहाजवळ कबूल केले होते, त्या दिवशी दुपारीच हे युद्ध झाले. लढाईच्या गडबडीत नासिरुद्दिनला काश्मिरी कचनीचा विसर पडला. बादशहाचे हे विस्मरण दर्शनसिंहाच्या आयतेच पथ्यावर पडलें !

जनाबे आलि बेगमेपासून मना जानला दूर करण्याची सर्व खटपट व्यर्थ गेल्यामुळें बादशहा कांहीं दिवसपर्यंत अगदी उदासीन आणि विरक्त होऊन गेला होता. कोठल्याहि गोष्टीवर त्याचे मन लागेना. बादशहाचे दिलजान दोस्त पचायतन त्याचें चित्त प्रफुल्ल ठेवण्यासाठीं अनेक उपाय शोधून काढी, परंतु त्यांना यश येईना.

बादशहाच्या खास दरबारांतील सभासदांना 'आतां पुढें काय करावें' हा मोठा प्रश्न पडला. शेवटी, पुष्कळ विचार व भवति न भवती होऊन सर्वानुमतें असें ठरलें कीं, लखनौपासून थोड्या अंतरावरच्या अरण्यांत शिकारीकरतां जाण्याविषयीं

बादशहाचें मन हरप्रयत्न करून वळवावें. हें काम अर्थात् सर्फराजखांवर येऊन पडलें. काय असेल तें असो, यावेळीं नासीरने सर्फराजखांच्या विनंतीला मान दिला. नबाबभाईच ते ! एकदा एखादी गोष्ट मनांत भरण्याचा अवकाश, कीं, लागलीच ती अमलांत आलीच पाहिजे! लखनौपासून दहा कोसांवरच्या एका अरण्यांत तंबू ठोकून शिकारीची सर्व तयारी करण्याचा खाशा स्वारीचा ताबडतोब हुकूम झाला. हुकुमाप्रमाणे तबू वगैरे ठोकून सर्व तयारी करण्यांत आली. या शिकारीनिमित्त वीस हजार रुपये खर्ची पडले. खास दरबारांतील दिलजान दोस्त-पचायतन, हकीम मेहन्दी अलीखां, नायब दिवाण राजा मेवारामसिंह, दोनतीन बेगमा, वीसपंचवीस मुताही स्त्रिया, शंभरसवाशें दासदासी, इतक्या मंडळीनिशीं शिकारीसाठीं बादशहाची स्वारी निघाली

राजा दर्शनसिंहहि आपल्या हाताखालच्या शिपायांसह बादशहाबरोबर होता. खरोखर दर्शनसिंहाचे नशीब मोठें बलवत्तर ! पांचसात दिवसांत बादशहाची स्वारी शिकारीहून परत फिरण्याचा फारसा संभव नव्हता. कदाचित् पांचसात दिवसांत मान्नाला बरें वाटून तिला बादशहाच्या दरबारांत मुजरा करावयास जातां येईल; कोणी सांगावे !

लखनौहून निघाल्यापासून थोड्याच वेळांत बादशहा शिकारीच्या अरण्यांत जाऊन पोहोंचला खास दरबारांतील इंग्रज दोस्तांनीं लागलीच आपल्या बंदुकांनीं पांखरांची शिकार करण्यास आरंभ केला. बादशहालाहि शिकार करण्यास स्फुरण चढले दोन्ही डोळे मिटून त्यानें बदुक झाडली. त्याच्या बदुकीच्या छऱ्यांनीं एकाहि पक्ष्याला स्पर्श करा नाहीं. परतु बादशहाची बदुक सुटते न सुटते इतक्यांत त्याचे हुजरे आहम्मकउल्ला, बक्सू, आजिमअली, नियामतखां यांपैकीं प्रत्येकजण हातांत तीनचार मेलेले पक्षी घेऊन बादशहाजवळ येऊन म्हणाला "सोबान अल्ला ! मी शपथ घेऊन सांगतों, कुराणाला शिवून सांगतों, मुलके जामानियांच्या बंदुकीतील छऱ्यांनींच हे तीन पक्षी मरून पडले !" बादशहाच्या इंग्रज दोस्तांनीं जे पक्षी अगोदर ठार केले होते, किंवा जखमी केले होते, तेच पक्षी हातांत घेऊन हे हुजरे बादशहाजवळ आले होते. आपल्या बदुकीच्या एका बारासरशी जवळजवळ पंधरावीस पक्षी मेलेले पाहून बादशहाला आपल्या निशाणबाजीचें मोठे कौतुक वाटलें ! आपल्यासारखा बंदुक मारणारा जगांत कोणी नाहीं, अशी त्याची बालंबाल खात्री झाली ! बादशहाच्या तबूंत रात्रीं बारा वाजेपर्यंत नाचगाणें झालें. बारा वाजल्यानंतर बादशहा आपल्या शयनगृहांत गेला. नंतर खास दरबारचे सभासदहि आपापल्या निर्दिष्ट तंबूंत जाऊन निजले.

पहांटे तीन वाजायाच्या सुमारास छावणीजवळ मोठी गडबड झाली. ही गडबड आणि आरडाओरड कां होत आहे, हें कोणालाच समजेना ! राजा दर्शनसिंह आपल्या शिपायांसह बादशहाच्या तंबूकडे जातांना दिसला. पहातां पहातां दर्शन-सिंहाचे शिपाई बंदुकांचें बार काढून गोळ्यांचा वर्षाव करूं लागले. त्यावेळीं चोहोंकडे दाट काळोख होता. कोण कोणावर बंदुक झाडतो आहे, हें बादशहाच्या इंग्रज दोस्तांस कळेना. जिकडे तिकडे एकच गोंधळ उडाला ! परंतु लवकरच सगळयांनां समजून आलें कीं, बेगमांच्या तबूंत चोर शिरले आहेत. कांहीं जणींचीं नाकें कापून त्यांच्या नाकांतील दागिने चोरांनीं पळविले. कांहीं जणींचे कान तोडून त्यांच्या कानांतील अलंकार त्यांनीं हिसकावून नेले. बादशहाच्या कित्येक दासी आणि मुताही स्त्रिया यांनांहि चोरानीं पळवून नेलें ! बादशहानें ताबडतोब मेणे आणि हत्ती तयार करून आणावयास हुकूम केला. हत्ती आणि मेणे येऊन दाखल होतांच बरोबरचें सामानसुमान तसेंच टाकून उरलेल्या सर्व स्त्रियांस बरोबर घेऊन बादशहा ताबडतोब लखनौकडे निघून गेला ! राजा दर्शनसिंह, हकीम मेहेंदी अल्लीखां, नायब दिवाण राजा मेवारामसिंह आणि नबाबाचे इंग्रज दोस्त सकाळ होईपर्यंत तेथेच होते. सकाळ होतांच बेगमांच्या तबूंत मूल्यवान सामान चोहोंकडे अस्ताव्यस्त पसरलें आहे असे त्यांनां दिसून आलें.

सकाळीं मेहेंदी अल्लीखानें चोरांनां पकडून आणण्याबद्दल हुकूम फर्माविला. सेनापती राजा दर्शनसिंह, यानें चोरांच्या शोधासाठीं चोहोंकडे आपल्या हाताखालचे लोक पाठविले. रात्रीच्या रात्रींच चोरांनीं पोबारा केला होता. त्यांचा पत्ता लागणें कठीण होतें; परंतु खरे चोर सांपडल नाहींत म्हणून दर्शनसिंहाचे लोक थोडेच निराश होणार होते ! जवळपासच्या गांवांतले लोक पकडून त्यांनीं लखनौला पाठवून दिले. सहा महिनेपर्यंत जे रोगी लोक अंथरूणाला खिळून राहिले होते, तेच पहिल्या प्रथम पकडले गेले. " यांनां पकडतांना जी मारपीट करावी लागली त्यामुळेंच हे असे अर्धमेले झाले आहेत; यांनींच काल रात्रीं दरोडा घातला," असें दर्शनसिंहानें आणि मेहेन्दी अल्लीखानें बादशहाला सांगितलें. बादशहानें सर्वांनां ताबडतोब फांशीची शिक्षा दिली. बिचारे पन्नासपाऊणशें निर्दोष लोक बादशहाच्या या हुकुमानें नाहक मारले गेले !

याप्रमाणें शिकार आटोपली. पुनः बादशहाला करमणुकीची वाण भासूं लागली. त्याचें चित्त कशावरहि लागेना. पुनः खास दरबारांतील बादशहाच्या दोस्तांनां चिंता पडला ! बादशहाकरितां दुसरी एखादी करमणूक ते शोधून काढणार, तों गव्हर्नर जनरल लार्ड वुइल्यम बेंटिक लखनौंत येऊन दाखल झाला.

## प्रकरण १७ वें.

# बुध राजा आणि बृहस्पति मंत्री.

* Govern leniently and send more money. Practise strict justice and moderation towards neighbouring powers, and send more money. This is in truth the sum of all the instructions that Hastings ever received from home. Now these instructions mean—Be the father and oppressor—Be just and unjust, moderate and rapacious.

—*Decoitee in Excelsis or the Spoliation of Oude.*

इसवी सन १८२८ सालांत हिंदुस्थानांत नवीन युगास प्रारंभ झाला. लार्ड वुइल्यम बेंटिकची गव्हर्नर जनरलच्या जागेवर नेमणूक होऊन या साली तो हिंदुस्थानांत आला. सर चार्लस थियोफिलस मेटकाफ हा गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलमधील एक सभासद असून बेंटिकचा मुख्य मसलतगार होता. बेंटिक हिंदुस्थानांत आल्यापासून ईस्ट इंडिया कंपनीच्या राजशासनपद्धतींत हळुहळु फेरफार होऊं लागला.

ईस्ट इंडिया कंपनी ह्मणजे अर्थलोभी व्यापारी बनियांची मंडळी ! गेल्या दोन शतकांत ती छलानें, बलानें आणि कौशल्यानें हिंदुस्थानांतून जळूप्रमाणें एकसारखा पैसा शोषून नेत होती. इसवी सन १७६५ त ईस्ट इंडिया कंपनीला बंगालची दिवाणगिरी मिळाल्यानंतरहि प्रजेच्या सर्वस्वाची लूट करण्यास ती कांहीं कमी करित नव्हती. तिला प्रजेची उन्नति करण्याची इच्छा नव्हती; इतकेंच नव्हे, तर भरतखंडांतील लोकांनां चिरकाल अज्ञानांधकारांत ठेवण्याविषयीं ती नाना-

---

* सौम्यपणानें राज्यकारभार करून अधिक पैसे पाठवा. शेजारच्या राजेरजवाड्यांशीं चोख न्यायानें आणि नेमस्तपणानें व्यवहार ठेवा, पण पैसे अधिक पाठवा. राज्यकारभाराविषयीं हेस्टिंग्सला इंग्लंडाहून वारंवार ज्या सूचना येत असत, त्या सर्वांचें सार खरोखर ह्मटलें ह्मणजे हेंच होय ! या सर्व सूचनांचा अर्थ इतकाच होतो कीं, पित्याप्रमाणें वर्तन करा आणि जुलूमहि करा—न्यायी व्हा आणि अन्यायानेंहि वागा ! नेमस्तपणानें वागा आणि पीडनाचीहि पराकाष्ठा करा !

—कुबेरनगरींतील दरोडा अथवा अयोध्येची लूट.

प्रकारच्या युक्त्या योजित असे. महात्मा वुइलबरफोर्स यानें इग्लंडच्या पार्लमेंटांत हिंदुस्थानांत इंग्रजी शिक्षण चालू करण्याविषयीं जेव्हां प्रस्ताव केला, तेव्हां ईस्ट इंडिया कंपनीच्या डिरेक्टरांनी त्याचा उद्देश हाणून पाडण्यासाठीं जिवापाड मेहनत केली. हिंदुस्थानच्या लोकांचे डोळे उघडले ह्मणजे हिदुस्थानांत आपणाला प्रभुत्व गाजविण्यास मार्ग रहाणार नाही, असें त्यांनीं स्पष्टपणे सांगितले.

इंग्लंडांतील दयाळु ख्रिश्चन पादरी लोकांनीं हिंदुस्थानांत ख्रिस्ति धर्माचा प्रसार करण्याविषयीं ईस्ट इंडिया कंपनीच्या डिरेक्टरांची अनुमति विचारिली, तेव्हां डिरेक्टरांनी त्यांनां उत्तर दिलें कीं, "हिंदुस्थानांत चोर आणि दरोडेखोर यांनां पाठविण्यास आम्ही कबूल आहों; परंतु ख्रिस्ती धर्मप्रसारकांनां पाठविण्यास कबूल नाहीं. ख्रिस्ती धर्मप्रसारकांच्या कर्मांनीच अमेरिका स्वतंत्र झाली!"

परंतु लार्ड वुइल्यम बेंटिकची कारकिर्द सुरू झाल्यापासून ईस्ट इडिया कंपनीनें आपला बनियाचा पोषाक टाकून देण्यास हळुहळू आरंभ केला. देशाच्या राज्य-कारभारांत हळुहळू देशी लोकांचा बेंटिकच्या कारकिर्दीपासूनच प्रवेश होऊं लागला. लॉर्ड वुइल्यम बेंटिक हा मोठा धार्मिक, दयाळु आणि कर्तव्यपरायण होता. त्याचा मुख्य मसलतगार मेटकाफ हाहि न्यायपरायण, धार्मिक आणि परोपकारी होता. हिंदुस्थानांतील प्रजेच्या दुःस्थितीकडे त्यांची दृष्टि गेली.

१८३१ सालच्या आगस्ट महिन्यांत लॉर्ड वुइल्यम बेंटिक लखनौत येऊन पोहोचला. त्याच्या आगमनानिमित्त नगर शृंगारलें होतें. चोहोंकडे मोठा उत्सव सुरू झाला होता. गव्हर्नर जनरलच्या स्वागतार्थ गाणेबजावणें, कलावंतिणींचा नाच, पशुपक्ष्यांची युद्धें यांची योजना झाली होती. आपले वैभव बेंटिकला दाखविण्याची एकहि संधि बादशहानें जाऊं दिली नाहीं. आपल्या आगमनोत्सवाकरितां चाळीस लाख रुपये खर्च व्हावयाचे आहेत, असें बेंटिकने लखनौला आल्याबरोबर ऐकिलें. राज्यांतील प्रजेला दिवसांत एक मुठभरहि अन्न मिळत नाहीं; चोर आणि दरोडेखोर यांच्या अत्याचारानें देशाची धुळधाण झाली आहे; आणि आपल्या आगमना-निमित्त बादशहा चाळीस लाख रुपये खर्च करतो, हें पाहून लॉर्ड वुइल्यम बेंटिकला बरें वाटलें नाहीं या गोष्टीसंबधीं त्यानें बादशहाचा उघड उघड निषेध केला.

बेंटिकच्या आगमनानिमित्त बादशहानें मोठ्या थाटाचा समारंभ करविला होता; परंतु बेंटिक त्या उत्सवांत अगदीं विरक्तभावानें वागला! बादशहाच्या नाचरंगांत मिसळण्याचें त्यानें साफ नाकारलें. कलावंतिणींच्या नाचगाण्याचा त्याच्या

धर्मप्रिय स्वभावाला तिटकारा असल्यामुळें ते सगळे अश्लील प्रकार अर्थात् बंद राहिले! बादशहाच्या अत्यंत आग्रहावरून गव्हर्नर जनरल एक दिवस पशूंची युद्धें पाहण्यास मात्र गेला होता. बेंटिक लखनौत होता, तोंपर्यंत रेसिडेन्सींत बसून अयोध्येच्या वर्तमान स्थितीची त्यानें सूक्ष्मपणें माहिती करून घेतली. इंग्रजांचा अयोध्येत प्रवेश झाल्यापासूनच्या पन्नास वर्षांच्या अयोध्येच्या इतिहासाची त्यानें उत्तम रीतीनें माहिती करून घेतली.

ईस्ट इंडिया कंपनीनें अयोध्येचा राज्यकारभार आपल्या हातीं घेण्याचा विचार केला होता; परंतु मेटकाफ् आणि वुइल्यम बेंटिक यांनां हा विचार सम्मत झाला नाहीं. अयोध्येची सांप्रतची अराजकता आणि प्रजापीडन हें ईस्ट इंडिया कंपनीच्या भयंकर अर्थशोषणाचें अवश्यभावी फल होय, असें त्यांनां उघड दिसून आलें.

केवळ अयोध्येंतील प्रजेचे दुःख निवारण करण्यासाठीं भूतदयेनें प्रेरित होऊन ईस्ट इंडिया कंपनीच्या डिरेक्टरांनीं अयोध्येचा राज्यकारभार आपल्या हातीं घेण्याचा प्रस्ताव केला होता, असें मात्र नाहीं. असफ उद्-दौल्याच्या सावकारांनीं इंग्लंडांत मोठी गडबड करून सोडली होती. अयोध्येचा पूर्वीचा वजीर नबाब असफ उद्-दौला याने वॉरन हेस्टिंग्सच्या कारकिर्दीत ईस्ट इंडिया कंपनीच्या पैशांच्या मागण्या पुऱ्या करण्याकरितां पुष्कळ सावकारांजवळून मोठमोठ्या रकमा कर्जाऊ काढल्या होत्या. असफ-उद्-दौल्याच्या मृत्यूनंतर सादतअली अयोध्येच्या गादीवर आला. अर्थात्, असफ-उद्-दौल्याच्या सावकारांनीं त्याच्याकडे पैशाची मागणी केली. परंतु असफ-उद्-दौल्याचे कर्ज फेडण्यासंबधी सादतअलीनें साफ कानांवर हात ठेविले! त्यानें सावकारांनां स्पष्टपणें सांगितलें "असफ-उद्-दौल्याच्या कर्जाबद्दल मी तुमची एक पैहि देणें लागत नाहीं!" सादतअलीच्या या उत्तराने बिचारे सावकार घाबरून गेले. या प्रकरणाचा विचार व्हावा, ह्मणून सर्व सावकारांनीं तत्कालीन गव्हर्नर जनरलची प्रार्थना केली; परंतु गव्हर्नर जनरलनेंहि या प्रकरणांत हात घालण्याचें साफ नाकारलें! तेव्हां सावकारांनीं इंग्लंडांत आपल्यातर्फे लोक पाठवून कोर्ट ऑफ डिरेक्टरकडे या प्रकरणासंबंधी तक्रार नेली. कोर्ट ऑफ डिरेक्टरकडूनहि सावकारांनां न्याय मिळाला नाहीं! नंतर इंग्लंडांतील ब्यारिस्टरांनीं कोर्ट ऑफ किंग्स बेंचपुढें ईस्ट इंडिया कंपनीवर फिर्याद करण्यास सावकारांनां सल्ला दिला. त्याप्रमाणें त्यांनीं कोर्ट ऑफ् किंग्स बेंचकडे ईस्ट इंडिया कंपनीवर दावा लाविला.

सावकारांच्या या फिर्यादीमुळें इंग्लंडांत मोठी गडबड उडाली. पुष्कळ लोक म्हणूं लागले कीं, लौकरच कोर्ट ऑफ किंग्स बेंच ईस्ट इंडिया कंपनीवर दरखास्त देऊन अयोध्येच्या नबाबाकडून पैसे वसूल करून सावकारांनां देवविण्याबद्दल कंपनीला हुकुम करील. या चर्चेनें ईस्ट इंडिया कंपनीच्या डिरेक्टरांनांहि भय वाटूं लागलें, व यासाठीं अयोध्येचा राज्यकारभार अगोदरच आपल्या हातीं घेण्याचा यांनीं विचार केला.

परंतु गव्हर्नर जनरल लॉर्ड वुइल्यम बेंटिक आणि त्याचा मुख्य मंत्री सर चार्लस थियोफिलस मेटकाफ यांनां डिरेक्टरांचा हा विचार मुळींच पसंत पडला नाहीं. त्यांच्या धर्मभीरु अंतःकरणांस या अन्यायाला अनुमोदन देववेना. ते म्हणाले "ईस्ट इंडिया कंपनीचा राज्यकारभार सर्वस्वी इंग्रज लोकांच्याच हातीं आहे. हिंदुस्थानच्या लोकांनां राज्यकारभारापासून सरसकट दूर राखण्यांत आलें आहे. अशा स्थितींत प्रजेची उन्नति होण्याची आशा नाहीं आपणास जर प्रजेची उन्नति करतां येत नाहीं, तर प्रजेचा शासनभार हातीं घेण्यांत काय अर्थ आहे? देशी राजेरजवाड्यांची प्रजा सदासर्वदा आपल्या जीविताच्या आणि संपत्तीच्या रक्षणाविषयीं साशंक असते, आणि ईस्ट इंडिया कंपनीच्या राज्यांतील प्रजा पहारेकऱ्यांनीं परिवेष्टित अशा बंदीखान्यांत वास करते!"

अशा प्रकारच्या उदार राजनीतीचें अवलंबन करून लॉर्ड वुइल्यम बेंटिकनें अयोध्येच्या बादशहाला पदच्युत केलें नाहीं; परंतु अयोध्येची साप्रतची स्थिति अत्यंत शोचनीय झाली होती. कोर्ट आफ् डिरेक्टरांच्या विचाराविरुद्ध वागल्यामुळें लॉर्ड वुइल्यम बेंटिकनें आपल्या मस्तकावर मोठीच जबाबदारी घेतली होती! अयोध्येच्या प्रस्तुतच्या अराजकतेनें गांजलेल्या प्रजेकडून बंड होण्याची क्षणोक्षणी भीति होती; आणि बंड झालें असते, तर बेंटिकला खात्रीनें पदच्युत व्हावें लागलें असतं, यांत शंका नाहीं

लखनौंत असतांना लॉर्ड वुइल्यम बेंटिक नासिरुद्दिन बादशहाशीं विशेष खुल्या दिलानें बोललाचालला नाहीं. प्रस्तुतच्या अवस्थेत राज्यकारभार कोठल्या रीतीनें चालविला पाहिजे, याबद्दल त्यानें वजीर हकीम मेहेन्दी अल्लीखां याच्याशीं विशेष रीतीनें चर्चा केली, आणि सांप्रतच्या स्थितींत अयोध्येच्या नबाबाला पदच्युत व्हावयाचा किती संभव आहे, हें त्याला नीट समजावून सांगितलें. मेहेन्दी अल्लीखां राज्यकारभार उत्तम रीतीनें चालवील, याविषयीं बेंटिकची पूर्ण खात्री होती.

लखनौंतून निघावयाचे वेळीं बेंटिकनें नासिरुद्दीनला स्पष्टपणें कळविलें कीं, दोन वर्षांत जर अयोध्येंतील हल्लींची अराजकता मोडली नाहीं, आणि चोरांच्या आणि दरोडेखोरांच्या भयंकर अत्याचारांचें सर्वस्वी निर्मूलन झालें नाहीं, तर ईस्ट इंडिया कंपनीला बादशहाला अयोध्येच्या गादीवरून पदच्युत करणें भाग पडेल !

लॉर्ड वुइल्यम बेंटिक लखनौंतून निघून गेल्यावर सुमारें महिना सवा महिना नासिरुद्दिन हैदर अयोध्येचा राज्यकारभार स्वतः पाहूं लागला होता. जवळ जवळ दोन महिनेपर्यन्त गव्हर्नर जनरलने त्याला पदच्युत करण्याविषयीं घातलेली भीति त्याच्या मनांत जागृत होती त्यामुळें त्या मुदतीपर्यंत नासीर कलावंतिणींचीं गाणीं वगैरे अश्लील रंगात विशेषसा गढून गेला नाहीं. राज्यांत घडलेल्या मोठमोठ्या गुन्ह्यांचा न्याय तो स्वतः करूं लागला. मुकद्दम्यांचा निकाल दिल्यावर प्रत्येक वेळीं तो सर्फराजखांला विचारित असे "विलायतेचा बादशहा असाच न्याय करतो ना?" सर्फराजखांहि हात जोडून हिः हिः करून ह्मणे "इंग्लंडच्या राजाची न्याय करण्याची पद्धत थेट मुलके जामानियांच्या पद्धतीप्रमाणेंच आहे!" सर्फराजखांच्या या उत्तरानें नासिरुद्दिनला स्वर्ग दोन बोटें उरल्यासारखे होई !

परंतु जित्याची खोड मेल्याशिवाय थोडीच जाणार आहे ! दोन महिन्यांच्या आंतच बादशहाची स्वारी मूळ पदावर आली! **कीं तोडिला तरु फुटे अणखी भरानें** ' या न्यायानें नासीरच्या चैनरंगास आतां दुप्पट जोर आला. एकदा भर दरबारांत नाचगाणें चाललें असतां सर्फराजखांनें वजीर हकीम मेहेन्दी अल्लीखांची पगडी त्याच्या डोकीवरून उडवून दिली ! एका हलकट न्हाव्यानें आपल्यासारख्या खानदान घराण्यांतील वजिराची पगडी उडवून दिल्याचा अपमान मेहेन्दी अल्लीखांला सहन झाला नाहीं. तो रागानें लाल होऊन दरबारांतून संतापून निघून गेला जातां जातां मेहेन्दी अल्लीखां ह्मणाला "हा बादशहाचा दरबार नाहीं, लहान पोरांचा खेळायचा आखाडा आहे !"

वजीर मेहेन्दी अल्लीखांच्या या शब्दांनीं बादशहालाहि फार राग आला ! त्यानें तेथल्या तेथेंच मेहन्दी अल्लीखांला वजीराच्या जागेवरून दूर केलें; आणि नबाब रोषन उद्-दौला याला त्याच्या जागेवर नेमिलें.

हकीम मेहेन्दी अल्लीखां मनांत समजत होता, कीं, रेसिडेंट साहेबांला संतुष्ट ठेविलें ह्मणजे आपणाला पदच्युत व्हावयाची मुळींच भीति नाहीं! परंतु सर्फराजखां या वेळीं अयोध्येचा खरा बादशहा होता ! ज्याच्यावर त्याची अवकृपा झाली

त्यांची दुर्दशा उडावयाचीच ! सर्फराजखांच्या मदतीनें बादशहानें नबाब रोषन-उद्-दौला याचीच शेवटीं वजिरातीच्या उच्च पदावर नेमणूक केली.

सर्फराजखांच्या कृपेनें नूतन वजीर नबाब रोषन-उद्-दौला हा बादशहाच्या खास दरबारचाहि सभासद झाला. नासीरच्या मुखांतून एखादें मौजेचे वाक्य निघतें न निघतें तों सर्वांच्या आधीं रोषन-उद्-दौला हि: हि: करून हंसूं लागे ! त्याच्या योगानें नासीरला दर वेळीं मूठभर मांस चढल्यासारखें होई. आपल्या विद्वत्तेचें मर्म एवढ्या दरबारांत फक्त नबाब रोषन-उद्-दौला यालाच काय तें कळतें, तोच खरा रसिक आहे, अशी बादशहाची पूर्ण खात्री झाली.

परंतु रोषन-उद्-दौला वजीर झाल्यामुळें राजा दर्शनसिंहाची सगळी आशा नष्ट झाली. आपल्यास वजिरात मिळेल या आशेनें दर्शनसिंहाने एवढा व्यूह रचून पंजाबाहून मान्ना आणि नूना या प्रसिद्ध कंचनींना आणलें होतें. मान्ना जर आजारी पडली नसती तर आपणच वजीर झालों असतों, अशी त्याची पक्की खात्री होती. मान्नाचा आजार, गव्हर्नर जनरल लॉर्ड वुइल्यम बेंटिक यानें कंचनींच्या नाच-गाण्यासंबंधीं दर्शविलेला तिटकारा, हीं दर्शनसिंहाच्या उच्चपदप्राप्तीच्या मार्गांत कंटकरूप होऊन राहिलीं होतीं. मान्ना अझूनहि अंथरुणाला खिळूनच होती. आतां दुसरा कांहीं इलाज नाहीं असें पाहून दर्शनसिंह एकट्या नूनालाच नासीरच्या खास दरबारांत घेऊन जाण्याची संधि पाहूं लागला नूतन वजीर रोषन-उद्-दौला याच्याविषयीं दर्शनसिंहाच्या मनांत भयंकर द्वेष उत्पन्न झाला.

इकडे सर्फराजखां आणि नबाब रोषन-उद्-दौला हे दोघेहि राजा दर्शनसिंहाला त्याच्या जागेवरून काढून टाकण्याविषयीं नानाप्रकारचे उपाय योजूं लागले !

## प्रकरण १८ वें.

# कोळ्यानें पसरलेलें अपूर्व जाळें.

* "I will build you a house of gold and you shall be my Padsha Begum some day, Nuna.—" —*W. Knighton.*

फरीदबक्ष राजवाड्यापासून सुमारें एक कोस अंतरावर गोमतीनदीच्या तीरावर एका बगीच्यांतील हवेलींत मान्ना, नूना आणि त्यांच्याबरोबर असणारी ती म्हातारी, हीं रहात असत, हें मागें सांगितलेंच आहे या सत्कुलोत्पन्न रमणीद्वयाचा काश्मिरी नायकिणींच्या नांवानें उल्लेख करण्याचें आपणाला आतां कारण नाहीं. अतःपर आपण मान्नाला मानकुमारी आणि नूनाला कैलासेश्वरी या नांवांनींच ओळखूं.

बगीच्याच्या सभोंवार कोट होता. बगीच्यांत नानाप्रकारचीं फुलझाडें व फळझाडें होतीं. या बगीच्याच्या मध्यभागी एक टुमदार हवेली होती. हवेलीच्या एका खोलींत एका बिछान्यावर मानकुमारी रुग्णावस्थेंत पडली होती. कैलासेश्वरी तिच्या जवळ एकसारखी रुदन करित बसली होती. कैलासेश्वरीला रडतांना पाहून मानकुमारीच्या नेत्रांतूनहि अविरल अश्रुप्रवाह सुरू होता.

कैलासेश्वरी रडत रडत म्हणाली "ताई! तुझीमाझी ही शेवटचीच भेट ! आज मी तुझा जन्माचा निरोप घेऊन जाणार! आज संध्याकाळीं तो मेला मला बादशहाच्या दरबारांत घेऊन जाणार, असं मीं त्या थेरडजिवळून ऐकलं."

मानकुमारीला बोलाण्यालासुद्धां शक्ति राहिली नव्हती. अश्रुपूर्ण नेत्रांनीं क्षीण स्वरानें ती म्हणाली "परमेश्वराचं स्मरण कर—"

कैलासेश्वरी म्हणाली "ताई! मला आत्महत्या करायला मुळींसुद्धां भय वाटत नाहीं; पण तुला या अवस्थेत इथ अशी टाकून जायला माझ्या अगदीं जिवावर येतं! ताई, तुला मी एकटी कशी टाकून जाऊं? शेवटीं तुझ्या तोंडांत एक थेंब तरी पाणी घालील असं इथं कोणीसुद्धां नाहीं!"

दोघीजणीहि पुनः स्फुंदस्फुंदून रुदन करूं लागल्या. कांहीं वेळानें कैलासेश्वरी म्हणाली "ताई! या साऱ्या जगांत माझं असं म्हणायला कुणी नाहीं, असं मला पूर्वी

---

* "नूना! तुझ्यासाठीं मी सुवर्णमंदिर निर्माण करीन आणि एक दिवस तूं माझी मुख्य बेगम होशील!" —डब्ल्यू. नाइट.

वाटत होतं; पण पुढं तुझी दैवयोगानं गांठ पडली अन् तूंच माझ्या आवडत्या दादाची बायको असं समजलं. दादा माझ्यासाठीं शोक करित चोहोंकडे वणवण हिंडत आहे असं तुझ्याकडून मला समजल्यापासून मला फार दुःख वाटे; त्यांतूनहि तूं आतां मला सोडून चाललीस! माझं दुःख मी आतां कुणाला सांगूं?"

मानकुमारी आपला शोकावेग आवरून कैलासेश्वरीच्या गळयाला धरून उठून बसली. थोडा वेळ दोघीजणीहि अगदीं स्तब्ध होत्या. स्थिरचित्तानें विचार करून कांहीं वेळानें मानकुमारी म्हणाली "आतां कपट्यांशीं कपटानंच वागलं पाहिजे; त्याशिवाय गत्यंतर नाही! मी तुला एक युक्ति सांगत्ये. ईश्वराच्या कृपेनं त्या युक्तींत जर यश आलं, तर या संकटांतून आपली खात्रीनं सुटका होईल."

"कोणती ती युक्ति?"

"तुला आतां इथून बादशहाकडे घेऊन जातील. बादशहानं तुला आपली विलासदासी होण्याविषयीं गोष्ट काढली, कीं, त्या मेल्याला तू सांग कीं 'मी दर्शनसिंहाची दासी आहें. एक यजमान जिवंत असतां मला दुसऱ्याची दासी होतां येणार नाहीं!' कैलासेश्वरी! कुलकन्यकेला आपण अमक्याची दासी आहों असं बोलणं जिवावर येईल हें मला ठाऊक आहे पण करायचं काय? या युक्तिशिवाय आपली सुटका होणार नाहीं अन् त्या मेल्याचा सत्यनाश करायला काय वाटेल तें आपल्याला केलं पाहिजे!"

पण मानकुमारीच्या भाषणाचा अर्थ कैलासेश्वरीला कांहीं कळेना! कैलासेश्वरीचें वय चौदा किंवा फार तर पंधरा वर्षांचें असेल या जगांतील व्यवहाराच्या छक्यांपंज्यांची त्या भाबड्या पोरीला ओळखसुद्धां नव्हती मानकुमारीनें सांगितलेल्या युक्तीचा ती बराच वेळ विचार करित होती; परंतु तिच्या डोक्यांत कांहीं प्रकाश पडेना. कांहीं वेळाने तिनें मानकुमारीला विचारलें "काय म्हणत्येस ताई? तो मेला दर्शनसिंह का माझा यजमान?"

त्या अवस्थेंतहि कैलासेश्वरीच्या बोलण्याचें मानकुमारीला हंसूं आलें. हंसत हंसत ती म्हणाली "वेडे पोरी! माझ्या म्हणण्याचा असा का अर्थ? तूं आपली मीं सांगितलं तसं बादशहाजवळ बोल, म्हणजे झालं."

"दर्शनसिंह माझा यजमान असं बादशहाजवळ सांगितलं म्हणजे काय होईल?"

"काय होईल तें नाहीं तुला आतां कळायचं! कदाचित या युक्तीनं आपली सुटका होईल, कदाचित नाहींहि होणार! पण मीं जसं सांगितलं आहे तसं मात्र तूं बादशहाला सांग."

कैलासेश्वरी कांहीं वेळ विचार करून ह्मणाली "पण बादशहाच्या लोकांनीं मला जबरदस्तीनं धरून रंगमहालांत नेलं, तर मी काय करूं ?"

" मग दुसरं काय करायचं ? तुझ्या धर्मसंरक्षणाचा उपाय तुझ्याजवळ आहेच! तसा कांहीं प्रकार दिसला तर तत्क्षणीं उरांत जंबिया खुपसून आपली सुटका करून घे. "

मानकुमारीचें हें भाषण पुरें होतें न होतें तोंच राजा दर्शनसिंहाचे लोक मेणा घेऊन बागेंत आले. ह्मातारीनें कैलासेश्वरीला मेण्यांत बसावयास सांगितले. डोळे पुशित पुशित कैलासेश्वरी मेण्यांत जाऊन बसली. फांशीची शिक्षा झालेला अपराधी ज्या दुःखपूर्ण हृदयानें वधस्थानाकडे जातो, तशाच वेदनापूर्ण हृदयाने कैलासेश्वरी आज बादशहाच्या फरीदबक्ष राजवाड्याकडे चालली होती !

सुमारे एक तासाने मेणा फरीदबक्ष राजवाड्यांत पोहोंचला. कैलासेश्वरीला मेण्यांतून उतरवून बादशहाच्या दासींनीं एका प्रशस्त महालांत नेलें. तेथें त्यांनीं तिला विविध मूल्यवान वस्त्रालंकारांनीं सजविली. कैलासेश्वरीनें त्या वस्त्रभूषणांकडे एकवारहि पाहिले नाही! एखाद्या पुतळीप्रमाणे ती निश्चल उभी होती. कांहीं वेळानें दुसऱ्या सहा दासींनीं कैलासेश्वरीला बादशहाच्या नाचरंगाच्या दिवाणखान्यांत नेलें.

नासिरुद्दिन हैदर कैलासेश्वरीचें रूप पाहून अत्यन्त मोहित होऊन गेला. आजपर्यंत अशी दिव्यलावण्यसंपन्न रमणी त्यानें कधींहि पाहिली नव्हती. अनिमिष लोचनांनीं नासीर कैलासेश्वरीच्या मुखाकडे किती वेळ तरी एकसारखा पहात होता, तरी त्याची तृप्ति होईना! अझूनपर्यंत अश्लील नाचरंगाला आरंभ झाला नव्हता, म्हणून बादशहाच्या खास दरबारांतील प्रचलित नियमाप्रमाणें त्याचे इंग्रज दोस्त डोकीवर ' हॅट ' (टोप्या) घालून बसले होते; परंतु तितक्यांतल्या तितक्यांत संधि साधून त्यांपैकीं एकदोघेजण मधून मधून कैलासेश्वरीच्या मुखाकडे हळूच दृष्टि फेंकित होते! त्या सहा दासींपैकीं दोघीजणी—एक बादशहाच्या उजवीकडे आणि एक डावीकडे अशा—उभ्या राहून त्याला वारा घालित होत्या. बाकीच्या चौघीजणी खास दरबारच्या नियमाप्रमाणें बादशहाच्या भोंवतीं बसल्या होत्या! नासीर बसला होता त्या स्थानापासून पांचसहा हातांवर कैलासेश्वरी बसली होती. खास दरबारचा मुख्य मंत्री सर्फराजखां बादशहाच्या जवळच बसला होता. त्याला बादशहानें खूण करतांच कैलासेश्वरीला गायनास आरंभ करण्यास त्यानें आज्ञा केली. राजवाड्यांत आल्यापासून कैलासेश्वरी दुःखानें अगदीं चूर होऊन गेली होती.

सर्फराजखांची आज्ञा होतांच दुःखाचा आणि शोकाचा उमाळा कसा तरी दाबून ती गाऊं लागली:—

**“ गगरी मोरी भरन ना दे!**
**धीट लंगरा मधु आजे!**
**गगरी मोरी भरन ना दे!**
**जब देखुं तब ठाडो जमुनापे,**
**अब ना राहूं तोरी नगरि;**
**गगरी मोरी भरन ना दे!**

कैलासेश्वरींचें गायन पुरे होण्यापूर्वींच नासीरनें मदिरेचे दोनतीन प्याले झोंकून दिले होते! मदिरेनें थोडासा उत्तेजित होऊन तो ह्मणाला “ शाबास, शाबास! नूना, शाबास! आजच्या रात्रीच्या गायनाबद्दल तुला एक हजार मोहरा बक्षीस दिल्या आहेत! ”

नासीरने तिला आणखी एक चीज गावयास हुकूम केला. कैलासेश्वरी पुनः गाऊं लागली:—

**सब मिलके मालनीया बंधन बांधोरे! । अरे हाऽऽऽरे! ।**
**मंमद्सा प्यारिके घरकाज! । धृ० ।**
**सदा रंगिल ताननसो बधावो गावो मायीरि सबसाहितसो**
**आये । बंधन बांधोरे! । अरे हाऽऽऽरे! ॥ १ ॥**

बादशाहाने पुनः सुरेचे दोन प्याले फस्त केले! मदिरेच्या प्रभावानें तो आतां एकदम बेहोष होऊन गेला! कैलासेश्वरीला धरावें म्हणून तो आपल्या जागेवरून उठला; परंतु सुरेचा अंमल अधिक झाल्यामुळें तो दोन पावलें गेला नाहीं तोंच झोंक जाऊन समोरच्या एका दासीच्या अंगावर धाडकन् पडला! ती दासी कैलासेश्वरीच आहे असें समजून तिच्या गळ्यांत हात घालून बादशहा “ मेरी नूना! मेरी प्यारी नूना! ” असेंच एकसारखें मोठमोठ्यानें ओरडूं लागला! बादशहाची अशी दुर्दशा पाहून बाकीच्या दासींनी नेहमींप्रमाणें त्याला धरून त्याच्या महालांत नेलें. त्या रात्रीचा नाचरंग याप्रमाणें पुरा झाला! खास दरबारांतील दोस्त आपापल्या ठिकाणीं निघून गेले. कैलासेश्वरी बाहेर येतांच दर्शनसिंहाचे लोक तिला मेण्यांत बसवून गोमतीतीरावरील बगीच्यांत घेऊन गेले.

रात्रीं मुक्कामावर पोहोंचल्यावर कैलासेश्वरीनें मानकुमारीला झालेली सर्व हकीगत सांगितली. पुढें काय करावें याबद्दल दोघीजणी मिळून विचार करूं लागल्या. मानकुमारी ह्मणाली "सुरेच्या निशेनं उन्मत्त होऊन कधीं बादशहा तुला धरूं लागला, तर त्यावेळीं माग सर. त्याला आपल्या अंगाला स्पर्श करूं देऊं नकोस. स्पर्श करावयाचे पूर्वीं तुला जर तो कांहीं अधिक कमी ह्मणाला, तर मी तुला सांगतल्याप्रमाणें एवढच ह्मण की 'मी दर्शनसिंहाची दासी आहे.' "

दुसऱ्या दिवशी पुनः कैलासेश्वरीला राजवाड्यांत नेण्यांत आलें. कैलासेश्वरीला पाहून बादशहा अत्यन्त संतुष्ट झाला, ही बातमी ताबडतोब दर्शनसिंहाच्या कानांवर गेली. त्याबरोबर त्याची मुख्य वजीर व्हावयाची आशा पुनरपि उत्तेजित झाली! पुनः तो मनोरथरूपी मंदिराचे मजल्यावर मजले चढवूं लागला. नबाब रोषन-उद्-दौला-बेग अगदींच मूर्ख आहे! त्याला वजीराच्या जागेवरून हुसकावून लावायला आतां आपणाला कितीसा वेळ लागणार आहे? तसेंच, त्या सर्फराजखां न्हावगड्याची उचलबांगडी करावयालाहि आपल्याला आतां फारसा अवकाश लागणार नाहीं, असें दर्शनसिंह मनांतल्या मनांत मांडे खाऊं लागला! परंतु आपणाला गाडण्याकरितां किती भयंकर खड्डा खणला जात आहे, याची दुष्ट दर्शनसिंहाला कल्पनाहि नव्हती!

पूर्व दिवसाप्रमाणें आजहि कैलासेश्वरीला बादशहाच्या खास दिवाणखान्यांत जावें लागलें. बादशहानें आज अधिक मदिरापान केलें नव्हतें. आज स्वारी पूर्वीपासून सावध होती. आज कैलासेश्वरीला रंगमहालांत घेऊन जावयाचें, असा बादशहानें अगोदरच निश्चय केला होता; ह्मणून त्या रात्रीचा नाचरंग फार वेळ-चालला नाहीं सुमारें एक तासपर्यंत नाचगाणें होतें न होतें तों बादशहाच्या हुकुमानें सर्फराजखांशिवाय खास दरबारचे इतर सर्व सभासद तेथून निघून गेले. सर्फराजखांनें कैलासेश्वरीला बादशहाच्या आसनाजवळ जाऊन बसण्यास सांगितलें; परंतु कैलासेश्वरी आपल्या जागेवरून उठली नाहीं. पवनविकंपित वल्लरीप्रमाणें तिचें सर्व शरीर नखशिखांत कांपूं लागलें! कैलासेश्वरी आपणाकडे येत नाहींसें पाहून बादशहाच आपल्या आसनावरून उठून तिच्याकडे जाऊं लागला. तिच्या जवळ येऊन बादशहा आतां तिचा हात धरणार, तों ती झटकन् मागें सरली. त्याबरोबर बादशहाहि तिला धरण्याकरतां पुढें सरला. कैलासेश्वरी त्वरेनें दरवाजाकडे जाऊं लागली. नासीर तिच्याजवळ जाऊन ह्मणाला "नूना! माझें ह्मणणें ऐक. मी तुला सुवर्णमंदिर बांधून देईन. तुलाच मी आपली मुख्य बेगम करीन!"

तेथे हजर असलेल्या दुसऱ्या कंचनी कैलासेश्वरीकडे असूया दृष्टीनें पाहू लागल्या. बादशहाची दृष्टि तिच्यावरच गेली, तेव्हां कैलासेश्वरीसारखी भाग्यवति तीच, असें समजून त्या आपल्या दुर्दैवाला मनांत दोष देऊं लागल्या !

बादशहा पुन: कैलासेश्वरीला ह्मणाला "नूनाजान! तुला मी पादशा बेगम करीन, माझे ह्मणणे ऐक, चल ये !"

कैलासेश्वरी दृढतेने ह्मणाली " कधीं नाही ! या देहामधें जीव आहे तोपर्यंत तसं होणार नाहीं !"

बादशहा हे ऐकून किंचित हसला आणि कैलासेश्वरीला धरण्यासाठीं पुढे सरला. सर्फराजखां बादशहाच्या मागे उभा राहिला. कैलासेश्वरी मागे मागें सरू लागली. नासीर किंचित कोपाविष्ट होऊन सर्फराजखांला ह्मणाला " धर हिला ! मोठ्या गमजा लावते आहे !"

कैलासेश्वरी फारच भ्याली. ती मोठ्याने ओरडून ह्मणाली " आह्मी दोघी बहिणी राजा दर्शनसिंहाच्या दासी आहों! आमच्यावर बळजबरी झाली तर आम्ही आत्महत्या केल्याशिवाय कधीं राहणार नाही !"

' आम्ही दोघी बहिणी राजा दर्शनसिंहाच्या दासी आहो, ' हे कैलासेश्वरीच्या तोंडचे शब्द ऐकतांच बादशहा स्तंभितच झाला! आरक्त लोचनांनी तो कैलासेश्वरीकडे टक लावून पाहूं लागला.

सर्फराजखां दर्शनसिंहाच्या नाशाची ही आयती चालून आलेली संधि वायां जाऊं देणार ? तो झटकन् बादशहाच्या पुढे होऊन हात जोडून ह्मणाला " मुल्के जामानियां ! मी हुजुरांजवळ अगोदरच बोललो होतो, कीं, या दोघां कंचनींनां दर्शनसिंहानें आपल्याच नाटकशाळा केल्या आहेत ! यांनां येथे येऊन तीन महिने झाले; परंतु या तीन महिन्यात यांनां हुजुरांपाशीं घेऊन यायला त्याला संधि सांपडली नाहीं ! या नूनाजानपेक्षां मान्ना अनेकपटीने सुंदर आहे, असें मीं ऐकिले आहे ! पहा, दर्शनसिंहाचें काय कपट तें ! उत्तम नाटकशाळा तेवढी आपणाकरितां ठेवून, मध्यम नाटकशाळेचा पहिल्याने उपभोग घेऊन तिला तीन महिन्यांनीं त्याने मुल्के जामानियांकडे पाठवून दिली !"

सर्फराजखांचें हें भाषण ऐकून बादशहा कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसून राहिला. एक शब्दहि न बोलतां थोडेच वेळांत तो आपल्या महालांत निघून गेला. सर्फराजखां कृतकृत्य झाला. त्याने मोठ्या आनंदाने कैलासेश्वरीचा मानसन्मान करून तिला गोमतीतीरावरील बगीच्यांत पाठवून दिली.

आतां सर्फराजखांच्या आनंदाला सीमा राहिली नव्हती! दर्शनसिंहाच्या नाशासाठीं बादशहाच्या हृदयरूपी भूमीत आज त्यानें विषवृक्षाचें बीज पेरलें होतें. त्याचा लवकरच मोठा वृक्ष होऊन त्याच्या विषारी फळांनी दर्शनसिंहाचा समूळ नाश झाल्याखेरीज रहाणार नाहीं, अशी सर्फराजखांची पक्की खात्री झाली होती. राजवाडयांतून घरीं जातांना सर्फराजखां दररोज उत्कृष्ट विलायती मद्याच्या दानजीन बाटल्या हस्तकौशल्यानें आणित असे. आज विशेष आनंद झाल्यामुळ आणि चांगली साधि मिळाल्यामुळे स्वारीनें सहा बाटल्या तेथल्या तेथेच गट्ट केल्या होत्या! सर्फराजखां नापितराजांची सहधर्मिणी याच देशांतील एका फिरंग्याची कन्या होती. बहुतेक दररोज पतिपत्नीमध्ये प्रथम भयंकर संग्राम होऊन नंतर उभयताचा सांधि होत असे. सर्फराजखांला आज शून्यहस्ताने घरी येतांना पाहून त्याच्या महासाध्वी प्रियतमेने " यू व्हिलन्, फूल! " इत्यादि सुमधुर सुमनाच्या विलायती पुष्पांजलीने आपल्या प्रियतमाचे स्वागत केल दररोज अशा प्रकारची संभावना झाली म्हणजे सर्फराजखां आपल्या प्रियपत्नीच्या गालांवर प्रेमभराने गाग जोरानें चपेटाघात करित असे! पण आज सर्फराजखां आनंदसागराच्या लहरींत पोहत होता! रोजच्याप्रमाणे प्रियतमेच्या नाजुक गुलाबी गालांवर चपेटाघात न करितां नापितराज तिला हंसत हसत म्हणाले "My sweet devil! I will make you Lady Donnithrone!" (माझ्या प्रियतम डाकिणी! मी तुला लवकरच लेडी डेनिथ्रोन करतों पहा!)

सर्फराजखां आपल्या पत्नीला पुष्कळ वेळ ह्मणत असे कीं "आपल्याजवळ एशी लक्ष रुपये जमले आहेत. आणखी वीस लाख रुपये जमले, की, आपण विलायतेस जाऊं आणि आपली नांवे बदलून टाकूं बॅरोनेट होऊन मी सर डोनिथ्रोन असे नांव घेईन आणि तूहि लेडि डोनिथ्रोन होशील!"

सर्फराजखां आज रिकाम्या हातांनीच घरीं आला होता. अर्थात्, आज त्याच्या मडमसाहेबांनां उत्कृष्ट मद्याचा उपवास घडणार होता! भविष्यत्काळीं मिळणाऱ्या लेडी डोनिथ्रोन उच्चपदाच्या आशेने तिचे तूर्त समाधान होणे शक्य नव्हते! सबब पतिपत्नीमध्ये भयंकर वागयुद्ध माजले! उभयताच्या तोंडाचा कंडु शमल्यानतर कांही वेळाने दोघांमध्यें तह झाला!

दुसऱ्या दिवशी बादशहा नाचरंगाच्या दिवाणखान्यांत आला नाहीं खास दरबारच्या दोरत मडळीला वाटले की, बादशहा नूनाजानच्या सहवाससुखांत आनंदानें काळ घालवित आहे नासीर एकसारखा तीन दिवसपर्यंत आपल्या महालांत होता. या तीन दिवसांत त्यानें कोणाचीहि भेट घेतली नाहीं.

## प्रकरण १९ वें.

# शान्तिनिकेतन.

धर्मादर्थः प्रभवति धर्मात्प्रभवते सुखम् ।
धर्मेण लभते सर्वं धर्मसारमिदं जगत् ॥

—अरण्यकांडम्–रामायणम् ।

हिमाचल प्रकृतीचे विहारक्षेत्र आहे! हिमाचलाचे शुभदर्शन एखाद्या अरसिकाच्या चित्ताला आनंद देईल, मग रसिकाच्या हृदयाला त्याच्या मनोरम दर्शनानें स्वर्गसुखाचा लाभ होईल यांत अणुमात्रहि संदेह नाही! तो पर्वतप्रदेश कांहीं स्थळीं हरिततृणांकुरमंडित, तर कांही ठिकाणी नील आणि पीत वृक्षपर्णांनीं सुशोभित दिसत होता. हिमाचलाचा एक भाग घनदाट वृक्षराजींनी युक्त तर दुसरा भाग चिरतुषारहारमंडित! ठिकठिकाणी विविध वर्णांच्या पुष्पस्तबकरूपी अलंकारांनीं नटलेल्या वल्लरीयुवती आपल्या तरुपतींनां दृढालिंगन देऊन त्यांच्यासह विहार करित होत्या! सर्वत्र सुशीतल मंद समीरण वहात होता. पुष्पांतील सुरभि रेणु वायूच्या लहरींबरोबर चोहोंकडे उडून जिकडे तिकडे स्वर्गीय सुगंध दरवळून राहिला होता. वृक्ष आणि लता यांवरून सर्वदा पुष्पे खाली गळत असत, त्यांच्यायोगानें खालचा भूमिप्रदेश विविध रंगांच्या गालिच्यांनीं समावृत दिसत असे! हिमालयाच्या प्रदेशांत विविध पशु आणि जंतु इतस्ततः विचरण करित होते. निर्झरांच्या कलकल नादानें आणि नानाविध पक्ष्यांच्या मंजुल कलरवानें तो निर्जन प्रदेश सर्वकाल दुमदुमून राहिला होता! वसंत, ग्रीष्म, हेमंत, वर्षा इत्यादि सर्व ऋतु या ठिकाणी एकसमयावच्छेदकरून एकत्र वास करित असल्याचे दिसून येत असे! कधीं अत्यंत शीताचा प्रादुर्भाव, कधीं हेमंताचें घनदाट धुकें, कधीं कधीं मेघमालेने गगनमंडळ समाच्छादित, कधीं अल्प ग्रीष्माचा चटका, याप्रमाणें वातावरणाच्या निरनिराळ्या स्थित्यंतरांचा तेथे अनुभव घ्यावयास सांपडे! परंतु विटपवल्लिराजि सदासर्वदा वसंताप्रमाणंच फलपुष्पांचें आर्घ्यप्रदान करित असे! फलपुष्पभाराक्रांत असा एक वृक्ष तशाच दुसऱ्या वृक्षाला आपल्या शाखाबाहूंनीं प्रेमभरानें कवटाळून धारित असे!

लॉर्ड वुइल्यम बेंटिक लखनौहून गेल्यावर दोनतीन महिन्यांनीं हिमालयाच्या रमणीय प्रदेशावरून एक तरुण पुरुष दक्षिणेकडे चालला होता. त्या युवकाच्या अंगावर

भगवीं वस्त्रें होतीं, व त्यांवरून तो एक घोंगडी पांघरला होता. मोठ्या त्वरेनें तो आपल्या इष्ट स्थळाकडे चालला होता. त्याच्याभोंवतीं चोहोंकडे विविध वन्य पशु आणि जंतु इतस्ततः फिरत होते. हिंस्त्र पशूंमध्येहि परस्पर शत्रुभावाची नैसर्गिकवृत्ति मुळींच दिसून येत नव्हती, हे पाहून तो तरुण अत्यंत विस्मयाकुल होऊन आपल्याशींच ह्मणाला "काय विलक्षण आश्चर्य हें! येथील हिंस्त्र पशुपक्ष्यांनींसुद्धां येथील महात्म्यांप्रमाणे शांत प्रकृति धारण केली आहे!"

या निर्जन प्रदेशांत मनुष्याच्या वस्तीचे अल्पहि चिन्ह दिसून येत नव्हतें. तो युवक याप्रमाणें दोन दिवसपर्यंत सारखा चालत होता. त्या पर्वतप्रदेशांतील वृक्षांवरील मधुर फळें वेळोवेळीं भक्षण करून तो आपली क्षुधा शमवित असे व गिरिनिर्झरांचे मधुरोदक प्राशन करून आपली तृषा शान्त करी. दोन दिवसांनंतर तो तरुण उद्यानाप्रमाणे दिसणाऱ्या एका वृक्ष समाकीर्ण स्थानीं येऊन पोहोंचला. त्या स्थळीं नग्नावस्थेंत एक योगी निमीलित नेत्रांनीं योगारूनावर समाधी लावून बसला होता. जवळजवळ दोन तासपर्यंत तो तरुण त्या योग्याच्या मागें उभा राहून त्याच्याकडे पहात होता; परंतु तो योगी चेतनावस्थेंत तेथें बसला आहे किंवा अचेतनावस्थेत आहे, याचा त्याला मुळींच निर्णय करितां येईना! हा योगी कोणी महा सिद्ध पुरुष असून तो एकाग्र चित्ताने परब्रह्माचे चिंतन करित असावा, असे त्या तरुणाला वाटले. त्याला मनांत प्रणाम करून तो युवक दक्षिणेकडे चालला. वाटेंत ठिकठिकाणीं परब्रह्माचे ठिकाणीं लीन झालेले असे चारपांच योगी त्याच्या दृष्टीस पडले; परंतु त्यांपैकीं एकाशींहि त्याला बोलावयास मिळाले नाहीं. सर्वजण निमीलित नेत्रांनीं समाधी लावून ईशचिंतनांत निमग्न होऊन गेले होते.

हळुहळु तो तरुण हिमालयाच्या दक्षिणभागाच्या एका पर्वतप्रदेशावर येऊन पोहोंचला. येथें ठिकठिकाणीं अनेक संसारविवर्जित साधु आणि परमहंस यांचे आश्रम त्याच्या दृष्टीस पडले. प्रत्येक परमहंस आपल्या एकदोन शिष्यांसह निरनिराळ्या आश्रमांत वास करित असे. तो तरुण ज्या ज्या आश्रमाशीं जाई त्या त्या आश्रमांतील साधुपुरुष त्याला मोठ्या आदरानें आपल्या आश्रमांत घेऊन जात आणि त्याला विविध आहार्य वस्तु अर्पण करून त्याचा सत्कार करीत. कधीं कधीं त्याला धर्मोपदेश करून या मायामोहमय संसारांत धर्मसाधनाशिवाय दुसरें कांहीं लक्ष्य नाहीं, केवळ धर्माचरणानेच मनुष्याला अक्षय्य सुखाची प्राप्ति होईल, अशा प्रकारचे सिद्धांत त्याच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करीत.

याप्रमाणें तीन आश्रमांतील आतिथ्य ग्रहण करून तो युवक चवथ्या आश्रमापाशीं येऊन पोहोंचला. या आश्रमांतील परमहंसानें कौपिन परिधान केली होती. सर्व शरीरावर त्यानें भस्म चर्चिले होतें. त्याच्या देहावरची त्वचा हस्तिचर्माप्रमाणें जाड आणि खडबडीत होती. त्याला पाहतांच असें वाटे, कीं, या परमहंसाला ऊष्णशीतादि द्वद्वांची मुळींच बाधा होत नसावी ! तसें नसतें, तर या ठिकाणीं त्याला रहातां आलेंच नसतें; कारण, हिमाचलावर अनावृत शरीरानें कोणालाहि रहातां येणें शक्य नाहीं! तो परमहंस कोणाशीं एक शब्दहि बोलत नसे. सर्वदा निमीलित नेत्रांनीं तो ब्रह्मचिंतनांत निमग्न असे. त्याच्या आश्रमांत दुसरा एक साधु रहात असे. त्या साधूनें या तरुणाचा विशेष आदरसत्कार करून त्याला विविध आहार्य वस्तु अर्पण केल्या. युवकाच्या शरीरावरील घोंगडी अगदीं जीर्ण होऊन गेली आहे असें पाहून तो साधु आपली घोंगडी त्याला देऊ लागला, परतु तिचा स्वीकार न करितां युवक त्या साधूच्या मुखाकडे एकसारखा पहात राहिला. कांहीं वेळाने युवकानें त्याला विचारिलें " प्रभो ! आपण कधीं सीतापुरांत होतां काय ? पूर्वी कधीं तरी मी आपल्याला सीतापुरांत पाहिलें आहे, असें मला आठवते. "

साधु किंचित् हास्य करून म्हणाला " बेटा ! मीं संसारत्याग केला आहे, मी कधीं कोणाला आत्मपरिचय करून देत नाहीं ! "

युवकानें पुनः विचारिलें " आत्मपरिचय करून देण्यांत काय पाप आहे? आपण आत्मगोपन कां करित आहां, मला कांहीं कळत नाहीं. "

"बाबा ! असली ओळख देण्यांत कांहीं पाप नाहीं हें खरें आहे; परंतु संसाराची स्मृति माझ्या हृदयांतून दूर करण्याविषयीं मी प्रयत्न करित आहें. आपल्या आयुष्यांतील पूर्वावस्थेचें संपूर्ण विस्मरण झाल्याशिवाय कोणालाहि निर्वाणपदप्राप्तीची आशा नाहीं. "

" आपण काय बौद्धधर्मानुयायी आहां ? निर्वाणमुक्तीच्या गोष्टी बौद्धधर्मीय लोकांच्या मुखांतून ऐकूं येतात ! "

" बेटा ! येथें हिंदु, मुसलमान, बौद्ध सर्व एकच ! येथें सर्व धर्मशास्त्रांविषयीं आह्मांला सारखाच आदर वाटतो. या ठिकाणीं कोठल्याहि धर्माच्या किंवा जातीच्या संबधांत मुळींच मतभेद नाहीं. "

अशा प्रकारें त्या तरुण पुरुषाचें त्या साधूशीं संभाषण चाललें असतां त्याला अकस्मात् स्मरण झालें, कीं, हा साधु सीतापुरांतील एक प्रसिद्ध ज्योतिर्वेत्ता होता परंतु त्याचें नांव काय, हें मात्र त्याला अनेक प्रयत्न करूनहि आठवेना! कांहीं वेळ स्तब्ध राहून युवक त्या साधूला ह्मणाला "प्रभो! मजपासून आत्मगोपन करण्याचा आपण उगीच प्रयत्न करित आहां! आपल्याला मीं आतां ओळखलें; परंतु आपलें नांव मात्र अझून आठवत नाहीं. आपण सीतापुरांत प्रसिद्ध ज्योतिर्वेत्ते होतां! आपण एकदा गणित करून सांगितलें होतें कीं, माझे पितामह जगन्नाथशास्त्री हे अद्यापि जिवन्त आहेत आणि ते मला लवकरच भेटतील; परंतु महाराज! आपलें हें भविष्य खोटें झालें. त्यांच्याशीं माझी गांठ अझूनपर्यंत पडली नाहीं."

साधु किंचित् हंसून ह्मणाला "बेटा! शास्त्रसिद्ध भविष्य खोटें होणें कधींहि शक्य नाहीं. तुझे पितामह जगन्नाथशास्त्री यांच्याशीं तुझी भेट खात्रीनें झाली आहे!"

युवक गद्गद स्वरानें ह्मणाला "प्रभो! आपण मला मिथ्यावादी असें मनांत समजत आहां; परंतु मी आपल्याला निश्चयपूर्वक सांगतों कीं, माझ्या पितामहाशीं माझी गांठ कधींहि पडली नाहीं!"

साधु पुन: दृढतेनें ह्मणाला "तुझी त्यांची भेट खात्रीनेंच झाली आहे; परंतु तूं मात्र त्यांनां ओळखलें नाहींस."

तरुण किंचित् हंसून ह्मणाला "प्रभो! या आपल्या भाषणाला मजजवळ कांहीं उत्तरच नाहीं! मी दोन वर्षांचा होतों तेव्हां ते संसार परित्याग करून कोठें निघून गेले. अर्थात्, ते मला ओळखित नसतील आणि मीहि त्यांनां ओळखणें शक्य नाहीं. मी पुष्कळ ठिकाणीं फिरलों आहें. जातां येतां मार्गांत अनेक महंत साधु संन्याशांची भेट झाली आहे. त्यामध्येंच कोणीतरी एकजण माझे पितामह जगन्नाथशास्त्री होते, असें जर आपलें म्हणणें असेल तर मात्र आपलें भविष्य खरें ठरलें म्हणावयाचें!"

युवकाचे हें भाषण ऐकून साधूनें त्याला हंसत हंसत विचारलें "तुझ्या पितामहाच्या शोधासाठींच का तूं या हिमाचलांतून फिरत आहेस?"

"नाहीं महाराज!"

"तर मग तूं कशाला आला आहेस?"

"माझ्या अपार मनोदु:खांचा उपशम व्हावा म्हणून आत्महत्या करण्यासाठीं मीं नदींत उडी टाकिली. इतक्यांत एका महापुरुषानें मी अचेतन असताच मज

नदींतून वर काढिलें. मी शुद्धीवर आल्यानंतर तो महात्मा मला स्वदेशास जाण्याविषयीं आग्रह करूं लागला; परंतु मीं त्याचे चरण घट्ट धरून रडत रडत ह्मणालों ' प्रभो ! मी आपले चरण सोडून दुसरीकडे कुठेंहि जाणार नाहीं. आपण निष्ठुर होऊन मला आपल्या चरणांपासून जर घालवून लाविले तर मी पुनः आत्महत्या केल्याखेरीज राहणार नाहीं.' तो महात्मा केवळ दयेचा सागर होता. माझ्यावर सदय होऊन आपल्याबरोबर मला घेऊन तो या पर्वतावर आला. त्या महापुरुषाबरोबर मी ज्या स्थानीं गेलो होतो तेथे मनुष्यमात्राचा प्रवेश होणे असभवनीय होते! परंतु त्या महात्म्याने योगबलाने अलैकिक शक्ति सपादन केली असल्यामुळें केवळ त्याच्याच कृपेनें आणि सहाय्याने मी तेथे गेलों. त्या महात्म्याचा अध्यात्मिक उपदेश आणि त्याचीं अद्भुत कृत्यें पाहून तो सर्वज्ञ आणि सर्वदर्शी महापुरुषा-असावा, असे मला वाटू लागले आणि म्हणून माझ्या पळवून नेलेल्या भगिनीच्या मुक्ततेविषयीं मी त्याला सर्वकाळ प्रश्न विचारुन त्रास देत असे मी त्या महापुरुषबरोबर जवळजवळ एक वर्षपर्यंत होतों. तो मला सर्वकाळ स्वदेशी निघून जाण्यास सांगे. पण मी कांहीं केल्या त्याला सोडून जाण्यास कबूल झालों नाहीं. शेवटीं तो महात्मा मला म्हणाला 'तू काळजी करू नकोस. तुझी बहीण सिंहाच्या गुहेंतून आणि व्याघ्राच्या मुखांतून सुरक्षितपणें घरीं परत येईल.' या त्याच्या आश्वासनावर निर्धार ठेवून मी आतां स्वदेशीं जात आहें."

युवकाची आत्मकथा पुरी झाल्यावर तो साधु म्हणाला "बेटा, ज्योतिषशास्त्र मिथ्या नाहीं. तुझ्या पितामहाशीं तुझी गांठ पडली !"

"कुठें ?"

"ज्या महापुरुषानें तुला नदींतून वर काढलें, तोच महापुरुष तुझा पितामह जगन्नाथशास्त्री !"

"ते जर माझे पितामह असते, तर मला आपली ओळख न देण्याचें त्यांना काय कारण होतें ?"

"बेटा ! निर्वाणपदाकांक्षी महापुरुष कधीं कोणाला आत्मपरिचय करून देत असतात काय ? ते संसाराच्या कार्यामध्यें कधींहि हस्तक्षेप करू इच्छित नाहींत. या जगांतील आपत्ति, शोक, ताप इत्यादि घटनेकडेहि ते मुळींच लक्ष्य देत नाहींत !"

"तर मग त्यांनीं मृत्यूपासून माझी सुटका कां केली ?"

" तूं घोर पापाचरण करावयाला उद्युक्त झाला आहेस असें पाहून त्यांच्यानें व्हावेना बेटा ! आत्महत्येसारखें भयंकर पाप दुसरें कोणतेंहि नाहीं. या पापाल कांहीं प्रायश्चित्त नाहीं ! "

त्या साधूनें सांगितलेल्या या सर्व गोष्टी ऐकून त्या युवकाच्या मनांत नानाप्रकारचे विचारतरंग येऊं लागले. कांहीं वेळ स्तब्ध राहून तो म्हणाला " प्रभो ! आपल्यासारख्यांचें धर्माचरण आणि कृति यांचें मला फार गूढ आणि आश्चर्य वाटतें. या संसारार्णवांत लोक नानाप्रकारचीं दुःखें आणि संकटें भोगित आहेत, आणि अत्याचाररूपी प्रखर अग्नींत भस्मसात् होत आहेत; परंतु हे सर्व अत्याचार, दुःखें, कष्ट इत्यादिकांचे निवारण करण्याचें आपल्या अंगीं सामर्थ्य आणि क्षमता असतांहि आपण त्यांचें निर्मूलन करण्याविषयीं प्रत्यन न करितां स्वस्थ रहातां, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. "

साधु म्हणाला " बेटा! दुर्नीति, पापाचरण, कुसंस्कार आणि स्वार्थपरता यांपासूनच या संसारांतील सर्व दुःखें उत्पन्न होतात त्यांचें निर्मूलन करणें कोणाला तरी साध्य आहे काय? "

" कां बरें? आपल्या अंगांत तशी शक्ति नाहीं काय ? "

" नाहीं बेटा! आम्हांला तें साध्य नाहीं ! "

" या निर्जन पर्वताचा त्याग करून आपण जर स्वदेशीं परत जाल तर विविध संकटांनीं गांजलेल्या आपल्या देशबांधवांवर आपण अगणित उपकार करूं शकाल, अशी माझी खात्री आहे. या पर्वतावर बसून आपण विशेष काय करितां ? "

हिमाचलवासी महात्मे लोकांशीं विशेष बोलत नाहींत; परंतु त्या युवकाची भक्ति, श्रद्धा, निष्ठा आणि शिष्टाचारप्रदेशन यांच्या योगानें तो साधु त्याच्यावर अत्यंत संतुष्ट झाला होता. त्या तरुणाविषयीं त्याच्या हृदयांत दया उत्पन्न होऊन तो म्हणाला " बेटा! या जगतावरील वर्तमान अवस्था धर्मसाधनाला विशेष अनुकूल नाहीं. यासाठींच निर्वाणपदाकांक्षी महात्मे या निर्जन हिमाचलावर वास करितात जगतावरील भिन्न भिन्न देशांत भिन्न भिन्न धर्मविश्वास आणि धर्ममतें प्रचलित आहेत. निरनिराळ्या जातीचे धर्महि निरनिराळे आहेत; परंतु विभिन्न धर्मानुयायी लोकांचें हा निर्जन हिमाचलच संमीलनस्थान होय. या ठिकाणीं हिंदु, मुसलमान, बौद्ध, ख्रिश्चन सर्वजण एकच प्रकारचें धर्मसाधन करित आहेत. येथें एकमेकांत मतभेद उपस्थित होणें शक्य नाहीं. या ठिकाणीं सर्वांचें एकच

लक्ष्य-एकच उद्दिष्ट-सर्वजण शुद्ध केवळ परमेश्वराचा लाभ करून घेण्यासाठीं एकाग्र चित्तानें त्याच्याच चिंतनांत सर्वकाल निमग्न असतात. जगतावरील देशांत जे निरनिराळे धर्म प्रचलित आहेत ते विमिश्र आहेत. देशप्रचलित आचार, व्यवहार, सामाजिक रीतिनीति आणि कुसंस्कार यांच्यायोगानें धर्म मिश्रित होतो. निर्मल, विशुद्ध धर्म जगामध्यें कोठल्याहि देशांत दुष्प्राप्य आहे! तिबेट आणि चीन या दोन्ही देशांत बौद्धधर्म प्रचलित आहे; परंतु तिबेटांतील बौद्धधर्म चीन देशांतील बौद्धधर्मापेक्षां अगदीं निराळा आणि स्वतंत्र आहे! तिबेटांतील पूर्व प्रचलित आचार, व्यवहार, रीतिनीति यांच्याशीं बौद्ध धर्माचें मिश्रण होऊन त्याला एक निराळेंच स्वरूप प्राप्त झालें. त्याप्रमाणेंच चीन देशाच्या आचारव्यवहाराशीं मूळच्या बौद्धधर्माचें मिश्रण झाल्यामुळें त्याचें तिबेटांतील बौद्धधर्मापेक्षां अगदींच निराळें रूपान्तर झालें. भिन्न भिन्न प्रकारच्या देशाचारांशीं मिश्रण झाल्यामुळें जगावरील सर्व धर्मांनां विकृतावस्था प्राप्त झाली आहे. या पृथ्वीवर एका धर्माचे अनुयायी अन्य धर्माच्या लोकांचा द्वेष आणि तिटकारा करतात; परंतु भिन्न भिन्न देशांतील महात्मे आपापल्या देशांतील प्रचलित आचार, व्यवहार, आणि संस्कार यांचा त्याग करून बरोबर निर्मल, विशुद्ध मानवप्रकृति घेऊन या हिमाचलावर आरोहण करितात आणि म्हणूनच या ठिकाणीं मतभेद आणि धर्मयुद्ध कधींहि दिसून येत नाहीं. मीं या आश्रमवासी परमहंसाबरोबर चीन, तिबेट प्रभृति अनेक देशांत पर्यटन केलें आहे; परंतु या हिमाचलाप्रमाणें धर्मसाधनाला अत्यंत उपयोगी असें स्थान दुसऱ्या कोठल्याहि देशांत माझ्या दृष्टीस पडलें नाहीं. खरोखर, हिमाचल हें योग्यांचें साधनक्षेत्र आहे! या ठिकाणीं धर्मच सुख-धर्मच शांति-धर्मसाधन हेंच जीवनाचें एकांत लक्ष्य आहे!"

त्या साधूचें हें भाषण पुरें होतें न होतें तोंच तो तरुण मध्येंच म्हणतो "महाराज, मला क्षमा करा. आपण अनुमति द्याल तर आपणाला एक प्रश्न विचारावा, असें मनांत आहे."

"बेटा! तुझी भक्ति, आणि शिष्टाचारदर्शन यांच्या योगानें मी तुझ्यावर अत्यंत संतुष्ट झालों आहें. तुला काय विचारायचें असेल ते खुशाल विचार."

"प्रभो! सीतापुरच्या आपल्या रहाण्याच्या घराचें मला चांगलें स्मरण आहे. आपणाला सीतापुर सोडून किती वर्षें झालीं?"

त्या तरुण पुरुषाच्या अत्यंत आग्रहाला मान देऊन तो साधु आपली हकीगत त्याला सांगूं लागला. तो ह्मणाला "बेटा! माझ्या आयुष्याच्या पूर्वावस्थेला विस्मृतिसागरांत बुडवून टाकण्याचा मी आटोकाट प्रयत्न करित आहें; परंतु तुझा अतिशयच आग्रह पाहून तुझें मन मोडावयाचें नाहीं एवढ्याकरितांच मी तुला माझी हकीगत सांगतों. मी सीतापुरचा प्रसिद्ध ज्योतिर्विद् पंडित शंभुप्रसाद याचा वडील मुलगा. माझें नांव पंडित देवीप्रसाद. देशप्रचालित कुसंस्कार आणि जात्यभिमान यांच्या योगानें मी घोर पापार्णवांत बुडून गेलों होतों; परन्तु परमेश्वराची कृपा म्हणून केवळ शुद्ध साधुभक्तीनें मला या ठिकाणीं आणिलें. आमच्या जहागिरीच्या कर देण्याच्या संबंधांत नबाबाच्या तालुकेदाराने आमच्या घरांतील स्त्रियांवर भयंकर अत्याचार केला. मुसलमानांचा स्पर्श ह्मणजे दारुण पाप होय, असा आमच्या मनावर चिरसंस्कार झाला असल्यामुळें आमच्या घरांतील सर्व स्त्रियांनां आत्महत्या करण्याची मीं सल्ला दिली. माझ्या सल्लेप्रमाणें त्या सर्वांनीं शरयु नदींत आत्मविसर्जन केलें. माझा लहान भाऊ तालुकदाराचा सूड उगविण्याच्या इच्छेनें परवश होऊन ठगांच्या टोळींत शिरला आणि मी साधुसंगतीचा लाभ घ्यावा ह्मणून हिमाचलावर आलों.

"बेटा! माझा लहान भाऊ पंडित बलदेवप्रसाद यानें अनेक शास्त्रांचें अध्ययन केलें होतें; परंतु केवळ व्यवसाय करण्याच्या हेतूनेंच जर शास्त्राध्ययन केलें तर त्यापासून उपकार न होतां अपकारच व्हावयाचा! बलदेवप्रसाद हा अतिशय अभिमानी होता. घरांत मुसलमानांचा प्रवेश झाला—भ्रष्टाकार माजला, आतां लोकसमाजांत आपली निंदा होईल, इतर ब्राह्मण आह्मांला जातींतून बहिष्कृत करतील, या शंकांनीं त्याचें मस्तक फिरल्यामुळें त्यानें आपल्या सोन्यासारख्या दोघां मुलींनां आत्महत्या करावयास सांगितलें! आमच्या मनांत कुसंस्काराचीं मुळें खोल गेल्यामुळें आह्मा दोघां बंधूंनीं स्त्रीहत्या आणि आत्महत्या या अतिशय भयंकर पापांनां सहाय्य केलें. ठग किंवा दरोडेखोर लुटारू यांनां आह्मी घोर पापी असें समजतों; परंतु कुसंस्कार आणि जात्यभिमान यांच्या योगानें कधीं कधीं आह्मी ठगांपेक्षांहि अधिक निष्ठुर होतों! आमच्या घरांतील लक्ष्मीतुल्य स्त्रियांनां आत्महत्या करावयास सांगून आह्मीं दोघां भावांनीं घोर पापाचरण केल्याचें श्रेय मात्र संपादन केलें!

"बेटा! तूं मला स्वदेशांत परत जावयास सांगती आहेस; परंतु माझ्याप्रमाणें पांचदहा लोक स्वदेशांत गेले असतां त्यापासून देशाचें काय हित होणार आहे?

मी ह्मणतों कीं, उलट अहित मात्र होण्याचा फार संभव आहे ! आह्मी स्वदेशांत गेलों, ह्मणजे प्रत्येकाच्या भोंवतीं जमणाऱ्या अनेक शिष्यमंडळींच्या द्वारा एक एक नवा संप्रदाय उत्पन्न होईल ! आपल्या देशांत अगोदरच अनेक धर्म आणि शेकडों संप्रदाय आहेत, त्यांत आमच्या योगानें आणखी पांचदहा नवीन संप्रदायांची भर पडेल ! एका संप्रदायाच्या लोकांचा दुसऱ्या संप्रदायाच्या अनुयायांशीं हिंस्र पशूंप्रमाणें व्यवहार असतो ! मुसलमान हिंदूंना पाण्यांत पहातात, हिंदु मुसलमानांचा द्वेष करितात आणि हिंदुमुसलमान दोघेहि ख्रिश्चन लोकांचा तिटकारा करितात ! भिन्न भिन्न संप्रदायांची धर्मसाधनपद्धति, आचार आणि बाह्य व्यवहार भिन्न भिन्न प्रकारचे असतात. या बाह्य व्यवहारामुळेच या संसारांतील धर्म आणि लोक वेगळे दिसतात. परंतु बेटा ! पृथ्वीवरील सर्व धर्मांचे तत्त्व आणि सारांश एकच आहे ! **ईश्वरप्राप्तीविषयींचा प्रयत्न**—हाच सर्व धर्मांचा निष्कर्ष आहे ! या संसारांत धर्माचें केवळ आवरण ह्मणजे बाह्य व्यवहार उघड दृष्टीस पडतो; परंतु या निर्जन हिमाचलांत प्रवेश केल्याशिवाय धर्माच्या निष्कर्षाचा लाभ कोणाला कधींहि होणें शक्य नाही. या ठिकाणीं संसारांतील आचारव्यवहार, रीतिनीति, देणेघेणें कांहीं नाहीं. संसारापासून निर्लिप्त होऊन साधु शुद्ध चित्तानें हिमाचलावर आरोहण करितात. ह्मणून येथे मतभेद, धर्मयुद्धें उपस्थित होण्याचें कारण नाहीं ! परंतु जन्मल्याबरोबर कोणाला हिमाचलावर आरोहण करितां येणें शक्य नाहीं. संसार हें एक उत्कृष्ट विद्यालय आहे ! धैर्य, सहिष्णुता, आत्मयज्ञ आणि निष्ठा यांचें शिक्षण प्रथम संसारांत राहूनच सपादन केले पाहिजे. संसारांत राहून मिळविण्याचे हें शिक्षण संपादन करण्यापूर्वीच येथे आले, तर त्यापासून विशेष लाभ होत नाहीं. याचसाठीं तुझ्या पितामहाने तुला स्वदेशांत परत जावयास इतक्या आग्रहानें सांगितलें !"

साधूचें हें भाषण पुरें झाल्यावर युवक त्या साधूला आत्मपरिचय करून देऊं लागला; साधु किंचित् हास्य करून म्हणाला " बेटा ! तुला मीं ओळखलें आहे ! तूं सीतापुरचे गंगाप्रसादशास्त्री यांचा पुत्र–तुझें नांव काशीनाथ ! "

काशीनाथ ह्मणाला " मी आतां लखनौला जायचा मनांत विचार केला आहे. प्रभो ! आणखी किती दिवसांनी माझ्या पळवून नेलेल्या बहिणीची मी मुक्तता करूं शकेन, ते आपण कृपा करून मला सांगा. आपण सर्वज्ञ आणि सर्वदर्शी आहां, अशी माझी पक्की खात्री आहे !

" बेटा ! प्रथम तूं कानपुराला जाऊन नंतर लखनौला जा. कानपुरला तुझ्या बहिणीचें वर्तमान तुला कळेल. "

" कानपुरला तिचें वर्तमान मला कसें कळणार ? "

" कानपुरांत जयपालसिंह नांवाचा एक व्यापारी आहे. त्याच्या घरीं तुझी बहीण प्रतिबंधांत आहे. कानपुरला गेल्यावर तिच्यासंबधीं तुला सर्व वर्तमान कळेल. "

काशीनाथानें साधूच्या चरणांवर मस्तक ठेवून त्याचा निरोप घेतला, आणि तो कानपुराच्या रस्त्याला लागला. मार्गांत अनेक साधु आणि परमहंस यांच्या आश्रमांत त्यांच्या आतिथ्याचें ग्रहण करित करित तो सुमारें पंधरा दिवसांनीं कानपुरास येऊन पोहोंचला.

कानपुरास पोहोंचतांच काशीनाथ जयपालसिंहाच्या घराचा शोध करूं लागला. जयपालसिंहाच्या बागेंत गेल्यावर अयोध्यानाथाशीं त्याची गांठ पडली. काशीनाथाला पाहतांच अयोध्यानाथ प्रथम आश्चर्यानें अगदीं स्तंभितच होऊन गेला ! परंतु काशीनाथानें त्याला आद्योपान्त वृत्तान्त सांगतांच अयोध्यानाथाच्या नेत्रद्वयांतून अविरत अश्रुवर्षाव होऊं लागला. हरवलेला खजिना आपणास पुन: मिळाला, असें समजून अयोध्यानाथ त्याला वारंवार आलिंगन देऊं लागला.

अयोध्यानाथ दुखण्यांतून आतां बहुतेक बरा झाला होता. बुंदिया आणि काशीनाथ यांनां बरोबर घेऊन तो ताबडतोब लखनौला निघाला.

## प्रकरण २० वें.

# भारत रमणी.

* Truly, if Hindustan is ever saved, it will be by the virtues of its women ; for more honourable, more honest minded, more nobly-endowed female humanity is not to be found in the most highly civilised regions of the earth than amongst the zenanahs of India. —*W. Kinghton.*

शुक्रवारचा दिवस दोन प्रहरची वेळ. आज मुसलमानांचा जुम्मा नमाजाचा दिवस असल्यामुळें ताजमहाल बेगम, हजरत अब्बासच्या दरग्यांत नमाज पढावयास जाणार होती. लखनौच्या रस्त्यांवरून लोकांची मोरे एकच गर्दी उडून राहिली होती ! जिकडे पहावे तिकडे अपार लोकसागराचा विस्तार दिसून येई. आज लांबलांबून शेंकडो आंधळे, पांगळे, लुले, बहिरे, मुके, भणंग भिकारी लखनौ नगरांत येत होते. प्राति महिन्याच्या पहिल्या शुक्रवारीं ताजमहाल बेगम पुत्रकामना मनांत धरून हजरत अब्बासच्या दरग्यांत नमाज पढावयास जात असे. नमाज आटोपल्यावर परत राजवाड्यांत जातांना रस्त्यांतील अनाथ अपंग दीन दुबळ्यांस व भणग भिकाऱ्यांस ती दहा हजार मोहरा खैरात करी. ती ज्या रस्त्याने जात असे त्या रस्त्यावर दोन्हीं बाजूंस हजारो भिकारी उभे रहात.

ताजमहाल बेगमेची स्वारी आज हजरत अब्बासच्या दरग्याकडे निघाली होती. स्वारीच्या आघाडीस लष्करी पोषाख घातलेल्या सैनिकांची एक तुकडी रणवाद्ये वाजवित चालली होती. त्यांच्या मागून सैन्याची दुसरी एक तुकडी हातांत नग्न शस्त्रें धरून चालली होती. त्यांच्या मागें खुद्द बेगमेची सुवर्णमंडित शिबिका ! शिबिकेवर आफ्ताद् म्हणजे स्वर्णविनिर्मित राजछत्र धरून कांहीं दासी चालल्या होत्या. ताजमहाल बेगमेशिवाय दुसऱ्या कोणत्याहि बेगमेला हें छत्र वापरण्याचा

---

* खरोखर, भरतखंडाचा जर कधीं उद्धार झाला, तर तो भारतीय स्त्रियांच्या सद्गुणांमुळेंच होईल ! हिंदुस्थानांतील पडदेनशीन स्त्रियांपेक्षां अधिक सत्वशील, विशुद्ध, उदार आणि उदात्त अंत:करणाच्या स्त्रिया या भूतलावरील सुधारणागिरीच्या अत्युच्च शिखरावर विराजमान झालेल्या दुसऱ्या कोठल्याहि देशांत आढळून येणार नाहींत ! —डब्ल्यू-नाइट.

अधिकार नव्हता. ताजमहाल बेगमेची शिबिका साधारण पालखीप्रमाणें किंवा मेण्याप्रमाणें नव्हती; तर ती एका लहानशा घराप्रमाणें प्रचंड होती! डोकीवर सोनेरी मंदील व अंगावर एकजात उत्तम प्रकारचा पोषाख घातलेले वीसजण भोई बेगमेची शिबिका खांद्यावर घेऊन चालले होते. ही शिबिका उत्तम रीतीनें शृंगारली होती. तिला सुवर्णाचें नक्षीदार काम केलेले झिरझिरित पडदे लाविले होते. या शिबिकेंत आपल्या एकदोन प्रिय मैत्रिणींसह बेगम बसली होती. शिबिका वाहणाऱ्या भोयांच्या मागून सुंदर वस्त्रालंकारांनीं मंडित अशा वीस दासी चालल्या होत्या. बेगमेची स्वारी दरग्याच्या दरवाजाशीं पोहोचली, कीं शिबिका आपल्या खांद्यावरून दरग्यांत नेण्याचें काम या दासींचे होतें. या वीस दासींच्या मागून रुप्याच्या काठ्या हातांत घेऊन सुमारें पंधरा भालदार, चोपदार चालले होते. आणि स्वारीच्या अगदीं पिछाडीस सुंदर रीतीनें शृंगारलेल्या एका हत्तीवर हौद्यांत बसून अंगावर सोनेरी पोषाख घातलेले व डोकीला स्वर्णखचित मंदिल असलेले ताजमहाल बेगमेचे मुख्य मुख्य खोजे चालले होते. अशा थाटाने बेगमेची स्वारी आज हजरत अब्बासच्या दरग्याच्या दर्शनास निघाली होती!

थोड्याच वेळांत बेगमेची स्वारी दरग्यांत जाऊन पोहोंचली. कांहीं वेळानें नमाज पढण्यास प्रारभ झाला. पुत्रकामना मनांत धरून बेगमेने भक्तिभावपूर्वक परमेश्वराची प्रार्थना केली. बेगमेची स्वारी राजवाड्यांत परत जातांना रस्त्यांत जमलेल्या हजारों अनाथ अपंगांनां व भणंग भिकाऱ्यांनां बेगमेनें निश्चित केलेल्या मासिक दानासंबंधीं दहा हजार मोहरांची खैरात झाली! प्रत्येक महिन्याच्या पहिल्या शुक्रवारीं दहा हजार मोहरा दान करून ताजमहाल बेगम हजारों गरीब दुबळ्यांचा दुवा घेत असे.

नूनाच्या दुसऱ्या दिवसच्या भेटीनंतर गेल्या तीन दिवसांत नासीर महालाच्या बाहेर मुळींच आला नाहीं. बादशहाच्या खास दरबारांतील दोस्त मंडळीला वाटत होतें कीं, नासीर नूनासह अनेक भोगविलासांत निमग्न होऊन गेल्यामुळें गेल्या तीन दिवसांत त्याला रंगमहालाच्या बाहेर यावयास मिळालें नाहीं! परंतु 'अंदरकी बात' फक्त सर्फराजखां व बादशहा यांनांच माहीत होती!

आज ताजमहाल बेगम हजरत अब्बासच्या दरग्यांत गेल्यावर नासीर तिच्या महालांत गेला. इकडे, खास दरबारच्या दिवाणखान्यांत त्याचें दोस्त पंचायतन त्याची वाट पहात बसलें होतें. ताजमहाल बेगम परत यावयाच्या अगोदर थोडा वेळ बादशहा तिच्या महालांतून बाहेर पडला. नासीरनें बेगमेची भेट घेतली नाहीं!

प्रिय वाचकहो! ती विपुल धनसंपत्ति, तें अपार राजवैभव, ती सुवर्णमंडित शिबिका, शिबिकेवरील तें स्वर्णखचित आफताद्, शेंकडों दासदासी, हत्ती, घोडे, मेणे, पालख्या, खोजे, अमूल्य वस्त्रालंकार, इंद्रभुवनासहि लाजविणारा तो महाल, यांपासून ताजमहाल बेगमेला सुख होत होतें काय? या अपार राजवैभवामुळें या बेगमेसारखी सुखी तीच, अशी जर आपली कल्पना असेल, तर ती साफ चुकीची आहे! आज जी शेतकऱ्याची बायको मुलाला कडेवर घेऊन ताजमहाल बेगमेनें दिलेलें दान घेण्यासाठीं तिच्या जाण्याच्या रस्त्यावर उभी राहिली होती, तीच बेगमेपेक्षां अधिक सुखी नव्हे काय? ताजमहाल बेगमेला तर आपल्यापेक्षां ती शेतकऱ्याची स्त्रीच महा भाग्यवान् आणि सुखी वाटत होती!

* * * * * *

ताजमहाल बेगम परत येण्याच्या पूर्वी बादशहाला तिच्या महालांतून बाहेर पडतांना पाहून खास दरबारच्या इंग्रज दोस्तांपैकीं एकजण दुसऱ्याला म्हणत होता "मला वाटते, बादशहा ताजमहाल बेगमेचा महाल नूनाला देणार! याचसाठीं स्वारी बेगमेचा महाल आज पुनः पाहून आली! ताजमहाल बेगमेची दुसरीकडे उचलबांगडी होणार, यांत शंका नाहीं!"

यावर दुसरा म्हणाला "खरेंच बुवा! या नवीन कंचनीचें नशीब सवाई शिकंदर! दोन दिवस नृत्यगायन करून ती एकदम बादशहाची बेगम बनली! तिच्याकडे मला चांगलें पहायला देखील मिळालें नाहीं!"

याप्रमाणें या दोघांचें संभाषण चाललें आहे, तों नूतन वजीर नबाब रोषन-उद्--दौला आणि सेनापति राजा दर्शनसिंह हे तेथें येऊन पोहोंचले. बादशहाच्या इंग्रज दोस्तांच्या मुखांतून नूनाविषयीं चाललेली प्रशंसा ऐकून राजा दर्शनसिंहाला मनांत अतिशय आनंद झाला. आतां आपले मनोरथ पूर्ण होण्यास मुळीच अवकाश नाहीं, असे वाटून जवळच असलेल्या नबाब रोषन-उद्-दौल्याकडे तो असूया, द्वेष, क्रोध, आनंद इत्यादि निरनिराळ्या मनोविकारांनीं मिश्रित अशा दृष्टीनें पाहूं लागला. कांहीं वेळानें सर्फराजखां आणि नासीर हे तेथें आल्यावर सर्वजण मिळून गोमतीच्या दुसऱ्या तीरावरील उद्यानांत सायंकालची सफर करण्यासाठीं निघाले.

संध्याकाळीं शहरांत बाहेर फिरावयास जातानां नासीर बहुधा डोकीला 'हॅट्' (टोपी) व अंगांत कोट असा युरोपियन तऱ्हेचा पोषाख करित असे. गोमती-

तीरावरील उद्यानांत पोहोंचल्यावर बादशहा आपल्या टोपीच्या छिद्रांत बोट घालून बोटाभोंवती टोपी फिरवूं लागला ! अझूनपर्यंत कोणाच्याहि तोंडांतून विनोदात्मक अशी एकहि गोष्ट निघाली नव्हती. अझून हास्याच्या हिः हिः शब्दाला आरंभ झाला नव्हता ! हंसावयाला कशी तरी संधि सांपडावी, म्हणून जो तो इकडे तिकडे पाहूं लागला; परंतु हास्यरसाला उद्दीपक अशी कांहीं गोष्ट किंवा घटना कोणाच्याच दृष्टीस पडेना ! नबाब रोषन–उद्–दौला तर किती वेळ तरी हंसावयाकरितां तोंड वासून तयार होऊन राहिला होता ! बादशहाच्या तोंडांतून लहानसें तरी मौजेचे भाषण बाहेर पडते कधीं आणि सर्वांच्या अगोदर दांत विचकून हंसून आपल्या रसिकतेचे व गुणग्राहकतेचे प्रदर्शन आपण करितों कधीं, असें त्याला होऊन गेलें होतें ! परतु सर्वांच्याच दुर्दैवाने आज बादशहाने अगदीं मूकव्रत धारण केले होते! पूर्वीच्या दरबारांतील विदुषकांप्रमाणे किंवा मैत्रेयांप्रमाणे नित्य नव्या नव्या हास्यविनोदाच्या गोष्टी सांगणें सर्वांनांच साध्य नसते ! नासीरच्या खास दरबारांत तशाप्रकारचा कोणी रसिक, विनोदी विदुषक किंवा मैत्रय नव्हता; आणि ह्मणूनच ख्यालीखुशालीच्या किंवा नाचरंगाच्या वेळीं अनेक लावण्यवती नवयौवना रमणी नासिरुद्दिनाच्या सभोंवतीं बसत असत! बादशहाच्या खास दरबारांत खऱ्या विनोदाच्या भाषणाने जरी हशा पिकत नसे, तरी बादशहाच्या भोंवतीं बसलेल्या रमणीगणांच्या अश्लील हावभावांनीं तेथील सभासदांची हंसतां हंसतां मुरकुंडी वळे ! तेंहि साधलें नाहीं, तर निदान त्यांच्या तोंडाकडे पाहून तरी सभासदांनां हंसण्याची संधि मिळे ! परंतु या वेळीं उद्यानांत त्या तन्वगी रमणीवृंदाच्या ऐवजीं दाढी मिशीवाले मोठे मोठे लठ्ठ साहेब बादशहाच्या भोंवती बसले होते ! त्यांनां पाहून भीतीने मनुष्यांची प्लीहाच फुटावयाची–मग हंसूं कसें येणार ? अर्थात्, या वेळच्या बैठकींतून हास्यरसाला अगदींच हद्दपारी झाली होती ! शेवटीं, शोधतां शोधतां नबाब रोषन–उद्–दौल्याला एकदाचे हंसावयास कारण मिळालें ! नासीर आपल्या अंगुलीभोंवतीं टोपी फिरवित आहे, हे पाहून ही हंसावयाला चांगली संधि आहे असें त्याला वाटलें व तो ''वहावा ! वहावा ! क्या बात है ! क्या मजा है ! '' असें ह्मणून फिदिफिदि हंसावयाला लागला ! वजिराची रसिकता पाहून बादशहानेंहि किंचित स्मित करून आपली गुणग्राहकता व्यक्त केली ! आतां आपण हंसलो नाहीं, तर आपण आपलें कर्तव्य केलें नाहीं असें होईल, असा विचार करून बादशहाचे इतर ' आपके वास्ते ' दोस्तहि खदखदा हंसूं लागले !

राजा दर्शनसिंह हाच नासीरच्या खास दरबारचा विदुषक होता. वास्तविक हंसावयाला खरें कारण नसतांहि नबाब रोषन-उद्-दौला सर्वांच्या अगोदर हंसून बादशहाचें प्रियपात्र होण्याचा यत्न करित आहे, असें पाहून राजा दर्शनसिंह त्याच्यावर ईर्षेनें अगदीं जळूं लागला. आपल्या रसिकतेचें प्रदर्शन करून सर्वांनां आपण हंसवावें व रोषन-उद्-दौल्यावर कडी करून दाखवावी, या हेतूनें दर्शनसिंह मोठ्यानें ह्मणाला " मुलके जामानियांच्या टोपीला भोंक ! "

' मुलके जामानियांच्या टोपीला भोंक ' हे शब्द दर्शनसिंहाच्या तोंडांतून निघतात न निघतात, तोंच बादशहा खदिरांगाराप्रमाणें लाल डोळे करून रागानें त्याच्याकडे पाहूं लागला. इतर दोस्तांनींहि हंसावें ह्मणून तोंड उघडलें होतें; इतक्यांत बादशहाचा रंग पाहून त्यांनीं आपल्या हातांनीं तोंड दाबून धरिलें ! समोरच्या मेजावर जोरानें हात आपटून नासीर मोठ्यानें ओरडला "रोषन ! रोषन ! या साल्या बंडखोराला येथल्या येथें बांधून ताबडतोब तुरुंगांत घेऊन जा आणि याचा शिरच्छेद कर ! "

याप्रमाणें बादशहाला एकाएकीं कोपाविष्ट झालेला पाहून सर्वांनां फार आश्चर्य वाटलें ! परंतु इतर कोणाशीं एक शब्दहि न बोलतां बादशहानें राजा दर्शनसिंहाच्या हातापायांत लोखंडी बिडया ठोकण्याबद्दल रोषन-उद्-दौल्याला हुकूम केला.*

---

* His capricious Majesty has just degraded his chief favourite—the Sejanus of Lucknow, the Maharaja Dursun Sing, who has been put in chain, his food defiled, and his turban removed and kicked by Mehturs. His relations and followers have all likewise been disgraced, and new darogahs appointed to his numerous offices. The Prime Minister, his bitterest enemy is living in one of the apartments of the palace, to be in immediate attendance on the king, and every moment dreading a similar ebullition of wrath from his royal master. This state of things arises, it is supposed, from an intrigue with the exiled queen Mother.

—*Asiatic Journal, April 1836, Page 261.*

बादशहाच्या हुकुमाप्रमाणें एका क्षणाचाहि विलंब न करितां रोषन-उद्-दौल्यानें बादशहाच्या बॉडी गार्डांच्या ( शरीररक्षक ) कॅप्टनला दर्शनसिंहाच्या हातापायांत बेडया घालून कारागृहांत घेऊन जाण्याबद्दल हुकूम केला. त्याप्रमाणे कॅप्टन दर्शनसिंहाला घेऊन ताबडतोब कारागृहाकडे निघाला.

इकडे बादशहा रागानें अगदीं लाल होऊन गेला होता. जमिनीवर जोरानें पाय आपटून तो ओरडला " संध्याकाळ व्हायच्या पूर्वी याचा शिरच्छेद झाला पाहिजे! रोषन ! ऐकलेंस ? या बदमाष दर्शनसिंहाचा शिरच्छेद आज सायकाळचे आंत झाला पाहिजे ! "

दर्शनसिंहाला तुरुंगांत पाठविल्यावर रोषन-उद्-दौला त्याच्या शिरच्छेदाची व्यवस्था करण्याकरितां ताबडतोब गेला. बादशहाहि हत्तीवर बसून राजवाड्याकडे निघून गेला. राजा दर्शनसिंहाला कोणत्या अपराधावरून कारागृहांत पाठविले, तसेच त्याला प्राणदंडाची शिक्षा कां झाली, हें नासीरच्या इंग्रज दोस्तांनां कांहीं केल्या कळेना! परंतु नासीरला यासंबंधीं प्रश्न करण्याची छाती एकालाहि झाली नाहीं.

नासीरचा बाप गाजीउद्दिन हैदर हा नासीरचा पुत्र म्हणून स्वीकार करण्यास कबूल नव्हता. लोकांत असा प्रवाद होता कीं, तत्कालीन इंग्रज रेसिडेंटला नासीरनें दोन कोट रुपये देऊन अयोध्येची गादी प्राप्त करून घेतली. ' मुलके जामानियांच्या टोपीला भोंक ' या दर्शनसिंहाच्या शब्दांचा नासीरनें असा अर्थ केला कीं ' मुलके जामानियांनां राजमुकुट न्यायानें मिळालेला नाहीं-त्यांच्या राजमुकुटांत छिद्र आहे ! मुलके जामानिया हे कांही गादीचे खरे वारस नव्हत! ' दर्शनसिंहाच्या शब्दांचा बादशहानें याप्रमाणें अर्थ करून त्याला राजद्रोही ठरवून त्याचा शिरच्छेद करण्याचा हुकूम केला. नासीर हा अयोध्येचा स्वतंत्र बादशहा होता. आपल्या राज्यांतील प्रजेसंबंधीं वाटेल तसा व्यवहार करावयाला त्याला पूर्ण अखत्यारी होती. गव्हर्नर जनरल किंवा अयोध्येंतील इंग्रज रेसिडेंट यांन त्याच्या हुकुमांत हस्तक्षेप करण्याचा मुळींच अधिकार नव्हता. फक्त इंग्रज अधिकारी किंवा अयोध्येंतील इंग्रज रहिवासी यांनां कांहीं शिक्षा करावयाची असल्यास मात्र बादशहाला इंग्रज सरकारची परवानी घ्यावी लागे ! राजा दर्शसिंहाला बादशहानें प्राणदंड केला, ही बातमी इंग्लिश रेसिडेंटच्या कानांवर गेली; परंतु बादशहाच्या हुकुमांत हात घालावयाचें त्यानें साफ नाकारलें ! या कामांत इंग्रजसरकारला हात घालण्याचा मुळींच अधिकार नाहीं, असें त्यानें स्पष्ट सांगितलें !

वाड्यांत परत आल्यावर नासीरनें आपल्या इंग्रज दोस्तांपैकीं इंग्रज शिक्षकास विचारिलें "मास्तर ! राजद्रोह करणारास इंग्लंडचा बादशहा मीं केली अशीच शिक्षा करतो ना ?"

शिक्षकाने उत्तर दिले "मुलके जामानिया ! इंग्लडचे राजे राजद्रोह्यांना आपल्याप्रमाणे कैद करून कारागृहांत टाकतात; परतु त्यांला शिक्षा द्यावयाची ती मात्र रीतीप्रमाणें न्याय करून देतात."

"असे काय? तर मग आम्हींहि तसेंच करूं."

बादशहाचें हे उत्तर ऐकून शिक्षक आतुरतेनें म्हणाला "मुलके जामानिया! आपण तर राजा दर्शनसिंहाचा शिरच्छेद करावयाला हुकूम दिला आहे नबाब रोषन-उद्-दौला त्याचा शिरच्छेद करण्याच्या अगदीं तयारीत असेल !"

शिक्षकाच्या या भाषणाला नासीरने कांही उत्तर दिलें नाही; परंतु शिक्षक राजा दर्शनसिंहाचा हितेच्छु होता. तो पुनः बादशहाला म्हणाला "मुलके जामानिया! आपला हुकूम होईल तर मी आपला हा अभिप्राय आतांचे आतां जाऊन नबाब रोषन-उद्-दौल्याच्या कानांवर घालतों."

नासीर मोठ्या सकटांत पडला! त्याला वाटलें होते कीं 'इग्लंडचा राजाहि राजद्रोह्याला आपणाप्रमाणेच प्राणदंडाची शिक्षा देतो,' असें इंग्रज शिक्षक आपणाला उत्तर देईल. बादशहाच्या दोस्तांपैकीं कोणीहि त्याच्या हातून एखादे कृत्य अन्यायाचें झालें आहे असें त्याच्या तोंडावर म्हणण्याचें साहस कधींहि करित नसे. नासीर तर दर्शनसिंहाचा शिरच्छेद करावयाचा हुकूम देऊन चुकला होता; व तो हुकूम परत घेण्याची त्याची मुळींच इच्छा नव्हती. म्हणून तो एक शब्दहि न बोलतां स्तब्ध राहिला.

परंतु नासीरचा इंग्रज शिक्षक आपली चिकाटी सोडीना ! 'मौनं संमतिलक्षणं' असें समजून तो बादशहाला म्हणाला "मुलके जामानिया! तर मग मी हा निघालों! आतांचे आतां जाऊन आपला हुकूम मी रोषन-उद्-दौल्याला कळवितों."

असें ह्मणून शिक्षक तावडतोब घोडा दौडित कारागृहाजवळील वधस्थानाकडे निघाला. तेथें पोहोंचतांच एक अत्यंत हृदयद्रावक देखावा त्याच्या दृष्टीस पडला. दर्शनसिंहाच्या अंगावरील बहुमुल्य वस्त्रालंकार त्याच्या अंगावरून काढून घेऊन शिपाई लोक आपसांत वांटून घेत आहेत ! एक छिन्नभिन्न मलिन वस्त्र त्याला नेसावयास दिलें आहे ! त्याची बंदूक आणि स्वर्णखाचित तलवार नबाब

रोषन-उद्-दौल्या;च्यापुढें पडली आहे. दर्शनसिंहाच्या मस्तकावरील पांच हजार रुपये किंमतीचा सोनेरी मंदिल एकजण मेहतर आपल्या पायांखालीं तुडवित आहे! दर्शनसिंहाचा शिरच्छेद करण्यापूर्वी त्याचा मंदिल मेहतरांकडून पायाखालीं तुडवावा, व त्याच्या बंदुकीचे आणि तरवारीचे मोडूनतोडून तुकडे करावे, असा बादशहानें हुकूम केला होता!

दर्शनसिंह मलिन वस्त्र नेसून सामान्य शिपायाच्या खाटल्यावर उघडाबोडका अधोमुख बसला होता. अधिकाराच्या तोऱ्यांत अनन्वित कर्मे करून सर्वांकडे तुच्छतेनें पहाणारा दर्शनसिंह तो हाच काय?

बादशहाचा इंग्रज शिक्षक ऊर्ध्वश्वासानें घोडा दौडित दौडित कारागृहापाशीं येऊन पोंहाचल्यावर त्यानें ताबडतोब नबाब रोषन-उद्-दौल्याला बादशहाचा हुकूम सांगितला. हा हुकूम ऐकतांच रोषन-उद्-दौल्यानें वरवर खूब आनंद झाल्यासारखें दाखविलें, परंतु तो मनांत अत्यंत दुःखित झाला! दर्शनसिंहाला कारागृहांत नीट बंदोबस्तानें कोंडून ठेवून तो आपल्या घरीं निघून गेला.

नबाब रोषन-उद्-दौला निघून गेल्यावर शिक्षकानें गुप्तपणें कारागृहांत प्रवेश केला. त्याला पहातांच दर्शनसिंह गद्गद कंठानें म्हणाला "भाई! मुलकेजामानियांच्या टोपीला भोंक असें जें मी म्हणालो, तें केवळ लोकांनां हंसविण्यासाठीं! बादशहाला काय ठाऊक नाहीं, कीं, त्याच्या बापानें आणि चुलत्यांनीं त्याला अयोध्येची गादी मिळूं नये म्हणून जेव्हां प्रयत्न चालविले होते, तेव्हां इंग्रज रेसिडेंटला दोन कोट रुपये भरून कार्यसिद्धि करून घेण्याची मसलत पहिल्याप्रथम त्याला मींच दिली होती तें! रेसिडेन्सींतील कारभारी गुलाम हुसेनखां, याच्याशीं संधान कोणीं बांधिलें? भाई! बादशहा माझा प्राण खचित घेणार! रोषन माझा कट्टा शत्रु आहे. तो बादशहाला भर दिल्याखेरीज रहाणार नाहीं. मी मृत्युबद्दल मुळींच डरत नाहीं! परंतु मला माझ्या मुलांमाणसांबद्दल दुःख होत आहे. तुझ्या इंग्रजांनां म्हणें स्त्रियांविषयीं अत्यंत आदरभाव असतो. तेव्हां मित्रधर्माला जागून माझ्या मृत्यूनंतर माझ्या स्त्रीपुत्रांचे रक्षण करण्याचा तुम्ही प्रयत्न करा. त्यांचें रक्षण करण्याविषयीं रेसिडेंट साहेबांला माझ्यातर्फें तुम्ही विनति करा कसा झालो तरी मी शिपाईगडी आहें. शिपायांची मारहाण मी अनायासानें सहन करीन; परंतु माझ्या स्त्रिया, माझ्या मुली, अंथरुणाला खिळलेला माझा वृद्ध पिता, आणि माझे दोघे मुलगे यांनां मारहाणीचें दुःख व यातना कधींहि सहन होणार नाहींत. रोषन माझें

घरदार लुटल्याशिवाय खास रहाणार नाहीं! लूट करतांना माझ्या स्त्रिया, मुली, मुलगे या सर्वांनां तो मारहाण केल्याशिवाय रहाणार नाहीं यास्तव त्यांचें रक्षण करण्याच कृपा करून तुम्ही प्रयत्न करा. माझ्या अंगावर जे कांहीं मूल्यवान वस्त्रालंकार होते, ते सगळे माझ्याकडून शिपायांनीं हिसकावून नेले. मोठया शिकस्तीनें मीं ही हिऱ्याची अंगठी लपवून ठेविली होती. ही अंगठी तुमच्याजवळ ठेवा. रोषनने माझे घरदार लुटल्यावर सर्व कुटुंब अनाथ होईल; त्यांनां अन्नाचीहि भ्रांति पडेल! असा प्रसंग आला म्हणजे ही अंगठी विकून हिची जी किंमत येईल ती माझ्या कुटुंबाला द्या. माझी सर्व स्थावरजंगम धनदौलत बादशहा जप्त केल्याखेरीज रहाणार नाहीं!"

असें म्हणून दर्शनसिंहानें एक हिऱ्याची अंगठी शिक्षकाच्या स्वाधीन केली. त्या अंगठीचे मूल्य कमींत कमी पन्नास हजार रुपये झालें असतें!

शिक्षक दर्शनसिंहाला म्हणाला "भाई! येथें मी अधिक वेळ राहिलों तर तें तुम्हाला अनिष्ट आहे! तुमच्या सांगण्याप्रमाणे सर्व व्यवस्था करण्याविषयीं मी प्राणापलीकडेहि मेहनत करीन. मला खात्रीपूर्वक वाटतें कीं, रोषनच्या मसलतींत तो न्हावगंडाहि सामील आहे!" असें म्हणून शिक्षक तेथून निघून गेला.

इकडे, रात्रीं नवाब रोषन--उद्--दौला व सर्फराजखां असे दोघे मिळून बादशहाकडे गेले. बादशहा सर्फराजखांला म्हणाला "मास्तर म्हणतो कीं, इंग्लंडचे राजेसाहेब राजद्रोह्याला पहिल्यानें पकडून बंदिखान्यांत टाकतात आणि नंतर रीतीप्रमाणें त्याचा न्याय करून त्याला काय शिक्षा करावयाची ती करतात!"

सर्फराजखां म्हणाला "मुलके जामानियां! विलायतेंतील मोठमोठ्या जज्जांची मी हजामत करित होतों. विलायतेंतील गोष्टी मास्तरला काय ठाऊक? त्यानें साऱ्या जन्मांत एखादा जज्ज तरी पाहिला आहे?"

"तर मग अशा प्रसंगीं विलायतेचे बादशहा काय करतात?"

सर्फराजखां जरा रागावल्यासारखें करून म्हणाला "विलायतेचे राजे काय करतात? राजद्रोही माणसाची सर्व मालमत्ता पहिल्याप्रथम जप्त करतात! त्याच्या कुटुंबांतील मंडळी आणि त्याचे आप्तइष्ट या सर्वांनां फांशीं देतात. त्याच्या घरादारावरून गाढवांचा नांगर फिरवितात!"

'घरावरून गाढवांचा नांगर फिरवितात' हे सर्फराजखांच्या तोंडचे शब्द ऐकतांच नवाब रोषन-उद्—दौला हात जोडून म्हणतो "मुलकेजामानियां!

विलायतेंतील न्याय आणि आमच्या कुराणांतील न्याय अगदीं एक आहेत! कुराणांत लिहिलें आहे 'दुष्मनाच्या घराचा तलाव करावा!' कुराणाच्या आज्ञेप्रमाणें दर्शनसिंहाच्या घराचा तलाव केला पाहिजे! "

बादशहा म्हणाला " कुराणांत जसें सांगितलें आहे तसेंच कर! दर्शनाच्या कुटुंबांतील सर्व मंडळीला फांशीं देण्याची व्यवस्था कर! आणि त्याच्या घराचा खणून खणून तलाव बनव! "

बादशहाचा असा हुकूम होतांच दर्शनसिंहाचें घरदार जप्त करण्यासाठीं आणि त्याच्या कुटुंबांतील सर्व मंडळीला धरून आणण्यासाठीं रोषन-उद्—दौल्यानें रात्रीच्या रात्री ताबडतोब शिपाई पाठविले.

प्रिय वाचकहो! दर्शनसिंह घोर पापी होता. त्याची ही दुर्दशा पाहून तुमच्या मनाला कांहीं कष्ट होऊं नयेत, हें साहजिकच आहे. कारण, त्याचीं कृत्येंच तशी घोर होतीं! परतु दर्शनसिंहाच्या निरपराधी तीन स्त्रिया, त्याचा वृद्ध पिता, आणि त्याचे पुत्र आणि कन्या यांची प्रस्तुतची शोचनीय स्थिति पाहून तुमच्या नेत्रांतून अश्रुविसर्जन झाल्याशिवाय रहाणार नाही, अशी आमची खात्री आहे!

अयोध्येच्या नबाबाच्या शिपायांनां आणि सैनिकांनां नियमित वेळीं पगार मिळत नसे. त्यांच्या वेतनासंबंधीं अगदीं अंदाधुदी होती. अर्थात्, त्यांनां आपला चरितार्थ चालविण्याकरितां हक्कदार चोर ( Licensed Decoits ) बनावें लागे! राज्यांत लूट करून त्यांनां आपली उदरपूर्ति करणे भाग पडे! दर्शनसिंहाचें घरदार जप्त करावयासाठीं अशाच लायसेन्स्ड चोरांबरोबर नबाब रोषन-उद्—दौल्याने आपले विश्वासू लोक पाठविले होते. दर्शनसिंहाच्या बापाजवळ कमींत कमी पन्नास लक्ष रुपयांची माया आहे, अशी सर्वांची समजूत होती—नव्हे, पक्की खात्री होती! नबाब रोषन-उद्—दौल्यानें मनांत ठरविलें होतें की, दर्शनसिंहाच्या मालमत्तेच्या जप्तींत आपण स्वतः कमींतकमीं दहा लक्ष रुपयांवर तरी हात मारावयाचाच! यासाठींच सरकारी शिपायांबरोबर त्याने आपल्या विश्वासांतले लोक पाठविले होते.

शिपाई मोठया आनंदानें दर्शसिंहाच्या घरीं गेले. तेथें गेल्याबरोबर प्रथम त्यांनीं दर्शनसिंहाच्या तीन स्त्रिया, चार तरुण मुली, दोन लहान मुली, दोन मुलगे व त्याचा वृद्ध पिता यांनां बंदिवान केलें! दर्शनसिंहाच्या घरांतील सर्व जिन्नस, वस्त्रें-पात्रें बाहेर काढून त्यांपैकीं बरेच जिन्नस त्यांनी आपसांत वांटून घेतले!

बाकी राहिलेलें सामानसुमान त्यांनीं लखनौला पाठवून दिलें; परंतु दर्शनसिंहाच्या घरांत रोख एक लक्ष रुपयांपेक्षां त्यांनां अधिक कांहीं मिळालें नाहीं! नबाब रोषन-उद्-दौल्याच्या लोकांनीं दर्शनसिंहाच्या स्त्रियांस आणि मुलींस मारहाण करावयास शिपायांस हुकूम केला. "रोख रुपये कुठे लपवून ठेवले आहेत तें सांगा; नाहींतर आम्ही तुमची इज्जत नष्ट करूं !" असें दर्शनसिंहाच्या बायकामुलींस शिपाई भय दाखवूं लागले ! दरोडेखोरांप्रमाणें ते त्यांनां मारहाण करून त्यांचा अनेक प्रकारांनीं छळ करूं लागले. त्यांचे सर्व दागदागिने व वस्त्रे त्यांनीं हिरावून नेलीं फक्त नेसलेले एक एक वस्त्र मात्र त्यांच्यां अंगावर होते! छिन्नभिन्न वस्त्रे परिधान करून त्या कशा तरी आपली लज्जा निवारण करित होत्या ! परंतु फाटक्यातुटक्या वस्त्रांनीं त्यांचें सर्व शरीर कसें झांकलें जाणार? अनावृतवक्ष, अर्धनग्न अशा दर्शनसिंहाच्या बायका व मुली आणि त्याचा आसन्नमरण, वातव्याधिग्रस्त, आंथरुणाला खिळलेला वृद्ध पिता जयपालसिंह यांनां लखनौला पाठविण्यांत आलें.

* * * * * * *

कानपुराहून लखनौला जाणाऱ्या रस्त्याच्या बाजूला, लखनौपासून सुमांर दहा कोस अंतरावर दर्शनसिंहाचा वाडा होता. याच रस्त्यानें लोक नेहमीं लखनौला जात येत असत! पंडित अयोध्यानाथ, काशीनाथ आणि बुंदिया हीं याच रस्त्यानें लखनौला जात होतीं. दर्शनसिंहाच्या वाड्याशीं येतांच त्यांनां आढळून आलें, कीं, वाड्याजवळ पुष्कळ शिपाई जमले असून कांहीं स्त्रिया व पुरुष यांनां कैद करून ते लखनौकडे निघाले आहेत. त्यांच्याबरोवर सामानसुमानाच्या बऱ्याच गाड्या होत्या. जवळपासच्या लोकांजवळ चौकशी करतां त्यांनां समजलें कीं, अयोध्येच्या बादशहाच्या हुकुमनें शिपायांनीं दर्शनसिंहाचे घरदार लुटलें व दर्शनसिंहाचा बाप, स्त्रिया व मुलें यांनां फांशीं देण्याकरितां ते लखनौला नेत आहेत ! अझूनहि कांहीं लोक दर्शनसिंहाच्या घरांतील जमीन खणून पुरून ठेवलेल्या धनाचा शोध करित होते!

हा वृत्तांत ऐकतांच काशीनाथाला पूर्वीच्या एका गोष्टीचें स्मरण झालें! तो हिमालयावर असतांना त्याला प्राणदान देणाऱ्या हिमाचलवासी महापुरुषानें सांगितलें होतें कीं "तुझ्या बहिणीच्या युक्तीनें दर्शनसिंह सपरिवार विनाश पावेल व नासिरुद्दिन हैदरहि प्राणांस मुकेल!"

काशीनाथाला यां गोष्टीचें स्मरण होऊन तो अयोध्यानाथाला आतुरतेनें म्हणाला " अयोध्यानाथ! मला वाटतें, मानकुमारीच्या युक्तीनें दर्शनसिंह व त्याचें सर्व कुटुंब यांची अशी दुर्दशा उडाली असावी! दर्शनसिंहासारखा नीच, पापी, अधम तोच! त्या राक्षसाच्या एक एक भयंकर कर्मांचें स्मरण झालें म्हणजे अंगाची लाही होऊन जाते! त्याच्यासाठीं कुणालाहि दुःख होणार नाहीं. उलट, त्याला पापाचें योग्य प्रायश्चित मिळालें असे वाटून सर्वांनां फार आनंद होईल! परंतु दर्शनसिंहाच्या निरपराध स्त्रिया, मुलें व त्याचा वृद्ध पिता यांची मला फार कींव येते! त्यांनां वांचविण्याचा प्रयत्न आपल्याला केला पाहिजे. चला, आपण यांच्याबरोबर लखनौला जाऊ! "

दर्शनसिंहाच्या कुटुंबाची दुर्दशा ऐकून अयोध्यानाथाचें कोमल हृदय तत्क्षणीं विरघळलें. काशीनाथाच्या म्हणण्याला त्यानें ताबडतोब संमति दिली; परंतु त्या काळस्वरूपी शिपायांनां पाहून भीतीनें बुदिया रडूं लागली! तिचें सर्व शरीर भयानें थरथर कांपूं लागलें! त्या शिपायांबरोबर जाण्यास ती कांहीं केल्या कबूल होईना; परत कानपुरास जाण्याविषयीं हट्ट घेऊन बसली! काशीनाथानें अनेक गोष्टी सांगून मोठ्या कष्टाने तिची समजूत घातली! अयोध्यानाथ आणि बुदिया हीं निराळया रस्त्याने लखनौला जावयाला निघालीं व काशीनाथ त्या शिपायांच्या बरोबर निघाला.

काशीनाथ व त्याच्याबरोबरची मंडळी दर्शनसिंहाच्या वाड्यापासून सुमारें पांचसहा कोस गेल्यावर दिवस मावळला. रात्रीं तेथेंच तळ देण्याचें शिपायांनीं ठरविलें. शिपाईलोक आपापल्या भोजनाची व्यवस्था करूं लागले. कोणी दगडाच्या चुली घालूं लागले, कोणी जवळच्या झऱ्याचें पाणी आणूं लागले, कोणी डाळरोटी तयार करण्याच्या तजविजीस लागले. दर्शनसिंहाचीं मुलें व स्त्रिया एके ठिकाणीं एका झाडाखालीं बसलीं होतीं. दर्शनसिंहाचा बाप जयपालसिंह एका सामानाच्या आडींत मृतप्राय पडला होता.

दर्शनसिंहाच्या कुटुंबांतील मंडळीशीं बोलावयाला ही संधि ठीक आहे, असें काशीनाथाला वाटलें; परंतु या प्रसंगीं त्यांच्याशीं काय बोलावें, व कसें बोलावें, याची त्याला मोठी पंचाईत पडली! त्यांच्यावर नुकताच आलेला घोर प्रसंग, त्यांनां झालेली मारहाण, त्यांनां सोसाव्या लागलेल्या यातना व अपमान यांचें दुःख त्यांच्या मनांत अगदीं ताजे होते! त्यांच्याशीं कांहीं बोलावयाचें म्हणजे

त्यांनां गत गोष्टींचें स्मरण देऊन मुद्दाम दुःखावर डागण्या दिल्यासारखें होणार ! ती सर्व मंडळी या वेळीं दुःखाश्रु ढाळित अधोवदन करून बसली होती; परंतु त्यांच्या मुक्ततेचा प्रयत्न करावयाचा तर त्यांच्याशीं बोलल्याशिवाय गत्यंतरच नाहीं, असा विचार करून काशीनाथ हळुहळू त्यांच्या जवळ गेला. त्यांची ती हृदयद्रावक अवस्था पाहून त्याच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह वाहूं लागला !

दर्शनसिंहाच्या वडील मुलाचे वय पंधरासोळा वर्षांपेक्षां अधिक नव्हतें. काशीनाथानें खूण करून त्याला आपल्याजवळ बोलाविलें; परंतु त्या मुलाच्या मनांत कांहीं विचार येऊन तो जागेवरून उठला नाहीं. तेव्हां काशीनाथ त्याच्याजवळ जाऊन ह्मणाला " बाळ ! मी कांहीं बादशहाचा मनुष्य नाहीं मला भिऊ नकोस. या संकटांतून तुमची सुटका करण्याची खटपट करायलाच मी येथें आलो आहें. "

काशीनाथाचें हें स्नेहपूर्ण भाषण दर्शनसिंहाच्या स्त्रिया व मुली यांच्या कानांवर जातांच त्या तोंड वर करून काशीनाथाकडे पाहूं लागल्या. संन्याशाप्रमाणें पोषाख केलेल्या काशीनाथाला पाहून रडतरडत त्या ह्मणाल्या " या घोर संकटांतून आमचं रक्षण करील, असा कुणी दयाळु पुरुष नाहीं का ? "

काशीनाथ त्यांनां धीर देऊन ह्मणाला "तुह्मी घाबरू नका ! या संकटांतून तुमची मुक्तता करायला मी जिवापलीकडे प्रयत्न करीन. "

काशीनाथाचे हे आश्वासनयुक्त भाषण ऐकून त्यांपैकीं सर्वांत जास्त वयाची स्त्री त्याला ह्मणाली "महाराज ! बादशहा आह्मांला फांशीं देणार आहे; खुशाल देवो ! पण आमच्या या मुलांचं अन् तिकडचं रक्षण व्हायला कांहीं उपाय नाही का? " बोलतांबोलतां ती स्त्री स्फुंदूं लागली.

त्या स्त्रीच्या या भाषणावरून काशीनाथ समजला, कीं, ही स्त्री दर्शनसिंहाची बायको असावी; परंतु मनाची खात्री करून घ्यावी ह्मणून त्यानें विचारिलें " माई ! आपण राजा दर्शनसिंहाच्या पत्नी काय ? "

दुसऱ्या दोन स्त्रियांकडे अगुलीनिर्देश करून ती ह्मणाली " मी आणि या दोघी —अशा आह्मी तिघीजणी त्यांच्या स्त्रिया आहो. "

त्या दोघी स्त्रियांचें वय फार नव्हतें. त्यांपैकीं एक तर दर्शनसिंहाच्या मुलीपेक्षांहि लहान होती ! काशीनाथ ह्मणाला " माई ! या दोघीजणी लहान आहेत. मी सांगेन तें यांनां बोलतां येणार नाहीं. या सभ्य व मोठ्या घराण्यांतील स्त्रिया—त्यांतून वयानें लहान ! परपुरुषासमोर बोलण्याचें धाडस यांच्यानें व्हावयाचें नाहीं. ह्मणून

मी आपल्याला सांगेन तसें लखनौच्या इंग्रज रेसिडेटकडे आपल्यालाच बोललें पाहिजे. मी सांगेन तसें आपण त्याच्याजवळ बोललांत, म्हणजे बादशहाला आपल्या केंसालाहि धक्का लावतां येणार नाहीं! मी त्यावेळीं आपल्याजवळच असेन. रेसिडेंट-जवळ बोलायला आपण मुळींच भिऊं नका. रेसिडेंट मोठा दयाळु आहे. बरें, इतकें असूनहि रेसिडेंटजवळ बोलायला आपल्याला भय वाटलें, तर माझ्याकडे बोट दाखवून त्याला सांगा कीं, हा माझा भाऊ आहे. मला आपल्याजवळ जें कांहीं सांगायचे आहे, तें हाच आपल्याला सांगेल."

त्या स्त्रीनें काशीनाथाला विचारिलें "रेसिडेंटजवळ मी काय बोलूं?"

काशीनाथ ह्मणाला "आपण लखनौला जाऊन पोहोंचलां, म्हणजे एवढेंच ह्मणा, कीं, मला रेसिडेटसाहेबांची भेट घ्यावयाची आहे. फांशीं जावयाच्या पूर्वी मला माझी संपत्ति इंग्रज सरकारला द्यावयाची आहे! असें आपण ह्मणालांत म्हणजे रेसिडेंट आपल्याला भेटावयास येईल, यांत संशय नाहीं. तो तुमच्याकडे आला म्हणजे मी जें तुह्माला सांगतो, तेवढें सर्व त्याला सांगा."

रेसिडेंटजवळ काय काय बोलावयाचें तें काशीनाथानें दर्शनसिंहाच्या स्त्रीला नीट समजावून सांगितले. तिनेंहि त्याप्रमाणें रेसिडेंटजवळ सांगावयाचें कबूल केले. त्या रात्रीं काशिनाथ त्या मंडळीजवळच राहिला. त्यांनां कांहीं त्रास झाला तर आपल्याकडून होईल तें त्यांनां सहाय्य करावें, असा त्याचा हेतु होता.

दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरच्या सुमारास दर्शनसिंहाच्या परिवारासह शिपाई लखनौला पोहोंचले. दर्शनसिंहाला ज्या तुरुंगांत ठेविलें होते, त्याच तुरुंगांत त्यांच्या कुटुंबांतील मंडळीलाहि पाठविण्यांत आलें. ज्यावेळीं त्यांनां तुरुंगांत आणलें, त्यावेळीं आपला वृद्ध पिता, स्त्रिया, आणि मुलें यांची ती दुर्दशा पाहून तो पाषाणहृदयी दर्शनसिंह मनोवेदनांनीं मूर्च्छित होऊन धाडकन् जमिनीवर पडला! मनुष्य कितीहि कठिण हृदयाचा आणि दुष्ट असो, कांहीं प्रसंगीं त्याचें तें वज्रकठिण हृदय विरघळून लोण्यापेक्षांहि मऊ होतें!

दर्शनसिंहाच्या कुटुंबांतील मंडळी कारागृहांत पडली आहे असें ऐकून दर्शन-सिंहाचा हिताकांक्षी मित्र, बादशहाचा इंग्रज शिक्षक त्या कारागृहांत आला. त्यांची ती दुरवस्था पाहून तोहि अश्रु ढाळूं लागला. दर्शनसिंहाची स्त्री त्याला ह्मणाली, "फांशीं जायच्या पूर्वी मला रेसिडेंटसाहेबांची भेट घ्यायची आहे माझी कानपुरांतील जहागिरी, जमीदारी आणि इतर मालमत्ता इंग्रजसरकारला देण्याची माझी इच्छा आहे."

हें वर्तमान रेसिडेंटला कळवावयाला शिक्षक तावडतोब रेसिडेन्सींत गेला व थोड्याच वेळांत रेसिडेंटास बरोबर घेऊन तुरुंगांत आला. रेसिडेंटला वाटत होतें कीं, फक्त एकट्या दर्शनसिंहालाच काय तो प्राणदंडाचा हुकूम झाला आहे; त्याचा पिता, स्त्रिया, पुत्र कन्या–या सर्व मंडळीलाहि फांशीं देण्याचा हुकुम झाला आहे असें ऐकून त्याला अत्यन्त आश्चर्य वाटलें. बादशहाचा हा धडधडीत अन्याय पाहून त्याला फार राग आला.

रेसिडेंट कारागृहांत येतांच दर्शनसिंहाची ज्येष्ठ स्त्री तशीच अर्धनग्नावस्थेंत त्याच्यासमोर येऊन अश्रुपूर्ण नयनांनीं म्हणाली "साहेब ! हल्लीं देशाचे खरे राजे तुम्ही अहां ! तुम्ही स्वत: एकदा माझी ही दुर्दशा पहा ! मी कुलीन घराण्यांतील स्त्री-परपुरुषाचं मुखहि आम्ही कधीं पहात नाहीं ! परंतु आज अनावृतवक्षानंच तुमच्यासमोर मला यावं लागलं आहे. इंग्रजलोक स्त्रीजातीला फार मान देतात असं मीं ऐकलं आहे. आपला प्राण देऊनहि ते स्त्रीजातीची लज्जा रक्षण करतात, असंहि माझ्या कानांवर आलं आहे; परंतु काय चमत्कार पहा ! त्यांच्याच सरक्षणाखालीं असलेल्या राज्यांत आमच्यावर हा घोर अत्याचार होत आहे ! तुम्ही जवळ येऊन पहा–या माझ्या सवती आणि मुली यांच्या पाठीवर माराचे वळ अझूनहि स्पष्ट दिसत आहेत ! बादशहाच्या दुष्ट शिपायांच्या प्रहारांनीं माझं सर्व शरीर क्षतविक्षत झालं आहे. केवळ इंग्रज सरकारच्या सैन्याच्या भयामुळं—इंग्रजांच्या तोफांच्या भयामुळंच–अयोध्येचे मृतप्राय हिंदु अझूनपर्यंत स्तब्ध बसले आहेत ! तसं नसतं, तर या क्षणीं जिकडेतिकडे बंडाचा भयकर वणवा पेटला असता; आमचं रक्षण करण्याकरतां मृतप्राय हिंदु लोकांच्या क्षीण हातांतील आयुधं सरसावल्याखेरीज राहिली नसतीं ! साहेब ! आतां आम्हांला कळलं, कीं, इंग्रजांच्या तोफा कांहीं अबलांच्या संरक्षणासाठीं नाहींत ! आतां आम्हांला नीट कळून चुकलं, कीं, इंग्रजांच्या तोफा चोर आणि लुटारू यांच्या मदतीकरतां आणि अयोध्येंत चाललेल्या पशुतुल्य अत्याचारांचं समर्थन करण्याकरितांच आहेत ! तुमचं सैन्य आणि तुमचीं शस्त्रास्त्रे अयोध्येतून काढून न्या, कीं आतांचे आतां हजारों लोक नासिरुद्दिन हैदराचा शिरच्छेद करून आम्हांला या चोरांच्या हातून एका क्षणांत सोडवून नेतील ! आम्हांला इथं कुणीं आणलं ? आम्हांला नग्न करून आमचीं वस्त्रं कुणीं हिसकावून नेलीं ! या वीर्यहीन निस्तेज शिपुर्ड्यांची आम्हांला स्पर्श करण्याची काय छाती होती ? साहेब ! हें तुमच्या तोफांच्या शक्तीमुळं झालं आहे–

तुमच्या सैन्याच्या शक्तीमुळं अयोध्येंत हे पशुतुल्य अत्याचार, आणि चोरांचं साम्राज्य माजलं आहे! जर मी खरी पतिव्रता असेन—जर पतीच्या ठिकाणीं माझी अढळ निष्ठा असेल—तर माझ्या आणि या मुलींच्या रक्तापासून भयंकर विद्रोहानल उत्पन्न होईल, आणि त्या वडाग्न्या ज्वाळेंत केवळ लखनौ नव्हे—केवळ अयोध्या नव्हे—तर समग्र भरतखंड जळून खाक होईल—सर्व देशाची धुळधाण उडेल आणि नासिरुद्दिनच्या राज्यासह तुमच्या राज्याचीहि राखरांगोळी होईल!"

इतकें बोलून दर्शनसिंहाची स्त्री शोकानें आणि दुःखानें अचेतन होऊन पडली. तिच्या मागें काशीनाथ उभा होता. त्यानें तिला सांवरून नीट निजविली. नंतर रेसिडेंटजवळ जाऊन तो ह्मणाला " साहेब! ही माझी बहीण! राजा दर्शनसिंहानें शेंकडों अपराध केले असतील; परंतु त्याच्या या स्त्रिया आणि अनाथ लेंकरें यांनीं कोणाचा लवमात्रहि अपराध केला नाहीं. दर्शनसिंहाच्या अपराधांसाठीं यांनां दंड, हा कोणता न्याय? साहेब! आपण तरी मेहेरबानी करून यांचा न्याय करा. आपण जर या कामांत हात घातला नाहीं, आणि बादशहाच्या हुकुमाप्रमाणे जर खरोखरच या निरपराध प्राण्यांला प्राणदंड झाला, तर मी आपल्याला निश्चयपूर्वक सांगतों कीं, याच संन्याशाच्या वेषानें, हातांत हा दंड घेऊन मी समग्र पृथ्वी पर्यटन करीन. युरोप आणि अमेरिका खंडांतील सर्व सुधारलेल्या देशांत जाऊन इंग्रजांच्या राज्यांतील अन्यायाच्या कलंकाचा घोष करीन! आणि मग या पृथ्वीवरील कोणत्याहि देशांत तुम्हांला तोंड दाखवायला जागा उरणार नाहीं! भूतलावरील सर्व देशांनां असें समजून येईल कीं, पैशाच्या लोभानें इंग्रज लोक स्त्रीहत्या आणि पशुतुल्य अत्याचार यांनां साहाय्य करण्यास कमी करित नाहींत!—निरपराध स्त्रियांच्या प्राणविनाशासाठींच अयोध्येंत इंग्रज सैन्य राहिले आहे!"

या वेळीं लखनौचा इंग्रज रेसिडेंट कर्नल लो हा होता त्याला हिंदी आणि उर्दू या भाषा उत्तम रीतीनें अवगत होत्या. दर्शनसिंहाची स्त्री व काशीनाथ हीं दोघेंहि रेसिडेंटशीं हिंदींत बोलत होतीं. त्यांच्या भाषणापैकीं प्रत्येक अक्षर त्याला उत्तम रीतीनें कळत होतें. कर्नल लो दयाळु अंतःकरणाचा होता. दर्शनसिंहाच्या कुटुंबांतील मंडळीबद्दल दर्शनसिंहाच्या स्त्रीनें सांगितलेल्या हृदयविदारक हकीगतीपेक्षां त्यांची सांप्रतची विपन्नावस्था प्रत्यक्ष पाहून रेसिडेंटचें हृदय अत्यंत व्यथित झालें. दर्शनसिंहाच्या स्त्रीचें सांत्वन करून व तिला आश्वासन देऊन तो रेसिडेन्सींत निघून गेला. तेथें जातांच तावडतोब त्यानें बादशहाचा मुख्य वजीर नबाब रोषन-उद्

दौला याला लिहिलें कीं, एका तासाच्या आंत दर्शनसिंहाच्या कुटुंबांतील सर्व मंडळीला जर सोडून देण्यांत आलें नाहीं, तर नबाब रोषन-उद्-दौला याला वजिरीच्या जागेवरून काढून टाकण्यांत येईल ! "

हा खलिता हातीं पडतांच रोषन-उद्--दौल्यानें रेसिडेंटचा हुकूम बादशहाला दाखविला. नासीर आश्चर्यचकित होऊन ह्मणाला " आमच्या राज्यकारभारांत हात घालावयाचा नाहीं, असें इंग्रजसरकारानें कबूल केलें आहे. आतां त्या कबुलीविरुद्ध त्यांनां जातां यावयाचें नाहीं ! "

बादशहा किंवा त्याचें मंत्रीमडळ यांपैकीं कोणालाहि इंग्रजी लिहिण्यावाचण्याचें विशेष ज्ञान नव्हतें ! रेसिडेंटच्या पत्राला उत्तर द्यावयाचें, ह्मणजे पहिल्याप्रथम त्या पत्राचें पांडु भाषेत भाषांतर करून घ्यावें लागे. यामुळें पत्राचें उत्तर जावयास सहजच तीनचार दिवस लागत. या प्रसंगीं नबाब रोषन-उद्-दौला स्वतः रेसिडेंटकडे गेला. रेसिडेंटने मोठ्या बेपर्वाईने त्याची भेट घेतली आणि या भेटींत विशेषसे अगत्य दाखविले नाहीं व त्याला कमीअधिक बोलावयास संधि दिली नाहीं. रेसिडेंटनें रोषन-उद्-दौल्याला निक्षून सांगितलें कीं " एक तासाच्या आंत जर दर्शनसिंहाच्या कुटुंबांतील सर्व मंडळीची सुटका झाली नाहीं, तर नासीरला पदच्युत करण्याबद्दल मी गव्हर्नर जनरलला लिहीन व तुलाहि आजच्याआज वजिरातीवरून काढून टाकीन ! दर्शनसिंहालाहि प्राणदंड करतां कामा नये ! प्राणदंडाशिवाय बादशहाला वाटेल ती शिक्षा त्याला करतां येईल. दर्शनसिंहाची मालमत्ता जप्त करण्यासंबंधानें तुह्मांला वाटेल तें करा, त्यासंबंधाने मला कांहीं ह्मणावयाचें नाहीं!"

रेसिडेंटचा असा दृढनिश्चय पाहून वजीर नबाब रोषन-उद्-दौला व स्वतः बादशहा अत्यंत भयभीत झाले. दुसरा कांहीं इलाज नाहीं असें पाहून त्यांनीं दर्शनसिंहाच्या कुटुंबांतील सर्व मंडळीला सोडून दिलें. त्याच रात्रीं ती मंडळी लखनौतून निघून गेली.

बादशहाच्या हुकुमावरून नबाब रोषन-उद्-दौल्यानें दर्शनसिंहाला एका लोखंडी पिंजऱ्यांत बद्ध करून लखनौपासून पन्नास कोस अंतरावरील उत्तरेकडच्या प्रदेशांतील एका किल्ल्यांत पाठवून दिलें व तेथें त्याला एका मुसलमान अधिकाऱ्याच्या देखरेखीखालीं ठेविलें.

रोषन-उद्-दौल्यानें पाठविलेल्या लोकांनीं दर्शनसिंहाच्या घरांत जिकडे तिकडे खूब खणून पाहिलें, परंतु त्यांनां कोठेंहि गुप्त धन मिळालें नाहीं. रोषन-उद्-

दौल्याला वाटत होतें कीं, दर्शनसिंहाचा वाडा जमीनदोस्त करून त्याची सर्व जमीन खणून पाहिली म्हणजे कोठेंतरी लपविलेली संपत्ति सांपडेल, यासाठींच तो वेळोवेळीं बादशहाला म्हणत असे कीं "दर्शनसिंहाचा न्याय कुराणाप्रमाणें झाला पाहिजे. दुष्मनाच्या घराचा तलाव करावा." या कुराणाच्या आज्ञेचा अर्थ असा कीं, त्याचें घरदार जमीनदोस्त करून तेथें जमीन खणून खरोखरचाच तलाव बनविला पाहिजे. आपण पाठविलेले लोक अगदीं थोडे होते आणि त्यांनीं वाड्याची जमीन केवळ वरवरच खणली. तेथें खरोखर तलावच करावयास पाहिजे होता!

## प्रकरण २१ वें.

# पापाचें प्रायश्चित्त.

* Blessed is the man that walketh not in the counsel of the ungodly * * * * * The ungodly are not so: but are like the chaff which the wind driveth away.

—*Book of Psalms.*

राजा दर्शनसिंह तुरुंगवास अनुभवित असतां इकडे दुसरीकडे निराळयाच गोष्टी घडून आल्या. वाचकांस आठवत असेलच कीं, दर्शनसिंह तुरुंगांत जाण्याच्या पूर्वी तीन दिवस कैलासेश्वरीला बादशहासमोर पाठविण्यांत आले होते. राजवाड्यांतून बगीच्यांत परत येऊन कैलासेश्वरीनें मानकुमारीला आपली समग्र हकीगत निवेदन केली. तिची ती हकीगत ऐकतांच मानकुमारीच्या मनाची खात्री होऊन चुकली कीं, आतां उद्यां कैलासेश्वरीला राजवाड्यांत नेण्यांत आल्यास दुष्ट बादशहा बलपूर्वक तिला झनान्यांत नेल्याशिवाय रहाणार नाहीं. आतां काय करावें ! या गोष्टीचा त्या दोघीजणी ती सारी रात्र उद्विग्न चित्तानें विचार करूं लागल्या. बिचाऱ्या त्या असहाय, दीन अबलांची मति कुंठित झाली. तरणोपायाचा कांहींच मार्ग त्यांनां दिसेना. शेवटीं अनेक तर्कवितर्कांनतर त्यांनीं निश्चित केलें कीं, आपल्याला बरें वाटत नाहीं, प्रकृति नादुरुस्त आहे, असा बहाणा करून कसाबसा उद्यांचा दिवस तरी बादशहाकडे जाण्याचें टाळावें. दर्शनसिंहानें अथवा बादशहाचे लोकांनीं जुलूम करून तिला बादशहाकडे ओढून नेण्याचा प्रयत्नच केला, तर कैलासेश्वरीनें आत्महत्त्या करावी, परंतु दैवयोगानें दुसरे दिवशीं कांहीं कैलासेश्वरीला बादशहाकडे घेऊन जाण्यासाठीं शिबिका आली नाहीं. कैलासेश्वरी आत्महत्त्या करण्यासाठीं दररोज अगदीं तयारी होऊन बसली होती, परंतु या तीन दिवसांत तिला बादशहाकडे नेण्यासाठीं कोणी आलेच नाहीं. पुढें चवथ्या दिवशीं राजा दर्शनसिंहाची तुरुंगांत रवानगी झाली. आपल्या यजमानाची ही स्थिति पहातांच

---

* जे नास्तिक, परमेश्वराचें जे मुळींच भय बाळगित नाहींत, अशांपासून दूर रहाणारा तोच धन्य होय! * * * नास्तिकांच्या ठायीं तें सामर्थ्य नाहीं! वाऱ्याप्रमाणें सहज उडून जाणाऱ्या भुसकटाप्रमाणेंच ते होत!

—बुक ऑफ साम्स.

दर्शनसिंहानें बगीच्याभोंवतीं ठेवलेले पहारेकरी भयभीत झाले व आपापल्या जीवाचे रक्षणार्थ वाट फुटेल तिकडे पळून गेले ?

दर्शनसिंहाला पकडला त्या दिवशीं सायंकाळीं दर्शनचा अत्यंत विश्वासू नोकर साधुसिंह घाबऱ्याघुबऱ्या बगीच्यांत येऊन त्या वृद्ध स्त्रीस एकातांत भेटून म्हणाला "माईसाहेब, सर्वनाश झाला ! बादशहानें महाराजांस फांशीं देण्याचा हुकुम फर्माविला आहे. कप्तानसाहेब महाराजांस तुरुंगांत घेऊन गेले आहेत. आपणा सर्वांस इथे जी कांही संपत्ति, दागदागिने, पैसाअडका आहे ते सर्व घेऊन आज रात्रीं इथून पळून जाण्यास महाराजांनीं सांगितले आहे."

म्हातारीच्या मरनकावर जणो वज्राघात झाला. तिची कंबरच खचली. वेड्यासारखी होऊन ती म्हणाली "आम्ही बायका माणसं. या रात्रीच्या वेळीं कुठं पळतां येईल ?"

साधु म्हणाला "मोठाच दुर्धर प्रसंग प्राप्त झाला आहे ! आतां वेळ अवेळ, रात्र अन् दिवस पहाण्याला मुळींच अवकाश राहिला नाहीं. तुम्ही माझ्याबरोबर आत्तांचे आतां गुप्त वेषानें निघण्याची एकदम तयारी करा. पैसाअडका, दागदागिने जें कांहीं असेल तें माझ्या हवालीं झटपट करा, बादशहाचे लोक वाडा लुटण्यास आत्तां येतील!"

"मान्नाची काय व्यवस्था करायची ? दुखण्यानं ती पोर मरायला पडली आहे. तिला घोड्यावर बसून पळयला कसं येईल ?"

"यावेळी त्या अवदसेचा तुम्ही विचारहि करूं नका ! इथेंच त्या कारटीला रानांत मरूंद्या. रात्रीं हिंस्र श्वापदे तिचा फडशा उडवितील. सकाळीं तिचे हाडुकहि इथें दिसणार नाही !"

म्हातारी या वेळीं अगदींच गांगरली होती. तिनें विचारलें "बादशहानं फांशीचा हुकुम कां बरं दिला ?"

साधु म्हणाला "बुदियेची पोरगी गगा हिला बेगमच्या अंतःपुरांत पाठविल्यामुळें हा सारा घोटाळा झाला."

आतां अधिक विचार करण्यास अवकाशच उरला नव्हता. घाईघाई करून म्हातारीनें आपल्या दागिन्यांची पेटी आणि मोहरांनीं भरलेली एक मोठी पेटी बाहेर काढली. या पेटींत सुमारें पांच हजार मोहरा होत्या. म्हातारीनें जयपालाल डुबाडून हा धनसंचय केला होता. ह्या दोन्ही भारी वजनाच्या पेट्या उचलून नेणें

साधुसिंहाच्या शक्तीच्या बाहेर होतें. इकडे, ती म्हातारी आणि साधुसिंह यांपैकीं कोणाच्यानेंहि ह्या एवढ्या मोठ्या संपत्तीचा मोह तोडवेना. त्याचप्रमाणें दागिन्यांच्या पेटीतहि नाहीं म्हटले तरी कमींत कमी लाख दीड लाखाचा विषय होता. म्हातारीनें बादशहाच्या दरबारांत नाचगान करून आणि लखनौतील अमीरउमरावांनां सुप्रसन्न करून हे दागिनें संपादन केले होते. तिच्या आयुष्याची ही कमाई होती. पुढयांत केवढाहि दारुण प्रसंग उभा राहिला तरी एवढया भारी किंमतीच्या दागिन्यांचा मोह का तिच्याने तोडवतो! उपायांतर नाहीं असे पाहून भारी किंमतीच्या दागिन्यांप्रमाणें वजनानेंहि भारी असलेली ती पेटी म्हातारीनें आपल्या डोक्यावरून नेण्याचे ठरविलें. साधुसिंहानें सुवर्णमोहरांच्या पेटीचा भार आपल्या मस्तकावर घेण्याचें ठरविलें. एवढी तयारी झाल्यावर म्हातारी कैलासेश्वरीला म्हणाली "कपाळकरंटे ! अजूनहि तूं स्वस्थच बसली आहेस का ? चल ऊठ, तुझ्या दागिन्यांची पेटी घे, अन् पड बाहेर झटपट ! "

परंतु मानकुमारीला एकटी टाकून जाण्यास कैलासेश्वरी मुळींच कबूल झाली नाहीं. मानकुमारी हृदयविदारक शोक करित कैलासेश्वरीला आग्रह करूं लागली " वन्सं ! तुम्ही असा भलताच हट्ट नका करूं गडे ! यांच्याबरोबर तुम्ही जा. माझी अभागिनीची तुम्ही मुळींच काळजी करूं नका. ईश्वराच्या कृपेनं तुम्ही आपल्या भावाला भेटलां, तर आपलं हरवलेलं धन पुन: सांपडलेलं पाहून त्यांच्या दु:खाचं थोडबहुत सांत्वन होईल. तुमची त्यांची भेट झालीच तर ह्या अभागिनीच्या मृत्यूची हकीगत तुम्ही तिकडे कळवा. तुम्ही इथं राहूं नका ! जाच तुम्ही यांच्या बरोबर ! "

कैलासेश्वरीनें यावेळीं जो हृदयभेदक आक्रांत मांडिला, त्याचें वर्णन करण्यास आमची लेखणी असमर्थ आहे ! मानकुमारीच्या गळयास घट्ट मिठी मारून ती स्फुंदतस्फुंदत म्हणाली " वहिनी ! तुला एकटी टाकून मी जाऊं ? या देहांत थोडीशी धुगधुगी असेपर्यंत कांहीं ती गोष्ट माझ्यानं व्हायची नाहीं ! तूं माझी जन्माची सोबतीण ! माझी आई, बाप, गुरू, हितकर्ती—माझं सर्व कांहीं तूं—अन् तुला टाकून मी जाऊं ? तुला टाकून मी कधींच जाणार नाहीं ! तुला कारागृहांत घेऊन गेल्यास मीहि तुझ्याबरोबर कारागृहांत येईन ! तूं मृत्यु पावल्यास आत्महत्या करून तुझ्या पायापाशीं मीहि प्राण सोडीन ! जिकडे तूं तिकडे मी ! तुला मी कधींहि सोडणार नाहीं ! "

मानकुमारीहि ढळढळ अश्रु ढाळूं लागली. तिच्या मुखांतून आतां शब्द फुटेना आणि ती सांगणार तरी काय ? कैलासेश्वरी तिला टाकून जाण्यास सम्मत होईल असें कांहींच चिन्ह दिसेना. त्या बिचाऱ्या असहाय अबला एकमेकींच्या गळयास मिठी मारून मूकरूदन करित बसल्या; परंतु दुष्ट म्हातारीच्या पाषाणहृदयास यत्किंचितहि द्रव आला नाहीं. कैलासेश्वरीला मानकुमारीच्या मिठीपासून जोराने ओढून कर्कश स्वराने ती ओरडली " अवदसे ! चल ! तूं फुटक्याच कपाळाची ! बादशहाची आतां तुझ्यावर नजर पडण्याची आशा उरली नाहीं. "

कैलासेश्वरीनें म्हातारीच्या हातास हिसडा देऊन तुच्छतादर्शक मुद्रा करून म्हटलें " तुझ्याबरोबर मी केव्हांहि येणार नाहीं : "

कैलासेश्वरी ही अत्यंत शांत मुलगी होती. आजन्मांत तिनें केव्हांहि कोणाशींच उद्धटपणा केला नव्हता. तिचा स्वभाव, प्रकृति पाहिली म्हणजे ही मानवी कन्या नसून जणों देवबालाच आहे, असेंच सर्वांनां वाटे. आज ती म्हातारीशीं अशी बेपर्वाईनें वागलेली पहातांच म्हातारीला मोठें आश्चर्य वाटलें; परंतु आश्चर्यांत पडण्याचा तो वेळ नव्हता. भारी किंमतीचे दागिने आणि पांच हजार मोहरा सुरक्षित कशा रहातील, यांतच म्हातारीचे चित्त या वेळीं जास्त गुंतलें होतें. तूना येत नाहीं असें पाहून " तर मग मर सटवे इथंच ! " असें म्हणून दागिन्यांची पेटी घेऊन साधुसिंहाच्या मागून म्हातारी तत्काल बाहेर पडली. साधुसिंह पळून गेल्याचें ऐकतांच त्याच्या लोकांनींहि रातोरात पोबारा केला. कांहीं वेळ पूर्वी माणसांच्या रहदारीनें, हत्तीघोड्यांच्या शब्दांनीं गजबजलेला तो बगीचा जनशून्य झाला. वरील दोघी अनाथ अबला कायत्या त्या भयाण जागेंत एकमेकींस घट्ट बिलगून राहिल्या.

शुक्रवार रात्रीं बगीच्यांतून सर्व मंडळी पळून गेली होती. शनिवार, रविवार, सोमवार आणि मंगळवार हे चार दिवस मानकुमारी आणि कैलासेश्वरी त्या दोघीनीं बगीच्यांतील त्या एकांतस्थानीं मोठ्या भीतींत आणि दुःखांत काढले. आपल्याला नेण्यासाठीं बादशहाकडून लोक येतील, ही त्यांनां क्षणोक्षणीं भीति वाटत होती; व तसा प्रसंग आलाच तर आत्महत्या करून जीवन्मुक्त होण्याचा निश्चय करून त्या डोळयांत तेल घालून बसल्या होत्या. याप्रमाणे एकीकडून बादशहाकडून येणाऱ्या काळ पुरुषांच्या भीतीने, व दुसरीकडून त्या एकांतस्थानांत दिवसाढवळ्या किंकाळ्या फोडणाऱ्या व्याघ्र आस्वलादि भयकर हिंस्र पशूंच्या दाढेत पडण्याच्या

भीतीनें त्या अगदीं गर्भगळित होऊन गेल्या होत्या. या प्रसंगांतून कसें मुक्त व्हावें, हें त्यांनां कांहींच सुचेना. घरांत अन्नसामुग्री भरपूर होती. लखनौला आतां आपल्याला बरेच दिवस रहावें लागेल, अशा समजानें म्हातारीनें दाण्यागोट्याची पुष्कळ दिवसांची बेगमी करून ठेविली होती; परंतु प्रति पळास भीतीनें थरथर कांपत असलेल्या त्या असहाय पोरींनां जेवणाखाणाची शुद्धिहि नव्हती व शुद्धि असती तथापि त्यांच्यानें अन्न तयार करवलें नसतें !

मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे कीं, दर्शनसिंहाच्या मंडळीस बादशहाचे शिपाई लखनौला घेऊन येत असतां रस्त्यांत अयोध्यानाथ आणि काशीनाथ यांची त्यांच्याशीं भेट झाली होती. काशीनाथ या शिपायांच्या टोळीबरोबर लखनौकडे चालला होता; परंतु अयोध्यानाथ आणि बुदिया ही निराळ्याच रस्त्यानें लखनौला निघालीं होतीं.

मंगळवारीं सकाळीं अयोध्यानाथ आणि बुदिया हीं वाट चालतां चालतां लखनौपासून सुमारे तीन कोसांवर असलेल्या एका दाट जंगलांत आलीं. तीं उभयतां कांहीं रस्ता चालून जाताहेत तों जवळच झाडींत कोणा मनुष्याच्या विव्हळण्याचा शब्द त्यांच्या कानीं पडला. अयोध्यानाथाच्या हृदयांत दयेचा संचार होऊन त्या विपद्ग्रस्त मनुष्याची स्थिति पाहून शक्य असल्यास त्याला कांहीं सहाय्य करावें म्हणून जिकडून तो आर्त स्वर येत होता तिकडे हीं उभयतां गेलीं. तेथें जाऊन पहातात तों एक वृद्ध स्त्री मरणोन्मुख अवस्थेंत विव्हळत पडली आहे. जागजागीं तिच्या शरीरावर तरवारीचे भयंकर घाव झाले आहेत व त्या जखमांतून सारखें रक्त वहात आहे.

तो हृदयद्रावक देखावा पहातांच अयोध्यानाथ विरघळून गेला. म्हाताऱ्या स्त्रीच्या तोंडाकडे दृष्टि जातांच बुदियेनें तर एकदम किंकाळीच फोडली. त्या जखमी म्हातारीला अद्याप थोडीशी शुद्धि होती. बुदियेला तिनें तत्काळ ओळखलें. " बुदिया– सोसवत नाहीं ग–प्राण चालला–साधू–दगा–" इत्यादि अस्पष्ट शब्द उच्चारित भयंकर वेदनांनीं जखमी झालेली म्हातारी तळमळूं लागली. तिच्या त्या हृदयविदारक वेदना आणि अंतःकरणाचें पाणी करणारा तिचा तो विकळाप बुदियेच्यानें पहावेना. तीहि एकसारखी रुदन करूं लागली. रडतरडतच तिनें म्हातारीला विचारलें " माझी सीता कुठं, सीता कुठं आहे ? "

म्हातारी क्षीण स्वरानें म्हणाली " ती माझ्याबरोबर आली नाहीं. "

" मग ती आतां आहे कुठं ? लवकर सांगा ! "

" बगीच्यांत—लखनौ— "

सीता लखनौला आहे हें कानीं पडतांच बुंदियेचा जीव किंचित् थाऱ्यावर आला. तिनें ह्मातारीला आतां विचारलें " तुमची ही अशी दशा कुणीं केली ? "

ह्मातारीला बोलण्यास मुळींच शक्ति नव्हती. अति कष्टानें अस्पष्ट शब्दांनीं तिनें सांगितलें " साधुसिंहाबरोबर आपण कानपुरला जात होतों—साधूनें आपला खून केला-पैसे दागिने सारे बुचाडून तो पळून गेला—"

ह्मातारीनें आणखींहि कांहीं शब्द उच्चारले, परतु बुंदियेला ते स्पष्ट समजले नाहींत. तरी तिच्या एकंदर सांगण्याचा आशय बुंदियेला कळून चुकला. साधुसिंहाबरोबर ह्मातारी कानपुरला चालली होती; दागिन्यांची भारी पेटी घेऊन तिच्यानें अधिक चालवेना शनिवार आणि रविवार हे दोन दिवस लखनौच्याजवळच एका खेड्यांत उभयतांनीं लपून काढले. सोमवारीं सायंकाळीं साधुसिंह आपल्याबरोबर तीन मनुष्यें घेऊन आला. त्या दिवशीं मोठ्या पहांटेस उठून ही मंडळी कानपुराकडे जावयास निघाली होती. उजाडण्यापूर्वींच रस्त्यांत ह्मातारीचा खून करून तिला जंगलांत टाकून दागिन्यांची आणि मोहरांची पेटी घेऊन साधुसिंह पळून गेला.

म्हातारीने लवकरच डोळे मिटले. आतां बुंदिया अयोध्यानाथाला म्हणाली " ह्याच थेरडीनं सीतेला लखनौला नेलं होत जयपालसिंहाची राख ती हीच ! "

बुंदियेचें हें भाषण ऐकतांच अयोध्यानाथ मग तेथें क्षणभरहि थांबला नाहीं. दोघेंहि मोठ्या वेगानें लखनौच्या रस्त्यास लागलीं व दोन प्रहरांच्या सुमारास लखनौला आलीं.

## प्रकरण २२ वें.

# विनाशाचें बीज.

* The integrity of the upright shall guide them : but the perverseness of the transgressors shall destroy them.

—*Proverbs . Chap XI—3.*

कुकर्म पापाचरण, सदसद्विवेकबुद्धीचा खून आणि कर्तव्याचें उल्लंघन हीं हळुहळू मनुष्याच्या अधःपाताचें बीज पेरित असतात आपल्या घोर दुष्कर्मांचे, अघोर पातकांचे अवश्यभावी फळ चुकविणे कोणालाहि साध्य नाही दर्शनसिंहाला कारागृहांत पाठविल्याच्या दुसऱ्याच दिवशीं नासीरनें आपली आई जनाबे आलि हिला राजवाड्यांतून हांकून लावेली. बादशहाच्या ह्या भयंकर अत्याचारामुळे जनाबे आलीने आपल्या दासदासी आणि अंतःपुरांतील स्त्रीसैनिक यांसह राजवाडा सोडून लखनौपासून तीन कोसांवरील मूसाबाग येथें जाऊन वास्तव्य केलें. दर्शनसिंहाचा कारागृहांत योजना आणि लगेच जनाबे आलीचा बादशहाने चालविलेला भयंकर छल, ह्या दोन्ही गोष्टींचा कांहीं तरी निकट संबंध असावा, असा लोकांचा साहजिकच समज झाला व जो तो आपापल्यापरी नानाप्रकारचे तर्कवितर्क करू लागला. इकडे नासीरनेसुद्धां स्वतः रसिडेंटला कळविलें कीं, दर्शनसिंह हा आपल्याला पदच्युत करण्याच्या कारस्थानांत गुंतला असून जनाबे आलि बेगमेचें त्या कृत्यांत पूर्ण अंग आहे ! परंतु वस्तुस्थिति प्रकार याच्या अगदी उलट होता. दर्शनसिंहाचे आणि जनाबे आलि बेगमेचे पुष्कळ दिवसांपासून हाडवैर होते. जनाबे आलि बेगमेचा मानभंग करून दरबारांतील तिचे वजन आणि मानमरातब कमी करण्याविषयीं दर्शनसिंहानें बादशहाची मारखा विच्छा पुरविला होता अर्थात्, ही उभयतां एकत्र मिळून कोणतेंहि गूढ कारस्थान रचतील, असा यत्किंचित् संभव नव्हता सारांश, या एकदर भानगडींतील रहस्य काय आहे, हें कोणालाच बरोबर कळलें नव्हतें आणि समजण्यास मार्ग तरी काय होता ? बादशहाच्या अगर बेगमांच्या अंतःपुरात कोणाचाहि प्रवेश नव्हता आणि या अंतःपुरातून तर रोजरोज नाना प्रकारच्या गूढ कारस्थानांचा

---

* सत्वशील मनुष्यांची सचोटी त्यांना मार्गदर्शक होइल. परंतु उन्मार्गगाम्यांचा दुराग्रह त्याचा अधःपात करील. —प्रोव्हर्ब्ज, भाग ११–३.

खल होत असे. नाना प्रकारचे अश्लील व्यवहार, कपट, घातपात, खून इत्यादि असंख्य अनन्वित कृत्ये ह्या अंतःपुरांत गुपचूपपणे पण अव्याहत चालत होतीं. वाचकांला बरोबर घेऊन त्या नरकपुरींत प्रवेश करण्याचें पातक आमच्यानें करवत नाही दर्शनसिंहाचा कारागृहवास आणि जनाबे आलीवरील अत्याचार यांचे कारण धूर्त वाचकांनी केव्हांच ताडले असेल. * * *

पंडित अयोध्यानाथ बुन्दियेला बरोबर घेऊन लखनौ येथें येऊन पोहोचला. लखनौशहरची त्याला पूर्ण माहिती होती चार महिन्यांपूर्वी तो मानकुमारीचा शोध करित सुमारें सहा महिने लखनौमध्यें राहिला होता हें वाचकांनां आठवतच असेल. लखनौत असतांना तेथील कोनाकोपऱ्यांत हिंडून त्यानें मानकुमारीचा तपास चालिवला होता. अर्थात्, लखनौशहरच्या लहानमोठ्या गल्ल्याकुच्यांची त्याचप्रमाणें तेथील मोठमोठे बगीचे, राजमहाल, नबाब, अमीरउमरावादिकांचे वाडे वगैरे एकूनएक भागांची त्याला पक्की माहिती होती रानांत बुंदियेच्या प्रश्नास त्या म्हातारीच्या तोंडून सीता (कैलासेश्वरी) बगीच्यांत असल्याचे वर्तमान त्याला समजतांच तो लखनौमधील एकूनएक बगीचे धुडू लागला. लखनौत असे बगीचे अनेक होते चारपांच बगीच्यांत तपास केल्यावर अयोध्यानाथ मूसाबागेत आला. मागील खेपेस अयोध्यानाथ लखनौत असतांना ही मूसाबाग अगदीं ओसाड पडलेली होती; परंतु आज तीच मूसाबाग असंख्य लोकांच्या कोलाहलाने गजबजलेली त्याच्या दृष्टीस पडली. आंत जाऊन चौकशी करतां तेथील एकाकडून त्याला कळून आलें कीं, गाझीउद्दीन हैदराची मुख्य बेगम जनाबे आलि हिला बादशहाने राजवाड्यांतून हांकून लावल्यामुळें ती येथे येऊन राहिली आहे.

ही मूसाबाग राजवाड्यापासून सुमारें तीन कोस अंतरावर होती. मूसाबागेंत अयोध्यानाथ अगदीं थकूनभागून आला होता. वाटेच्या श्रमाने बुन्दया तर अयोध्यानाथापेक्षांहि अधिकच थकली होती. एक पाऊलहि पुढे टाकण्याचे अवसान तिच्या अंगांत राहिलें नव्हतें. म्हणून तीं दोघें मूसाबागेंतील पुष्करणीजवळ एका झाडाच्या सावलीत विश्रांति घेत बसलीं. तीं उभयतां याप्रमाणे झाडाखालीं बसलीं आहेत, इतक्यांत जनाबे आलि बेगम राहिली होती त्या हवेलींतून एक स्त्री कडेवर कळशी घेऊन पाणी नेण्यासाठी पुष्करणीवर आली. ही तरुण स्त्री पाण्याची कळशी डोकीवर घेऊन पुष्करणीच्या पायऱ्या चढत असतां बुन्दियेची तिच्या तोंडाकडे सहज नजर जाऊन ती एकदम " गंगा गंगा " असें ओरडत

तिच्यापाशीं धावतच गेली! ती तरुण स्त्रीहि विस्मित होऊन बुन्दियेकडे टकटक पहात उभी राहिली. बुन्दियेला पहातांच कळशी जमिनीवर ठेवून ती तरुण स्त्री बुन्दियेच्या गळ्याला मिठी मारून रुदन करूं लागली. बुन्दिया रडत रडत ह्मणाली "मला एकटी टाकून तूं इकडे कशी आलेस ? गंगा! तुझ्यान इकडे राहवलं तरी कस? रात्रंदिवस तुझ्यासाठीं रडून रडून माझे डोळे सुजले अन् तू इकडं स्वस्थ राहिली आहेस ?"

ही स्त्री दुसरी कोणीहि नसून बुन्दियेची मुलगी गंगा होय, हे वाचकांनी ताडलेंच असेल. सांप्रत ही अफझल उल्निसा नांवाने ओळखली जात असे. जनाबे आलि बेगमेच्या महालांतील मंडळी हिला छोटे कप्तानसाहब म्हणत असत कारण, तेथील स्त्रीसैनिकांवर ही लेफ्टनेंट कप्तान होती. उभयता मायलेकी बराच वेळ रुदन करून अमळ शांत झाल्यावर बुन्दिया म्हणाली "गंगा, तूं आत्ताचे आत्तां माझ्याबरोबर चल. आपण काशीत अगर वृंदावनात राहून भिक्षा मागून पोट भरू, पण याउपर तूं या नरकपुरींत राहूं नको!"

गंगा आवेशाने म्हणाली "ज्या दुष्टांनीं माझा छळ केला, त्यांचा कुलक्षय केल्याशिवाय मी इथून हलेन? ते कद्धींहि व्हायच नाही!"

"कुणीं तुझा छळ केला?"

"दुष्ट साधुसिंह अन् बादशहा, या दोघांनी."

"साधुसिंह तर मेला त्या थेरडीचा खून करून तिच्या दागिन्यांची पेटी घेऊन फरारी झाला आहे; त्याला तूं आतां कसा अन् कुठं शोधणार?"

"मेला पळून पळून जाणार आहे कुठं? लखनौत आपल्या घरीच कीं नाहीं? त्याचं घर मला ठाऊक आहे!"

"पण बादशहानं तुझं काय केलं!"

"एनाति बेगमेची जी विटंबना केली तीच माझीहि केली!"

"ही एनाति बेगम कोण? अन् तिचं काय झालं?"

बुन्दियेचा हा प्रश्न ऐकतांच गंगेला रडण्याचा अधिकच हुंदका आला. ती कांपत कांपत म्हणाली "त्या मेल्या पातकी बादशहाचं नांवहि उच्चारूं नकोस! आपला मुलगा मना जान याचा खून करण्याचा मेल्यानं व्यूह रचिला होता; परंतु त्याची आई जनाबे आलि बेगम हिनं बादशहाचा तो खुनशी बेत

सिद्धीस जाऊं दिला नाहीं मना जानला तिनं बादशहाच्या हवाली केलं नाहीं तेव्हां मायलेकांत झगडा झाला. आपल्या आईला पकडण्यासाठीं मेल्यानं शिपाई पाठविले. त्या शिपायांबरोबर आमची मोठी लढाई झाली. मींहि त्या लढाईंत होत्यें. त्या युद्धांत आम्ही बादशहाच्या शिपायांचा पराजय करून त्यांनां हांकून लाविलं. पुढं ह्या मेल्यानं आपल्या बापाच्या मुताही बेगमांपैकी एका बेगमेला जबरदस्तीन आपल्या रंगमहालांत नेण्याचा प्रयत्न केला. बादशहाच हें अधर्माचरण पाहून त्याच्या आईनं त्याला सांगितलं कीं, वडिलांच्या मुताही बेगमेशी मुलान निका लावणं हे पाप आहे.* परंतु कामांध बादशहा कांहीं केल्या आपल्या आईची ही आज्ञा ऐकेना. बादशहाच्या ह्या जुलुमास भिऊन ही मुताही बेगम जनाबे आलीच्या महालांत येऊन लपून राहिली व आपलं रक्षण करण्याविषयीं तिची विनवणी करू लागली. जनाबे आलीनं तिला धीर दिला व बादशहाच्या ह्या पापाचरणाबद्दल त्याचा धिक्कार केला. तेव्हां बादशहानं ह्या मुताही बेगमेला बळजबरीनं धरून नेण्यासाठीं पुनः शिपाई पाठविले. जनाबे आलि बेगमेच्या हुकुमानं मीं ह्या शिपायांनांहि हांकून लावलं. त्या मेल्यानं माझ्यावर हा दावा धरून मला पकडून नेल व माझ्या हातापायांत बिड्या ठोकून अन् गळ्यांत दोरी बांधून मला गाढवावर बसवून साऱ्या बाजारांत हिंडवून माझी धिंड काढली. मेल्यान माझ्या पाठीवर चाबूक मारवून पाठीचं रक्त काढलं, माझी छी थू

---

* The following circumstance is related as having recently occurred, and some say was the real cause of the royal [illegible]abble bet[illegible]een the king and his mother. The king made proposals of marriage to one of his father's begums, which the lady declined, on the plea that such a union would violate the Mahommedan Law. His Majesty, however, was determined to be consistent and so persevered in his intention of espousing his step-mother. The lady at last escaped from the palace and took refuge with the Padsha Begum, and His Majesty demanded the refugee. The old lady made a noise about it, and the king joined in the wordy war with all his might. —*Asiatic Journal, April 1835*, ***Page 237.***

करविली अन् एनाति बेगमेचे नाककान कापून तिला जशी सोडून दिली होती तसे माझेहि नाककान कापून मग मला सोडण्यासाठी म्हणून मला कैदेत टाकिलं. पुढं मी युक्तीनं कैदेतून पळून आल्ये. "

बुन्दिया आश्चर्यानें ही सारी हकीगत ऐकत होती. तिने विचारले " पण ही एनाति बेगम कोण? "

गंगा ह्मणाली " एनाति बेगम ही बादशहाची एक मुताही स्त्री होती. ही कुदसिया बेगमेच्या महालांत रहात असे. कुदसिया बेगमेन बादशहाशी भांडून रागान विष पिऊन आत्महत्या केली. यांत एनाति बेगमेचा कांहीएक अपराध नव्हता; परतु कांहीएक विचारपुस न करितां बादशहान तिचे नाककान कापविले. "*

गंगेची ही हकीगत संपल्यावर बुंदिया तिला घरी येण्याविषयी पुन: वारवार आग्रह करूं लागली, परतु गगा कांहीं केल्या बुंदियेचे ह्मणणे कबूल करीना. साधुसिंह आणि बादशहा यांच्या नरडींचा घोट घेऊन त्यांच्याविषयींचा आपला सूड उगविल्याशिवाय लखनौतून आपण पाऊलहि उचलणार नाही, असा तिच्या मनाचा झालेला ठाम निश्चय गंगेच्या त्या वेळच्या त्या एकदर बोलण्याचालण्यावरून आणि अंगविक्षेपांवरून बुंदियेला स्पष्ट कळून आला तेव्हां नतर तिचे मन वळविण्याच्या भानगडीत न पडतां तिनें तिला विचारलें " बर, माझ्या सीतेची तुला कांहीं खबर कळली आहे का? ती थेरडी तिला घेऊन इकडे आली होती व तिला ह्मणे कुठल्याशा बगीच्यांत ठेविली आहे. "

गंगा ह्मणाली " बादशहाबागेजवळच एका बगीच्यांत काश्मीरहून आणलेल्या मान्ना नांवाच्या एका कचनीबरोबर तिला ठेवल आहे ह्मणतात. मला कांही नक्की माहीत नाहीं. बरं, आतां तू जा, मी तुला पुढं भेटेन." असे ह्मणून गगा ऊर्फ अफझल उल्निसा महालाकडे निघून गेली.

---

* Inayetee Begum and others, who had connived at, or were privy to, Her Majesty's (Koodsha Begum) taking poison, are paraded through the bazar every day, with their heads uncovered, with collars on their necks, and irons on their legs and are tortured and beaten to such a degree, that they must shortly sink under their sufferings One lack of rupees in cash, besides property, found in their houses, has been confiscated and lodged in the royal treasury. —*Asiatic Journal, April 1835, Page 237.*

पुढें बुंदियेनें अयोध्यानाथापाशीं येऊन त्याला एकंदर हकीगत सांगितल्यावर तीं उभयतां तशींच बादशहाबागेकडे निघालीं. बादशहाबाग ही गोमती नदीच्या पैलतीरावर होती. तेथे जाऊन तपास करतां जवळच एका बगीच्यांत बादशहाच्या पंजाबी कंचनी रहात असल्याचे त्यांनां समजलें. ह्या बगीच्याच्या चाऱ्ही बाजूंस उंच दगडी भिंत असून मुख्य दरवाजा सुदैवाने यावेळीं उघडाच होता. अयोध्यानाथ आणि बुन्दिया त्या दरवाजानें एकदम आंत गेलीं. बगीच्याचे मध्यभागी असलेल्या एका लहानशा हवेलीच्या द्वारापाशी तीं जाऊन पहातात तो दार बंद असून जिकडेतिकडे सामसूम झाले आहे. तथापि हवेलीमध्ये कोणीतरी अस्फुट स्वरानें परस्परांशी बोलत असल्याची चाहूल त्यांनां ऐकू आली. अयोध्यानाथानें हलकेच दारावर दोनतीन वेळ थाप मारली, परंतु आंतून उत्तर येईना. पुढे मोठमोठ्यानें दरवाजा ठोठाविला; दार उघडण्याविषयीं पुष्कळ प्रकारें विनंति करण्यांत आली; तथापि कशाचाच कांहींएक उपयोग होइना. सुमारें अर्धा तासपर्यंत असा प्रकार चालला होता.

इकडे बाहेर कोणी दरवाजा ठोठावतें आहे हें पाहून मानकुमारी आणि कैलासेश्वरी भीतीने अगदी गर्भगळित होऊन गेल्या. बादशहाचे लोक आपल्याला धरून न्यावयास आले आहेत, असाच त्यांच्या मनाचा ठाम निश्चय होऊन एकमेकींनां घट्ट बिलगून त्या परमेश्वराचा धांवा करीत स्तब्ध बसल्या होत्या. दरवाजा उघडण्याचा कांहींच मार्ग न सुचल्यामुळे बुंदिया शेवटीं मोठ्यानें आणि गहिंवरून ह्मणाली "सीता, अग आह्मी इतके श्रम सोसून उन्हातान्हांतून तुह्मांला भेटण्यासाठीं आलों, अन् आह्मांलाहि तूं दार उघडित नाहीस? मी बुदिया आहें–कानपुरहून आल्यें आहे–बाहेर येऊन पहा तरी!"

तथापिहि दार उघडले नाहीं! कैलासेश्वरी दार उघडण्यास वारंवार उठत होती, परंतु मानकुमारीनें तिला घट्ट मिठी मारून उठूच दिलें नाहीं. ती ह्मणाली "त्या मेल्यांचंच हे कांहींतरी कपट असेल. आह्मांला फसविण्याकरितां ही कांहीं तरी युक्ति रचिली असेल."

कैलासेश्वरी आणि मानकुमारी या दोघींचे या बाबतींत बरेच तर्कवितर्क चालले होते. भोळ्या स्वभावाच्या आणि जगाचा यत्किंचितहि अनुभव नसलेल्या कैलासेश्वरीला यांत कांहीं कपट असेल असें मुळींच वाटत नव्हतें. मानकुमारीचा तिच्या उलट समज झाला होता. शेवटीं पुष्कळ भवति न भवति होऊन कैलासे-

श्वरीनें दाराच्या फटींतून पाहून यावें व खरोखर बुंदियाच आली असेल तरच दार उघडावें, असें ठरून व त्याप्रमाणें पक्की खात्री झाल्यावर बऱ्याच वेळानें एकदाचें दार उघडण्यांत आलें. कैलासेश्वरी पहाते, तों दारांत बुंदियेच्या शेजारीं भगवीं वस्त्रें परिधान केलेला एक तरुण पुरुष उभा आहे !

दरवाजा उघडतांच बुन्दिया कैलासेश्वरीच्या गळयाला एकदम मिठी मारून " सीता सीता! " असे ह्मणत मोठ्यामोठ्याने रुदन करू लागली. बुंदियेला पाहून कैलासेश्वरीचे डोळेहि भरून आले. बुंदियेनें अयोध्यानाथाकडे बोट करून कैलासेश्वरीला सांगितले " सीता ! हा तुझा भाऊ, तुम्हांला सोडविण्यास आला आहे. ठगांनीं याला मारलं नव्हतं; तुझ्या बापाचीच त्यानी हत्या केली होती. "

कैलासेश्वरीने स्नेहयुक्त अश्रुपूर्ण दृष्टीने अयोध्यानाथाच्या मुखाकडे पहातांच त्याने आपल्या प्रियभगिनीस एकदम हृदयाशीं धरलें. कैलासेश्वरी त्याच्या स्कंधावर मस्तक ठेवून अश्रुवर्षाव करू लागली. सन्यासवेषधारी अयोध्यानाथानेंहि बराच अश्रुवर्षाव केला.

नंतर तीं तिघेहि मानकुमारी मरणोन्मुख अवस्थेत पडली होती त्या खोलींत गेलीं. मानकुमारीला बिचारीला उठून बसण्याचे हि सामर्थ्य नव्हते! केवळ अस्थिपंजर, मृतप्राय झालेल्या आपल्या प्रिय पत्नीची ती भयकर अवस्था पहातांच अयोध्यानाथाच्यानें आतां हृदयावेग आवरून धरवला नाहीं तिची ती दुर्धर शोचनीय अवस्था पाहून व्यथित होऊन अश्रुवर्षाव करित तो मानकुमारीच्या शयनापाशीं बसला व हळुहळू तिच्या मस्तकावरून व तोंडावरून हात फिरवूं लागला. आपल्या प्रिय जीवितेश्वराची अशा भयंकर विपत्तींत अकल्पित भेट होतांच मानकुमारी उत्तेजित होऊन उठून बसण्याचा प्रयत्न करूं लागली; परतु तिच्या देहांत यत्किंचितहि त्राण नसल्यामुळें तिच्या क्षीण प्रकृतीला ते श्रम सहन न होऊन ती एकदम मूर्च्छित झाली. अयोध्यानाथानें आतां तिचे मस्तक आपल्या मांडीवर घेतले व वारा घालून तो तिला सावध करूं लागला. कैलासेश्वरी तिच्या डोळयांला पाणी लावू लागली. पाण्याची संतत धार तिच्या मस्तकावर धरली. त्या बुधुभगिनींची या वेळची ती शोकाकुल स्थिति कल्पनेनेच जाणली पाहिजे ! कांहीं वेळानें मानकुमारी किंचित् शुद्धीवर येऊन म्हणाली " नूना ! हें स्वप्न तर नव्हे ? "

कैलासेश्वरी हंबरडा फोडून ह्मणाली " नाहीं वहिनी ! हें स्वप्न नव्हे; तुझ्या गळयाची शपथ–हें स्वप्न नव्हे ! हा बघ माझा दादा–तुझा नवरा–आह्मांला भेटायला आला आहे! "

मानकुमारीचें मस्तक अद्यापि अयोध्यानाथाच्या मांडीवरच होतें. अकल्पित रीतीनें भेटलेल्या आपल्या प्रिय पति अयोध्यानाथाच्या मुखाकडे ती अनिमिष लोचनांनीं पहात राहिली होती. अयोध्यानाथहि दुःखपूर्ण साश्रु नयनांनीं पत्नीच्या मुखाकडे टक लावून बसला होता. त्याच्या नयनांतून सारख्या वहाणाऱ्या उष्ण अश्रुधारा मानकुमारीच्या मस्तकावर पडत होत्या. आपल्या अशक्त कृश हस्तानें तें अश्रुजल ती पुशित होती.

त्या सर्व मडळीच्या अंत.करणाची यावेळची स्थिति, खरोखर, शब्दांनीं व्यक्त करतां येणे अशक्य आहे! तींहि आपापल्या हृदयांतील भाव परस्परांशीं शब्दांनीं प्रकट करण्यास असमर्थ झाल्यामुळें केवळ परस्पराच्या मुखाकडे सारखी टक लावून शोकाकुल होऊन बसली होती. उचंबळणाऱ्या मनोवृत्ति मनुष्याच्या जिव्हेला उत्तेजित करित असतात. तशा अवस्थेत मनुष्य आपल्या हृदयांतील भाव हृदयंगम भाषेने प्रकट करू शकतो. परतु गभीर आणि प्रगाढ हृदयावेग मनुष्याचा वाग्रोध करित असतो हृदयाची ती अवस्था शब्दद्वारा प्रकट करणे कोणालाहि साध्य नसतें, हा जगाचा अनुभवच आहे.

आतां पूर्ण शुद्धींत येऊन मानकुमारीनें आपला कृश हस्त मोठया कष्टानें उचलून हळुहळू अयोध्यानाथाच्या स्कधावर नेऊन ठेविला व क्षीण स्वराने ती ह्मणाली "नूना—"

कैलासेश्वरी जवळच होती. मानकुमारीची ही हांक ऐकतांच तिने तिच्या तोंडाशीं आपले तोंड नेऊन रुदन करित आशापुरित दृष्टीने विचारले "काय ह्मणत्येस वहिनी?"

"गडे, मला जरा तुझा हात दे पाहू!"

कैलासेश्वरीनें त्याप्रमाणे करतांच तिचा हात अयोध्यानाथाच्या हातांत देऊन मानकुमारी अश्रुवर्षाव करित ह्मणाली "प्राणेश्वर! ज्याच्यासाठीं आपण चिरदुःखी होतां, ज्याच्यासाठीं आपल्याला भूकतहानहि सुचत नव्हती, ज्याच्या शोधासाठीं त्रिखंड धुंडाळित होतां तें आपलं हरवलेलं धन घ्या! आतां मी आनंदानं मरेन!"

अयोध्यानाथाच्या मुखांतून अक्षरहि फुटेना! एखाद्या दगडी मूर्तीप्रमाणे अनिमिष लोचनांनी तो मानकुमारीच्या मुखाकडे पहात तटस्थवृत्तीने बसला होता. त्याच्या नेत्रांतून सारखा अश्रुपूर चालला होता. याप्रमाणें सुमारें अर्धा तास गेला. मानकुमारीनें आतां आपला दुर्बल हस्त अयोध्यानाथाच्या स्कंधावरून उचलून त्याच्या हनुवटीवर ठेवून ती ह्मणाली "जीवितेश्वर! आपल मुखकमल अगदीं सुकून गेलं आहे.

आमच्यासाठीं आपल्याला फार कष्ट सहन करावे लागले. जेवणाखाणाचे आपले किती तरी हाल झाले असतील! रात्रीच्या रात्री आपणास जाग्रणं करावी लागली असतील! आमच्यामुळं आपल्याला हे किती कष्ट झाले! आपली ही काय दशा झाली—" बोलतां बोलतां ती हृदयविदारक शोक करूं लागली. अयोध्यानाथ तिचे नानाप्रकारांनी शांतवन करूं लागला. मानकुमारीने नंतर कैलासेश्वरीच्या कानांत कांहीं सांगतांच ती उठून गेली व कांही वेळाने शेजारच्या खोलीतून कांही फळफळावळ आणून तिने अयोध्यानाथाच्या पुढे ठेविली.

आतां दिवस मावळण्याचा समय झाला होता. अयोध्यानाथ मानकुमारीला ह्मणाला "तुझा दादा काशीनाथ हा निराळया रस्त्यानें लखनौला आला आहे. ह्या बगीच्याचा त्याला बरोबर पत्ता लागावयाचा नाही. लखनौची त्याला फारशी माहिती नाही. तेव्हां त्याला शोधून काढून लवकरच त्याला मी येथे घेऊन येतों." असे ह्मणून तो बाहेर पडला.

अयोध्यानाथ गेल्यावर बुन्दियेने दर्शनसिंहाच्या मुलामाणसांनां आणि वृद्ध जयपालसिंहाला फांशीं देण्यासाठी बादशहाच्या हुकुमानें लखनौत आणल्याबद्दलची, त्याचप्रमाणे त्या वृद्ध स्त्रीचे दागदागिने पसार करून साधुसिंहाने तिचा खून केला वगैरे सबधाची सविस्तर हकीगत कैलासेश्वरीला सांगितली. जयपालसिंहाला फांशीची शिक्षा झाल्याचे वर्तमान ऐकतांच कोमळ अंत:करणाची कैलासेश्वरी अत्यंत व्याकुळ होऊन हृदयभेदक शोक करूं लागली. मानकुमारीनें तिचे सांत्वन करण्याची शर्थ केली, परंतु कांहींकेल्या तिचे समाधान ह्मणून होईना. धरणीवर अंग टाकून टाहो फोडित ती ह्मणाली "वहिनी! कसंहि कर, अन् बाबांची सुटका कर! माझ्या बाबांला जो जीवदान देऊन त्यांची माझी भेट करवील त्याची मी जन्मभर दासी होऊन सेवा करीन! त्याला माझं सर्वस्व अर्पण करीन! माझ्या प्रिय बाबांला कसंहि करून वांचीव!"

याप्रमाणें कैलासेश्वरी भूमीवर गडबड लोळत असतां अयोध्यानाथ काशीनाथाला बरोबर घेऊन तेथें आला. कैलासेश्वरीच्या दु:खाचे कारण मानकुमारीकडून कळतांच अयोध्यानाथानें तिला आश्वासन देऊन सांगितले कीं "तूं आता मुळींच शोक करूं नको! तुझ्या दु:खाचें निवारण ह्या काशीनाथाने केलें आहे. ह्याच्याच दीर्घ प्रयत्नांनीं दर्शनसिंहाच्या सर्व कुटुंबाची मृत्यूपासून मुक्तता होऊन तीं सांप्रत आपल्या घरीं गेलीं आहेत. बादशहाने दिलेली फांशीची शिक्षा काशीनाथानें रद्द करविली."

मानकुमारीला पहातांच काशीनाथाच्या मनाची झालेली स्थिति, काशीनाथाच्या प्रथमदर्शनाने कैलासेश्वरीच्या मनांत उदित झालेला अननुभूत भाव, सर्व मंडळीच्या भेटी झाल्यामुळें त्यांनां वाटलेला अपूर्व आनंद इत्यादिकांचें वर्णन करण्यास सध्या आह्माला अवकाश नाहीं. या ठिकाणीं आतां एक क्षणभरहि रहाणें उचित नव्हे, असा त्या सर्वांचा निश्चय होऊन तत्क्षणीं सर्वांनी तेथून प्रयाण करण्याचे ठरविलें व त्या तयारीस तीं लागलीं. ताबडतोब त्यांनीं ती जागा सोडली व रात्रभर दुसऱ्या एका निर्भय जागी वस्ती करून दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहांटेस दोन भाड्याच्या गाडया करून ती मंडळी सीतापुरच्या मार्गास लागली. रस्त्यांत त्यांनीं कोठेहि मुक्काम केला नाही. रात्रबेरात्र प्रवास करून तीनचार दिवसांनी सारी मंडळी एकदाची सीतापुरच्या किल्ल्यांत सुरक्षितपणे जाऊन पोहोचली.

## प्रकरण २३ वें.

# महापुरुष.

* Ask no more of me my son ! What I can give is given unto you. —*Voice from Himalaya.*

जवळ जवळ तीन वर्षांनीं आज मानकुमारी मरणोन्मुख स्थितींत परत घरीं आली होती. तिचा वृद्ध पिता आणि दोघी बहिणी यांनां आज ती अशा शोचनीय अवस्थेंतांहि कां होईना, पण आपल्याला पुन: भेटली, याबद्दल अतुलनीय आनंद झाला होता. त्यांचे मानसिक कष्ट मानकुमारीच्या पुनर्दर्शनानें पुष्कळच कमी झाले. मृताचा शोक मनुष्य अगदींच विसरू शकला नाहीं, तथापि कालांतराने त्याची तीव्रता बरीच कमी होते; परंतु जिवत माणसाच्या विरहाचा शोक मनुष्याला कांहीं केल्या सहन करवत नाहीं! उलट, जसजसा काल वाढत जातो, तसतशी त्या शोकाची तीव्रता अधिकाधिक वाढत जाऊन त्या माणसाच्या विरहवेदनांनीं मनाची फारच शोकाकुल अवस्था होत असते, याचा अनुभव पुष्कळांला असेलच. आपलें हरवलेले धन आज पुन: सांपडले, ह्याबद्दल वृद्ध गंगाप्रसाद आणि राणी नारायणकुमारी व चांदकुमारी यांनां आतिशय आनंद झाला.

सीतापुर येथें आल्यावर तर मानकुमारीची प्रकृति अतिशयच विकोपास गेली. कानपुराहून लखनौला जाण्यापूर्वी मुळापासून ती आजारीच होती. या तीन वर्षांत तिने स्वेच्छेने केव्हांहि अन्नग्रहण केलें नव्हते. तशा क्षीण आणि अशक्त स्थितींतच म्हातारीनें बलात्कारानें तिला लखनौला नेऊन बगीच्यांत ठेविलें तेथें असतांना बादशहा कैलासेश्वरीला आणि आपल्याला सतीत्वापासून केव्हां भ्रष्ट करील नजाणे, अशा दुर्धर घोर चिंतेनें तिला ग्रासलें होतें. पुढें दर्शनसिंहाच्या बंदिवासानंतर त्या जनशून्य भयाण बगीच्यांत तीनचार दिवस तर शारीरिक आणि मानसिक भयंकर कष्ट तिला अनुभवावे लागले व तशा त्या हलक प्रकृतींतच रात्रबेरात्र प्रवास करून लखनौहून ती सीतापुरास आली. हे सारे श्रम आतां एकदम उभे राहून घरीं पाय ठेवतांच तिची फारच दुर्धर अवस्था झाली.

---

* बेटा ! देण्याजोगें होतें तें सर्व मी तुला देऊन चुकलोंच आहें. आणखी माझ्यापाशीं कांहीं मागूं नको ! —व्हॉइस फ्राम हिमालय.

जवळ जवळ तीन अहोरात्र ती अचेतनावस्थेंत होती. तिचा वृद्ध पिता, दोघी बहिणी, कैलासेश्वरी, अयोध्यानाथ, काशीनाथ यांनीं तिला शुद्धीवर आणण्याचे जीवापाड प्रयत्न चालविले होते; परंतु त्यांच्या प्रयत्नांस तीन दिवसपर्यंत कांहींच यश आले नाहीं. चौथ्या दिवशीं ती साधारण शुद्धीवर आली. शुद्धीवर येतांच आपला मृत्युकाल आतां अगदीं समीप आला आहे हें तिला कळून आलें. आपलीं सर्व मायेचीं माणसें जवळ बसून आपल्यासाठीं रुदन करित आहेत, हे पाहून मानकुमारी त्या तशा स्थितींतहि त्यांचे शांतवन करूं लागली. गंगाप्रसादाच्या चरणांजवळ मस्तक ठेवून क्षीण स्वरानें ती म्हणाली "बाबा! मला अपमृत्यूनं मरावं लागेल, माझ्या मरणकालीं मला कुणाचीहि भेट व्हावयाची नाहीं; ह्या दुःखानं मी रात्रंदिवस झुरत होत्यें. ईश्वरानं माझं तें संकट दूर करून आज आपणांमधे मला आणून घातल, ह्याबद्दल मला खरोखर फारच सुख वाटत आहे! आतां मी सुखानं मरेन! मृत्युकालीं माझ्या मनाला कसलेहि कष्ट व्हायचे नाहींत!"

कांहीं काल स्तब्ध राहून तिने कैलासेश्वरीला हांक मारली. कैलासेश्वरी जवळ येतांच तिचा हात गंगाप्रसादाच्या हातांत देऊन ती ह्मणाली "बाबा, मी मरण पावल्यावर माझ्या जागीं हिलाच आपली कन्या माना!"

गंगाप्रसाद बिचारा स्फुंदस्फुंदून रुदन करित होता. त्याच्या तोंडांतून शब्दहि नेघेना. मानकुमारी म्हणाली "बाबा, हीच तुमची मानकुमारी! तुम्हीं हिला माझ्या जागी मानण्याचं कबूल केलं, म्हणजेच मी सुखानं मरेन!"

नंतर मानकुमारीनें काशीनाथाला जवळ बोलावून त्याला सांगितलें "दादा, माझ्या या अंतकालीं तूं माझी एक शेवटची विनति ऐकणार नाहीस कायरे? मला तूं एवढं दान दिलंस कीं मग या जगांत माझी कसली कसलीहि आशा राहणार नाहीं, सुखानं मला मरण येईल!"

काशीनाथ गहिंवरून ह्मणाला "तूं काय ह्मणतेस? तुझ्यासाठीं मी काय करूं?"

"दादा! पुत्राच्या योगानंच पितृकुलाचा उद्धार होतो. तूं बाबांच्या आज्ञेबाहेर कधींहि वागूं नकोस!"

परंतु मानकुमारीचा गर्भितार्थ काशीनाथाच्या लक्ष्यांत आला नाहीं. तो अश्रु-विसर्जन करित ह्मणाला "मानकुमारी! हें तूं मला सांगायला का पाहिजे? मी बाबांच्याविरुद्ध कधींहि वागलो नाहीं व पुढेंहि वागणार नाहीं!"

मानकुमारी ह्मणाली "माझी एक विनंति मान्य करशील ना?"

" कोणती तुझी विनंति ? स्पष्ट सांग. "

" अगोदर मला वचन दे !

काशीनाथ अधिकच गहिंवरून म्हणाला "मानकुमारी! तू सांगशील तें मी करीन! तुझ्या इच्छेविरुद्ध वागणार नाहीं ! "

काशीनाथ एकवार जें करण्याचे कबूल करील तें करीलच करील, मग त्यापासून केव्हांहि परावृत्त होणार नाही, हे मानकुमारी पूर्णपणे जाणून होती. ती म्हणाली " दादा, मी मरण पावल्यावर बाबांला फार दुःख होईल. माझ्या मृत्यूबरोबरच बाबांच्या इहलोकच्या सर्व आशा, ससारिक सुखसंबंध नष्ट होण्याचा संभव आहे; परंतु तू त्यांची ही आशा नष्ट होऊ देऊ नको ! दादा, पुत्राच्या योगानच पितृ-कुलाच रक्षण होत, वशवर्धन होतं. पूर्वजांचा उद्धार होतो–तू विवाह कर. "

मानकुमारीच्या तोंडून विवाहाची ही गोष्ट निघतांच बिचारा काशीनाथ चकितच झाला ! आजन्म ब्रह्मचर्यव्रत स्वीकारून लोकहित साधन करून नंतर हिमा-लयांत जाऊन महात्म्यांची सेवा करण्याचा त्याच्या मनाचा निश्चय झाला होता. मानकुमारी लग्नासबधीं आपल्याला आग्रह करील, ही गोष्ट त्याच्या ध्यानींमनींहि नव्हती ! त्याच्याचशी काय, मानकुमारीच्या त्या मृत्युसमयीं लग्नाचा विचार तेथें असलेल्या कोणाच्याच मनांत येणें शक्य नव्हतें. काशीनाथाप्रमाणे बाकीची मंडळीहि चकित झाली परंतु मानकुमारी गभीरतेने म्हणाली " दादा ! मला वचन दे, कीं, माझ्या मृत्यूनतर तू कैलासेश्वरीशीं विवाह करशील म्हणून ! "

विवाहाची गोष्ट कानी पडतांच आधींच चकित झालेला काशीनाथ, कैलासेश्वरीशीं विवाह करण्याबद्दल मानकुमारी वचन मागत आहे हें ऐकून तर अधिकच विस्मयांत पडला व गंगाप्रसादाच्या तोंडाकडे पाहूं लागला. आतांपर्यंत विवाहाच विचार त्याच्या डोक्यांत कधींच आले नव्हते. कैलासेश्वरीला पहातांच आणि तिचा अधिकाधिक परिचय होतांच हळुहळू तिच्याकडे त्याच्या मनाचें आकर्षण होऊ लागलें होतें व कैलासेश्वरीवर त्याची भक्ति जडली होती, ही गोष्ट जरी खरी असली, तरी शुद्ध भगिनीप्रेमाशिवाय कैलासेश्वरीकडे तो अन्य दृष्टीने पहात नव्हता. तिच्याशीं आपण विवाह करावा, असा विचार त्याच्या मनांत हा क्षणपर्यंत उदयच पावला नव्हता ! अर्थात्, मानकुमारीच्या तोंडचे ते लग्नासंबंधाचे शब्द ऐकतांच तो वडिलांच्या मुखाकडे पाहू लागला. आम्हांला वाटतें, आपल्या वडिलांचा या बाबतींत काय अभिप्राय आहे, हें जाणण्यासाठींच या वेळीं तो त्यांच्या

ताडाकडे पहात होता; परंतु गंगाप्रसाद कांहीच बोलला नाहीं त्याचे मन या वेळीं स्वस्थ नव्हतें. मानकुमारीच्या शोकानें तो स्फुदस्फुदून रुदन करित होता.

मानकुमारी अधिकच गर्भीर स्वरानें पुन: म्हणाली 'दादा! तू बाबांसमक्ष प्रतिज्ञा कर, कीं माझ्या मृत्युनंतर तू कैलासेश्वरीला आपली बायको करशील म्हणून ! ''

काशीनाथाह गभीर वाणीने म्हणाला ''मानकुमारी ! बाबांसमक्ष मी प्रतिज्ञा करतों आणि तुलाहि तुझ्या अंतकाली वचन देतो, की, जर विवाह करावयाचाच झाला तर कैलासेश्वरीशीच करीन ! ''

मानकुमारी नतर कांहीं बोलली नाही एवढ्या बोलण्यानेच तिला बरेच श्रम होऊन अत्यत ग्लानि आली व ती निश्चेष्ट पडली. पुढे ती चांगलीशी शुद्धीवर आलीच नाही कांही वेळाने किंचित् डोळे उघडून तिने आपल्या दोघो वहिनीस आणि अयोध्यानाथास जवळ बोलाविले व 'ताई—प्राणनाथ—येत्ये' एवढेच शब्द अस्पष्ट उच्चारून तिने डोळे मिटले ! ! !

क्षणार्धात तेथे जो हाहा:कार उडाला—अयोध्यानाथाचे त्या वेळचें ते मूकरुदन, काशीनाथाचा आक्रोश, वृद्ध गंगाप्रसादाची मूर्च्छा, मान-कुमारी, चादकुमारी यांचा सकरुण हृदयभेदक विलाप इत्यादि शोकप्रसगाचे वर्णन शब्दांनीं का करतां येणार आहे? लेखणी कापू लागते, हृदय उचंबळून येते, टपटप गळणाऱ्या अश्रूनीं कागद भिजून जातो ! आह्मी तो प्रयत्न सोडून देतो ! ! बिचारी कैलासेश्वरी मानकुमारीच्या मृत देहाचे चरण घट्ट धरून हबरडे फोडू लागली ''वहिनी! अग तू मला एकटी टाकून कुठ चाललीस ? तूं माझी आई, तूं माझा गुरू, माझं सर्व कांही तू—अन् मला टाकून चाललीस ? मी तुझ्याबरोबर येणार ! जिथें तूं तिथें मी ! मी इथे नाही रहायची ! आत्महत्या करून तुझ्याबरोबर मी देवलोकांत येणार ! ''

सर्वच शोकांत निमग्न झालेलीं, कोण कोणाचे शांतवन करणार आणि कोण कोणाला धीर देणार ! वृद्ध गगाप्रसाद तर मूर्च्छित होऊन पडला होता. राणी नारायणकुमारीची वेड्यासारखी अवस्था होऊन ती छाती पिटित होती दु:खाचे हंबरडे फाडित ती म्हणत होती ' हे स्वप्नांत दर्शन देणारे देवते ! सर्व सकटांत दर्शन देऊन तू बालकाचा उद्धार केलास ? आतांच तुला या बालकाची करुणा कशी आली नाहीं ? तू दर्शन दऊन या संकटातून आमचा उध्दार कां केला नाहींस? ''

मानकुमारीच्या मृत्यूपूर्वी अयोध्यानाथाचें अत:करण केव्हाकेव्हां भडभडून येऊन तो मोठमोठ्यानें स्फुदत रुदन करित असे. केव्हां केव्हां पत्नीच्या दु:खानें

गलितधैर्य होऊन त्याला मूर्च्छाहि येई; परंतु मानकुमारीच्या देहांतून प्राणज्योति निघून जातांच त्याचें अंतकरण दगडासारखें कठोर झालें ! त्या क्षणानंतर त्याच्या नेत्रांत अश्रुबिंदुहि दिसला नाहीं ! विलक्षण धैर्यावलंब करून विधीपूर्वक त्यानें पत्नीच्या मृतदेहाची अत्येष्टी क्रिया केली. चंदनाच्या चितेवर मानकुमारीचा मृत देह ठेविला. क्षणार्धांत प्रज्वलित झालेल्या अग्नीच्या ज्वालांनी मानकुमारीला आपल्या पोटांत घेतलें ! तिच्या बाह्य शरीराचें जळून भस्म झाले ! ! सर्व क्रिया यथासांग झाल्यावर त्या स्मशानांत मानकुमारीच्या चितेशेजारी उभा राहून सूर्य नारायणाकडे दृष्टि लावून अयोध्यानाथ गंभीरवाणीनें ह्मणाला " हे सर्वसाक्षी दिवाकर! हे भूतधात्री धरिणि ! हे ज्योतिर्मय पापनाशक अग्ने! हे स्वर्गवासी देवांनो! हे वैकुंठवासी पितरांनो ! हे पवित्र आत्म्यांनो ! हे सर्व पंचमहाभुतांनों ! तुम्हांला साक्षी ठेवूनच ह्या माझ्या सहधर्मिणीचे मीं पाणिग्रहण केले होते पूर्वजन्मींच्या अघोर पातकांमुळे ह्या देवीच्या सेवेस मी अतरलो आहे. माझ्या हृदय देवतेनें निराहारानें प्राणत्याग केला आहे. गेली तीन वर्षे तिनें संतोषानें केव्हांहि अन्नग्रहण केले नाहीं. अर्थात, हा निराहारच तिच्या मृत्यूचें मुख्य कारण आहे. तुमच्या साक्षीने पाणिग्रहण केलेल्या ह्या माझ्या परम साध्वी पत्नीला आज पुन्हा मी तुमच्या हवालीं करित आहें; आणि तुमच्याच साक्षीने मी आज प्रतिज्ञा करितों कीं, माझ्या पुण्यशील पत्नीनें निरहाराचें जें व्रत चालविले तेच मीहि पुढे चालवून ईश्वरचिंतनांत माझें शेष आयुष्य घालवीन. या क्षणापासून अन्नाला किंवा जलाला स्पर्शहि करणार नाहीं ! "

स्मशानांतून घरीं येतांच राणी नारायणकुमारी आणि चांदकुमारी यांच्या हातांत कैलासेश्वरीचा हात देऊन वृद्ध गंगाप्रसादाच्या चरणांवर मस्तक ठेवून अयोध्यानाथ म्हणाला " बाबा ! आपल्याला तीन कन्या होत्या. त्या तीनांह कन्या आज आपल्या घरीं आहेत! मला निरोप द्या ! "

अयोध्यानाथहि आपल्याला सोडून चालला, हें पाहून कैलासेश्वरीनें फारच आक्रोश मांडिला; परंतु अयोध्यानाथानें तिला नानाप्रकारें समजावून त्याच रात्रीं सर्वांचा जन्माचा निरोप घेऊन तो सीतापुरहून निघाला व गाझीपुराजवळील एका निबिड अरण्यांत प्रवेश करून तेथे निराहाराने ईश्वरचिंतन करित राहिला.

मानकुमारीच्या मृत्युनतर काशीनाथानें आपल्या पर्यटनासंबधाचें सविस्तर वर्तमान आपला पिता गंगाप्रसाद आणि दोघी भगिनी राणी नारायणकुमारी व

चांदकुमारी यांना निवेदन केले. तो म्हणाला " पंडित देवीप्रसाद सांप्रत पुण्यशील महात्म्यांच्या आशीर्वादानें साधूपदास पोहोंचून हिमालयांत ईशचिंतन करित राहिले आहेत. ते केव्हांहि मिथ्या भाषण करावयाचे नाहींत. आमचे आजोबा जगन्नाथ शास्त्री अद्यापि जीवंत असल्याचे त्यांनीं मला सांगितले. आजोबा हल्लीं देवत्त्वास पोहोंचले आहेत. आतांपर्यंत आमच्यावर गुदरलेल्या सर्व घोर प्रसंगांतून त्यांनींच आमची मुक्तता केली ! "

काशीनाथाची ही हकीगत ऐकतांच राणी नारायणकुमारी म्हणाली " मलाहि दोन वेळ आत्महत्येच्या पातकापासून एका देवतेन परावृत्त केलं; खरोखर, ती देवता दुसरी कुणीहि नसून आमचे आजोबाच होत! आतां माझी खात्री झाली. "

मुलाचें आणि कन्येचें हे भाषण श्रवण करतांच वृद्ध गंगाप्रसादाचें अंतःकरण भडभडून येऊन अत्यंत पश्चात्ताप पावून तो स्वतःशींच म्हणूं लागला " बाळ काशीनाथा! बेटा मानकुमारी ! खरोखर तुम्ही धन्य आहां! बाळपणापासूनच तुमची तुमच्या आजोबांवर अत्यंत श्रद्धा असे; भक्तिपूर्वक तुम्ही त्यांची सेवा करित होतां; त्यांच्या आज्ञप्रमाणें तुम्ही वागत होतां म्हणूनच तुमच्यावर प्रसन्न होऊन त्यांनीं तुम्हांला दर्शन दिलें व पापापासून तुमचा उद्धार केला; परंतु मी केवढा पापी, पाषंड, नराधम! मला कुलांगाराला पितृदेवांच्या दर्शनाचा लाभ कसा व्हावा! पितृदेवांनीं संसाराचा त्याग केल्या दिवसापासून मला चांडाळाला कधीं एक दिवसहि त्यांचे स्मरण झालें नाहीं! ते कुठे गेले असतील, काय करित असतील, त्यांची अवस्था काय असेल, ही शंका कधीं कधींहि माझ्या मनांत आली नाहीं ! कोणच्या उपायांनीं धनदौलत, जमीनदारी, जहागिरी मिळवितां येईल, बादशहाची मर्जी कशा रीतीनें सुप्रसन्न करून घेतां येईल, लोकांत आपली मान-प्रतिष्ठा कशी वाढेल, याच गोष्टींचा मला रात्रंदिवस ध्यास लागलेला! जन्मापासून मीं दुष्टाने किती किती तरी गोष्टींत पितृदेवांच्या आज्ञांचें उल्लंघन केलें! माझ्या या घोर पातकांला प्रायश्चित तरी का आहे ? "

' आपल्या या पातकांला प्रायश्चित्त तरी आहे? ' हा हृद्रोग रात्रंदिवस गंगाप्रसादाच्या अंतःकरणाला जाळूं लागला. पित्याचें स्मरण करित तो जों जों आपल्या आयुष्याचें पर्यालोचन करूं लागला तों तों आपण किती तरी घोर अपराधी आहों असें वाटून त्याला अधिकाधिक पश्चात्ताप होऊं लागला. पित्राज्ञेचें उल्लंघन केल्यामुळेंच आपली ही दशा झाली, पित्याचा अपमान केल्याच्या पातकामुळेंच आपल्यावर देवांचा कोप होऊन त्यांनीं हीं संकटें आणलीं, असें त्याला वाटूं लागलें.

मानकुमारीच्या मृत्युनंतर दोनचार दिवसांतच गंगाप्रसादाच्या मनाची चमत्कारिक स्थिति होऊन गेली. आहार, निद्रा यांचा त्याग करून तो सीतारामाच्या मंदिरांत धरणें धरून बसला. आतां त्याला दुसरें तिसरें कांहींच सुचेना ! 'माझ्या या घोर पातकांला प्रायश्चित्त तरी का आहे ?' हाच त्याचा रात्रंदिवस जप चालला होता. काशीनाथाने आणि नारायणकुमारीनें त्याचें शांतवन करण्याची शर्थ करून पाहिली, नानाप्रकारें त्याची विनवणी केली, परंतु तो कोणाचेंच ऐकेना ! "मला पित्यापाशीं घेऊन चल. पित्याच्या चरणांवर मस्तक ठेवून मी त्यांची क्षमा मागणार!" असें तो दीनस्वरानें काशीनाथाला सांगू लागला.

* * * * * *

आज गंगाप्रसाद सीतारामाचे मंदिरांत रामचंद्राच्या मूर्तिसमोर पडला होता. काशीनाथ, नारायणकुमारी, चांदकुमारी आणि कैलासेश्वरी त्याच्याजवळ बसलीं होतीं. सूर्य अस्तास जाण्याचा समय झाला होता अशा वेळीं बुन्दिया हातामध्यें एक पत्र घेऊन तेथे आली. पत्र काशीनाथाकडे देऊन ती म्हणाली "तुम्हाला देण्यासाठीं एका सन्यांशाने हें पत्र दिले आहे"

काशीनाथानें ते पत्र घेऊन विचारलें "तो सन्यासी कुठें आहे ?"

बुन्दिया ह्मणाली "माझ्या हातीं पत्र देऊन तो निघून गेला!"

काशीनाथाने ते पत्र उघडलें व तो मोठ्याने वाचू लागला. पत्रांत पुढील प्रमाणें लिहिलें होतें:—

"बेटा गंगाप्रसाद ! मानकुमारीसाठीं असा शोकाकुल होऊं नकोस ! इह लोकाचा त्याग करून मानकुमारी दिव्यलोकांत गेली आहे. मुसलमानांच्या राज्याच्या विनाशाचें बीज पेरून मानकुमारी स्वर्लोकीं गेली आहे पंचवीस वर्षांच्या आंतच मुसलमानी सत्तेचा विलोप होईल; परंतु ही मुसलमानी सत्ता नष्ट होण्याच्या संधीस अगर तदनंतर अयोध्येमध्यें घोर विद्रोहानल भडकेल. हजारो हजार स्त्रीपुरुष त्या विद्रोहानलात जळून भस्म होतील. यासाठीं तूं मुलांबाळांसह काशींत जाऊन रहा. म्हणजे वृद्धापकाळीं निर्विघ्नपणें तुला ईश्वराचें चिंतन करतां येईल.

"आणखी एक तुला सांगावयाचे आहे. आपल्या परलोकवासी पूर्वजांनां तूं केव्हांहि विसरूं नकोस. परलोकीं गेलेले शुद्धात्मे, त्याचप्रमाणें हिमाचलवासी सिद्धपुरुष, सदासर्वकाल या सुखदु:खपूर्ण संसाराचें मंगल चिंतित असतात. जड जगतामध्यें कार्य करणें त्यांच साध्य नसल्यामुळें ते आध्यात्मिक जगतांत कार्य

करून संसारवासीजनांच्या मनांत शुद्ध बुद्धि आणि सदिच्छा प्रेरण करितात. परंतु संसारांतील मोहांधकारांत पडून तुम्ही त्यांना विसरून गेल्यास तुमच्यावर आपल्या मगल कामनांचा प्रभाव घडवून आणण्यास ते समर्थ होत नाहींत.

"स्मृति, श्रद्धा, भक्ति आणि प्रेम यांचे बधन कव्हांहि छिन्न होत नसते. स्मृति, श्रद्धा, भक्ति आणि प्रीति हीं इहलोक आणि परलोक ह्यांच्यामध्यें निगूढ बधन स्थापित करून भिन्न भिन्न आत्म्यांमध्ये योगोत्पादन करित असतात. स्मृति, श्रद्धा, भक्ति आणि प्रेम यांच्या गाढतेनुसारच भिन्न भिन्न आत्म्यांच्या ठायीं निकटता सस्थापित होत असते.

"उलट पक्षीं, विस्मृति ही एका आत्म्यापासून दुसऱ्या आत्म्याला पूर्णपणे भिन्न राखित असते. अर्थात्, तुह्मी जर परलोकगत पिता, माता किंवा दुसऱ्या शुद्धात्म्यांस विसरलां, तर तुह्मांला सन्मार्गगामी करणें त्यांना कसे बरें शक्य होईल? तुमच्या हृदयाला त्यांच्या सामर्थ्याचा मुळींच स्पर्श होणार नाहीं!

"ससारातील कुकर्मे, कुससर्ग, पापाचार यांची वासना हृदयांतून दूर करण्यासाठीं शुद्धात्म्यांचे आणि साधुपुरुषांचे सदासर्वदा चिंतन करित असावे. साधूंचे सद्गुणांत सर्वदा डोळ्यांपुढे ठेवावे. तसे केल्यास परलोकगत शुद्धात्मे आणि संसारवासी साधुपुरुष तुह्मांला सत्पथानुवर्ती करण्यास समर्थ होतील. मन पवित्र झालें नाहीं, किंवा ससारातील चिंता, काठज्य, व्यवधानें यापासून क्षणभरहि एकांत मिळविण्यास मनुष्य समर्थ झाला नाहीं, तर त्याच्या अतःकरणांत सादिच्छा आणि शुभवृत्तींचा कधींहि उदय व्हावयाचा नाहीं.

"ससारातील मोहांधकारांत धनसंपत्तीच्या प्रलोभनांनीं मुग्ध झालेला असा तूं आम्हांला जो अगदींच विसरून गेला आहेस तसा विसरला नसतास तर खात्रीनें सांगतो, आह्मांला तुझ्या मनांत सदिच्छा उत्पन्न करतां येती व आज ज्या अनेकविध विपत्ति आणि दुर्घटना तुला अनुभवाव्या लागल्या त्यांतून तुझी मुक्तता झाली असती, परतु गेल्या पस्तीस वर्षांत कधी एक पळभरसुद्धां आह्माला तुझ्या अतःकरणांत प्रवेश करतां आला नाहीं. आमच्याविषयींच्या गाढ विस्मृतीनें तुझ्या हृदयाचे द्वार आम्हांला अजिबाद बंद केलें होतें

"बेटा काशीनाथ! तूं आणि नारायणकुमारांनें माझ्या निर्वाणलाभांत विशेष व्यत्यय केला आहे! केवळ तुमच्यासाठीच मला या जड जगतांत कार्य करावें लागलें. वास्तविक ह्मटलें असतां जड जगत् हें माझें कार्यक्षेत्र नव्हे. तुम्ही या

क्षणभगुर संसारांतील दु.खक्लेशांच्या कष्टांस कटाळून वारंवार आत्महत्या करण्यास उद्युक्त झाला. आत्महत्या हें भयंकर पाप होय. चोराने चोरी केली, अगर एखाद्यानें कांहीं भयकर गुन्हा केला, तर त्याच्या अपराधाबद्दल त्याला शासन होते. कारागृहांत त्याची योजना होते. परतु कारागृहांतील यातनांस कटाळून तेथून पलायन करण्याचें योजून आपल्या पापाचा दड तो चुकविण्यास उद्युक्त होईन म्हणेल तर ते त्याला शक्य असनें काय ! कारागृहांतून तो पळून गेल्यास राजाचे सेवक त्याला पुनः पकडून आणतील व त्याला दुप्पट शासन भोगावे लागेल. संसाराचीहि अशीच गोष्ट आहे. या ससारांत मनुष्य आपापल्या कर्मफलानुसार सुखदु.खे, विविध तापत्रय भोगित असतो; परतु त्या यातनास कटाळून, आपल्या पूर्वजन्मीच्या पापांची शिक्षा चुकविण्यासाठीं आत्महत्यारूपी पलायन करण्यास तो उद्युक्त झाला, तर जगाचा न्यायाधीश जो परमेश्वर तो त्याला पकडून आणून पूर्वीच्या पातकाच्या दडाबरोबरच या पलायनाबद्दल त्याला आणखी जबर शा न करील! बाकी पातकांस प्रायश्चित आहे, परतु या आत्महत्येच्या परम घोर पातकाला प्रायश्चित्त नाहीं! यासाठीं ससारांतील दुःखे, क्लेश, कष्ट, यातना यत्किंचितहि कुरकुर न करितां सहन कर. आत्महत्या करून त्या ससारकष्टांतून पलायन करण्याचा प्रयत्न केव्हाहि करू नकोस !

"बेटा ! बाळपणापासूनच धर्मावर तुझी विशेष श्रद्धा दिसून येत होती. मनुष्याच्या अंत.करणांतील नैसर्गिक ईश्वरपिपासा हेच धर्माचे सार असून ईश्वर-प्राप्तीसंबंधाचे त्याचे प्रयत्न हेच धर्माचे साधन होय ईश्वराविषयी कृतज्ञ राहणें आणि त्याची भीति बाळगणें मनुष्याच्या प्रकृतीचा एक स्वाभाविक भाव असून कमीअधीक प्रमाणानें तो प्रत्येकाच्या ठायीं वसत असतो; परंतु भिन्न भिन्न देशांतील लोक ही ईश्वरपिपासा तृप्त करण्यासाठी भिन्न भिन्न मार्गाचा अवलब करित असतात. अर्थात्, भिन्न भिन्न देशांतील लोकांचे धर्मसाधनाचे मार्ग भिन्न भिन्न बनले असतात. या साधनमार्गासंबधीं धर्मराज्यामध्ये मोठे मतभेद आणि युद्धें माजलेलीं असतात. ह्या साधनमार्गाविषयी मनुष्याच्या मतीला भ्रम उत्पन्न होतो. ईश्वराची पूजाअर्चा करणें हा हिंदूनां धर्मसाधनाचा श्रेयस्कर मार्ग वाटतो, तर निमाज पढण्यानें तें कार्य साध्य होतें असें मुसलमानास वाटत असते !. ख्रिस्ती लोकांचे मत निराळेंच असतें. एवढेच नव्हे, तर दुसऱ्या कित्येक सप्रदायांतील लोक ह्या बाबतीत अत्यंत भ्रमांत गुरफटलेले दिसून येतात. ठग सप्रदायांतील लोकांस

नरहत्या हेंच धर्मसाधन वाटत असते! मी जगांतील नाना देशांत पर्यटन केलें आहे. भिन्न भिन्न लोकांच्या धर्मसाधनमार्गाचे पर्यालोचन केले आहे. हे सर्व मार्ग प्रत्यक्ष पाहिल्यावर पृथ्वींतील सर्व संप्रदायांत श्रीबुद्धदेवांनी प्रचारांत आणलेले एकांतात ईश्वरचिंतन हाच सर्वोत्कृष्ट साधनमार्ग आहे, असें मला वाटू लागले आहे. बुद्धाचे अनुयायी पुष्कळ आहेत; पुष्कळ देशांतहि बुद्धधर्म प्रचारांत आहे; परंतु हे भिन्न भिन्न देशांत रहाणारे आणि आपल्याला बौद्धधर्मीय म्हणविणारे लोक कोणीहि बुद्धदेवांनी सांगितलेल्या साधनमार्गाचें अवलंबन करितांना मला आढळले नाहीत! उलट, ह्यांचे आचारव्यवहार आणि धर्मसाधनाचे मार्ग बौद्धधर्माच्या संपूर्ण विपरीतच दिसून आले.

" मला पूर्वी वाटत असे कीं, एका एका देशांत एका एका महापुरुषानें जन्म ग्रहण करून एकेक स्वतंत्र धर्मच प्रचारांत आणिला असेल; परतु आतां मला कळून चुकले की, हिंदु, बौद्ध, ख्रिस्ती आणि मुसलमान ह्या चार धर्मांचा पितापुत्रांतील संबधाप्रमाणे अत्यत निकट सबध आहे. हिंदूचा उपनिषद प्रतिपादित सनातनधर्म कालक्रमाने विकृतावस्थेस पोहोचल्यामुळें महापुरुष बुद्धदेवांनीं धर्मसस्कारक होऊन त्या उपनिषद प्रतिपादित सनातन धर्माचे पुनरुत्थान केले. हा पुनरुत्थित सनातन धर्मच बौद्धधर्म झाला. कालक्रमाने बौद्धधर्मालाहि विकृतावस्था प्राप्त झाल्यावर बौद्धऋषि योहनापाशीं दीक्षा घेऊन येशू ख्रिस्ताने विशुद्ध बौद्धधर्माचा जगांत प्रचार केला व त्या विशुद्ध बौद्धधर्मालाच ख्रिस्तीधर्म असे नामाभिधान प्राप्त झाले. या ख्रिस्तीधर्मालाहि पुढे विकृतावस्था प्राप्त झाली व ख्रिस्ती धर्मावलंबीयांमध्ये मतभेद उपस्थित होऊन घोर रणे माजली. यांतील नेस्टेरियन मतावलबीयांना हद्दपार करण्यांत आल्यामुळें ते अरबस्थानांत येऊन राहिले व याच्यापाशीच धर्मशिक्षण घेऊन महमद पैगंबराने महंमदी धर्माचा प्रचार केला. यावरून स्पष्टपणे दिसून येतें कीं, या चाऱ्ही धर्मांचा अत्यंत निकट संबंध असून परस्परांचे परस्परांशीं पितापुत्राचें नातें आहे. वेदांपासून उपनिषदांची उत्पत्ति झाली, उपनिषदांपासून बौद्धधर्म आला, बौद्धधर्मापासून ख्रिस्ती व पुढे ख्रिस्तीधर्मापासून महंमदीधर्म असा हा उत्पत्तिक्रम आहे.

" पाश्चात्य विद्वानांनीं अनेक शोध, अनुसंधान आणि तर्क करून निश्चित केले आहे कीं, आणखी शंभरदोनशें वर्षांचा काल लोटण्यापूर्वीच पृथ्वीवरील धर्मराज्यांत पूर्णैक्य संस्थापित होईल. भिन्न भिन्न धर्मांमध्यें अशाप्रकारें जो संबंध आणि

पूर्वपरंपरा आहे तो निश्चयेंकरून आविष्कृत होईल आणि सांप्रदायिक भाव, मतभेद आणि धर्मयुद्धें जगांतून लवकरच अदृश्य होतील.

" बेटा काशीनाथ! ही धर्मपिपासा परितृप्त करण्याची तुला जर वासना असेल, तर पहिल्यानें संसारांतील विविध कर्तव्यें यथासांग संपादन करून नंतर मग संसाराच्या मोहांतून अगदीं अलिप्त होत होत एकांतांत ईश्वरचिंतनांत आपलें शेष आयुष्य घालीव.

" ह्या जगतांत आतां तुह्मांला माझी भेट व्हावयाची नाहीं. परंतु कांहीं संकट उपस्थित झाल्यास माझें स्मरण करतांच तुमच्या हृदयांत शुभबुद्धीचा उदय होऊन तुह्मांला सुमार्ग दिसेल. आणखी माझ्यापाशीं कांहीं मागूं नको! देण्याजोगें होतें ते सर्व मी अगोदरच देऊन चुकलो आहे.

जगन्नाथशास्त्री."

पत्र वाचून होतांच काशीनाथानें ते गंगाप्रसादाच्या हातीं दिलें. पत्राच्या खालील ' जगन्नाथशास्त्री ' हें नांव वाचून गंगाप्रसाद म्हणाला " हें बाबांचेंच अक्षर!" त्यानें ते पत्र एकदम मस्तकावर धरलें व सद्गदित अंतःकरणानें पितृदेवाला शतशः प्रणाम केले.

ह्या पत्रामुळें गंगाप्रसादाच्या उद्विग्न चित्ताला बराच शांतिलाभ झाला. हळुहळू धैर्यावलंब करून तो संसारकार्यांत लक्ष्य घालूं लागला. मानकुमारीच्या मृत्युनंतर सदासर्वकाल कैलासेश्वरी गंगाप्रसादाजवळ राहून अत्यंत प्रेमानें त्याची सेवा-शुश्रूषा करूं लागली. कैलासेश्वरीचा मधुर स्वभाव, हृदयाचा पवित्र भाव, आत्मत्याग आणि परसेवेविषयीं तिची प्रगाढ इच्छा पाहून गंगाप्रसादानें एके दिवशीं काशीनाथाला जवळ बोलावून म्हटलें " बाबा, मानकुमारी देवकन्या होती. तिनें तुझ्यासाठीं योग्य वधु निश्चित केली आहे. कैलासेश्वरीचें तूं पाणिग्रहण कर."

वडिलांची आज्ञा काशीनाथानें शिरसा वंद्य केली. लवकरच दोनतीन महिन्यांनीं काशीनाथाचा कैलासेश्वरीशीं विधिपूर्वक विवाह झाला. पुढें गंगाप्रसाद आपला पुत्र, स्नुषा आणि दोघी कन्या यांनां बरोबर घेऊन काशींत जाऊन राहिला. बुन्दियाहि कैलासेश्वरीबरोबरच राहिली. गंगाप्रसाद नंतर सीतापुरला गेला नाहीं. काशींतच राहून तो ईश्वरचिंतनांत आपलें शेष आयुष्य घालवूं लागला. याप्रमाणें ईश्वरचिंतनांत आणि काशीनाथाच्या पुत्रकन्यांचें कौतुक करण्यांत त्यानें आपल्या आयुष्याचे शेष दिन सुखानें घालवून कांहीं वर्षांनीं काशीच्या पुण्यभूमींत देह ठेविला.

## प्रकरण २४ वें.

## उपसंहार.

I slept and I dreamt that life is beauty,
I awoke and found it is full of duty.

राजा दर्शनसिंहाला हद्दपार केल्यावर नासीरची आई पादशा बेगम जनाबे आलि हिची फैजाबाद येथे रवानगी करण्यांत आली. मना जान हा जनाबे आलि बरोबरच होता. त्याच्या नाशाचे सर्व प्रयत्न विफल झालेले पाहून बादशहानें जाहिरनामे लावून मना जान हा आपला औरस पुत्र नव्हे, बेगमांच्या कारस्थानांमुळें आपण त्याला आजवर आपला पुत्र मानिला होता, असें सर्वत्र जाहिर केले.

विलायती नापितराज सर्फराजखां याचा बादशहाच्या इतर आंग्ल दोस्त मंडळाशीं आता घोर कलह सुरू झाला. यापुढें अयोध्येंत रहाण्यांत शोभा उरली नाहीं, हे नापितराजांस दिसू लागले. लखनौ येथें बादशहाच्या दरबारांतील कुटिल कारस्थानी-मंडळींत चारपांच तट उपस्थित होऊन प्रत्येक तटांतील लोक दुसऱ्यास रसातळास पोहोचविण्याचीं कृष्ण कारस्थाने रचण्यांत गढून गेले. एका तटाने माजी वजीर मेहेदी अलीखांचा पक्ष स्वीकारला. दुसरा तट राजा दर्शनसिंहाच्या उद्धाराची खटपट करू लागला. बेगमांच्या बाजूस तिसरा तट वळला. चौथ्याने न्हावगड्याचा आश्रय स्वीकारला. साऱ्या राज्य'वर तिलांजली वाहण्यास उद्युक्त होऊन इंग्रजांच्या कारस्थानांत सामील झालेला तट आणखी होताच! ह्या सर्व तटांतील कपटकारस्थानी मंडळीने आपापला स्वार्थ साधण्यासाठीं न्यायान्याय, पापपुण्य यांनां तिलांजली वाहून जीं अघोर कर्मे आरंभिलीं, त्यांचें वर्णन करण्यास आमची लेखणी धजत नाहीं! दर्शनसिंहाच्या हद्दपारीनंतर दोनतीन वर्षांनीं नापितराजांनीं सहा महिन्यांची रजा घेऊन कलकत्यास प्रयाण केलें. कलकत्यास गेल्यावर त्यांनी आजवर उपार्जन केलेल्या ऐशीं नव्वद लक्ष रुपयांपैकीं कांहीं रुपये कित्येक निरनिराळ्या ब्यांकांत ठेविले व बरेचसे विलायतेस पाठवून दिले.

रजा घेऊन अयोध्या सोडण्यापूर्वी नापितराजांनीं आपल्या कनिष्ठ बंधुराजांची बादशहाच्या क्षौरकार्यावर योजना केली होती; परंतु त्यांचे हे बंधुराज विशेषसे चतुर नव्हते. बादशहाचें प्रियपात्र होऊन बसण्यांत त्यांनां सिद्धि आली नाहीं. सर्फराजखांच्या पश्चात् नासीरच्या इतर आंग्ल दोस्तमंडळींनें सर्फराजखांला पदच्युत

करण्यासाठीं बादशहाचे कान भरण्याचा क्रम आरंभिला. नासीरनें आतां प्रतिज्ञा केली कीं, याउपर आपण न्हाव्याबरोबर एका टेबलावर बसून आहार करणार नाहीं ! परंतु सहा महिन्यांनीं नापितराज पुन्हा अयोध्येंत येतांच बादशहाची ती प्रतिज्ञा लटपटली ! पूर्ववत् त्या न्हाव्याबरोबर एका टेबलावर बसून नासीर आहार करूं लागला बादशहानें याप्रमाणें आपल्या प्रतिज्ञेचा भंग केलेला पाहून त्या न्हावगंडया-बरोबर एका टेबलावर बसून आहार करण्याचें नाकारून बादशहाच्या इतर आंग्ल दोस्तांनीं आपापल्या जागांचे राजिनामे दिले व बादशहास शेवटचा रामराम ठोकून ते स्वदेशीं निघून गेले. आतांपर्यंत त्यानीं अगणित द्रव्य संपादिलें होते. दिवसेंदिवस अयोध्येतील अनन्वित कृत्यें आणि कपटकारस्थानें अधिकाधिक वाढत चालली होतीं. तेव्हां भलेपणानें येथून पोबारा करणें हेंच चांगलें, असा पोक्त विचार करून ही मंडळी निघून गेली ! ही मंडळी गेल्यावर पांचसहा महिन्यांच्या आंतच बादशहाचें सर्फराजखांशीं वितुष्ट आलें. जिवाच्या भीतीनें नापितराज रातोरात कानपुरला पळून गेले. तेथून गुप्त वेषानें एकदाचें कलकत्ता गांठून आपल्या सहचरी-सहवर्तमान गलबतांत पाय पडताच त्यांच्या जिवांत जीव आला. विलायतेंत गेल्यावर त्यानीं बॅरोनेट होण्यासाठीं जगजग पछाडलें. मोठमोठ्या लार्ड लोकांस, सरकारी अधिकाऱ्यांस आपल्या घरीं बोलावून, पार्ट्या देऊन त्यांची मर्जी संपादन करण्यासाठीं त्यांनीं लक्षावधि रुपये खर्च केले ! परंतु विलायतेंतील लोकांनीं नापित राजांनां 'इंडियन नबाब' म्हणण्यास संमति दिली; त्यांना 'सर डॅनियल डोनिथ्रोन' ( Sir Daniel Donnithrone ) ह्मणण्यास कोणीहि राजी होईना ! लक्षावधि रुपये खर्च करून आपल्याला बॅरोनेट ह्मणवून घेण्याची नापितराजांची ही महत्त्वाकांक्षा अगदीं व्यर्थ जाऊन त्यांची निराशा होण्याच्या ह्या संधीसच त्यांच्या खडतर नशिबानें दुसराहि एक डाव साधला ! हिंदुस्थानांत त्यानीं केवळ लूट करून सांठविलेली अपार संपत्ति त्यांनीं ज्या निरनिराळ्या बॅकांत आणि कंपनीच्या शेअरांत ठेविली होती त्या सर्व बॅकांनीं आणि कंपन्यांनीं एकाएकीं दिवाळे फुंकिल्यामुळें ती सारी संपत्ति त्यांच्या हातांतून गेली व वडिलार्जित जुना वस्तरा, कातरी आणि नकशी एवढींच कायतीं त्यांच्या हातीं राहिलीं !

इकडे नासीरचे आप्तसंबंधीं सारे त्याच्या जिवावर उठले होते. आपल्याला विषप्रयोग होईल या धास्तीनें बादशाहा मोठ्या सावधगिरीनें राहत होता. अलीकडे त्याची प्रकृतिहि बरोबर नसे. नासीर दिल्लीचा सार्वभौम बादशाहा, पण

विषप्रयोगाच्या भीतीनें बिचाऱ्याला क्षुधेची शांति करण्यासाठी हल्ली जाडेभरडें अन्न खाण्याचीसुद्धां सोय राहिली नव्हती ! उपासमारांनी त्याचे फार हाल होऊं लागले. आपल्याला विष घालतील ह्मणून तो कोणाच्याच हातचें कांहींएक खात नसे ! तथापि त्याची विलासदासी धनिया मेहरी इच्यावर मात्र त्याचा थोडासा भरंवसा होता. अलीकडे तिच्या महालांतच तो लपून असे. एके दिवशी त्याला फार तहान लागली ह्मणून धनिया मेहरीपाशीं त्यानें प्यावयास पाणी मागितले. विहिरीच्या पाण्यांतहि विष घालण्यांत येईल ह्मणून त्यानें धनिया मेहरीला आपल्या डोळ्यांदेखत एक कलिंगड फोडावयास सांगून त्याचें पाणी तो प्याला, परतु त्या पाण्यांतहि एका कारस्थानी व्यक्तीनें मोठया युक्तीनें विष घातले. कलिंगडाचें पाणी प्राशन करितांच पापी नासीर तडफडून तत्क्षणीं मरण पावला !

ह्या कलिंगडाला विषलेप करण्यांत खरे ह्मटले असतां बिचाऱ्या धनिया मेहरीचें कांहींएक अग नव्हते. धनिया मेहरीनेच बादशाहाला विषप्रयोग केल्याबद्दल जरी जनप्रवाद आहे, तरी तो खोटा आहे. हे पाताळयंत्र रचणारी निराळीच व्यक्ति होती. अफझल उल्निसा ही अलीकडे धनिया मेहरीच्या सेवेत राहून तिने बादशाहाच्या ह्या विलासदासीची बहाल मर्जी सपादन केली होती. बादशाहावर सूड उगविण्याचा हेतूनेच ही तिच्या तैनातीत राहिली होती. डोळयांत तेल घालून ती बादशाहाच्या नाशावर टपून बसली होती. त्याप्रमाणे १८३७ च्या जुलईच्या ७ व्या तारखेस दोनप्रहरच्या सुमारास तिने आपला डाव साधून बादशाहास या जगातून नाहींसे केले व तत्क्षणीं ती तेथून निघाली.

अफझल् उल्निसा याप्रमाणे बादशहावर सूड उगवून जी निघाली ती तडक लखनौच्या बाजारांत गेली. या बाजारांत साधूसिह संप्रत कापडाचा मोठा व्यापारी बनून राहिला होता. साधूसिंहाला वाचक ओळखितच असतील.. साधूसिहाच्या दुकानी जाऊन अफझल उल्निसाने नाना प्रकारचे उची कापड खरेदी केलें. आज मोठा सौदा झाल्याबद्दल साधूसिह आनदित होऊन ह्या बडा सौदा करणाऱ्या श्रीमान् बाईची ऊठबस करण्यांत त्याची मोठी धांदल उडूं लागली शेवटी पसंत केलेल्या कापडाचा आंकडा करण्यांत साधूसिंह गढून गेला आहे इतक्यांत 'ढूमढूम' असा एकाएकीं आवाज होऊन पिस्तुलाच्या दोन गोळ्या साधूसिंहाच्या मस्तकांतून पार निघून गेल्या ! साधूसिंहाच्या मस्तकांतील मेंदूने आणि रक्ताने सारें दकान भरून गेलें. विद्युल्लतेप्रमाणें अफझल उलनिसा झटदिशीं तेथन अदृश्य झाली

हां हां ह्मणतां साधूसिंहाच्या दुकानांत लोकांची गर्दी झाली. पहातात, तो साधूसिंहाचें प्रेत छिन्नभिन्न होऊन पडलें आहे व त्या प्रेताशेजारींच बादशाहाच्या महालांतील एक विलायती पिस्तुल दिसत आहे.

नासिरुद्दीन मरण पावल्याची बातमी रेसिडेन्सींत कळतांच दोघां असिष्टंट रेसिडेंटांपैकीं मि. शेस्कापियरने एकदम जाऊन राजवाड्याचा कबजा घेतला व मि० पाटन हा राजवाड्याच्या सिंहद्वारावर पहारा करित राहिला. स्वत: रेसिडेंट कर्नल लो यानें नासीरचा चुलता महमंद अल्ली याची भेट घेऊन आयोध्येच्या सिंहासनावर त्याला बसविण्याची आपली इच्छा प्रदर्शित केली.

वृद्ध महमद अल्ली रेसिडेंटच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच चकितच झाला व जमिनीपर्यंत लवून रेसिडेंटसाहेबांला तीनवार मुजरा करून तो ह्मणाला " अल्ला कंपनी सरकारांचा जयजयकार करो ! कंपनी सरकारांचे राज्य हिंदुस्थानांत यावच्चंद्रदिवाकरौ चालो ! " या भावी बादशहाने कृतज्ञ बुद्धीने रेसिडेंटचे शतश: आभार मानिल्यावर रेसिडेंट आपल्या रेसिडेन्सींत निघून गेला.

बादशहाच्या अकालमृत्यूची बातमी साऱ्या अयोध्येंत वायुवेगानें पसरली. फैजाबाद येथे जनाबे आलि बेगमेला हे वर्तमान कळतांच ती मना जानला बरोबर घेऊन रातोरात अयोध्येस येऊन पोहोंचली. तिची पालखी तीन घटका रात्रीच्या सुमारास राजवाड्याजवळ आली. या वेळीं दारावर मि. पाटनसाहेब पहारा करित होता. तो कांहीं केल्या दार उघडीना. बेगमेनें हत्ती लावून दरवाजा फोडला. बेगमेबरोबर या वेळी पधराशे शिपाई होते. त्यांची व पाटन साहेबांची लढाई जुंपली. परंतु तींत माघार खावी लागल्यामुळें पाटन साहेबांनीं पलायन केले. ताबडतोब राजवाडा आपल्या ताब्यांत घेऊन जनाबे आलीने मना जानला अयोध्येच्या सिंहासनावर बसविले व त्याच्या नांवाने नगरांत द्वाही फिरविली इकडे पलायन केलेले पाटनसाहेब आतां रेसिडेंट साहेबांस घेऊन राजवाड्यापाशीं आले. रेसिडेंट कर्नल लो यानें बेगमेला निरोप पाठविला कीं, " पांच मिनिटांच्या आंत राजवाडा सोडला नाहीं तर इंग्रजांचें सैन्य राजवाड्यावर तोफांचा भडिमार करील ! " परंतु बेगमेनें रेसिडेंटच्या ह्या धमकीस मुळींच भीक घातली नाहीं. ता. ८ जुलई रोजीं सकाळीं लखनौ शहरांत तोफांचे आवाज ऐकूं येऊं लागले व लोकांच्या कानटळया बसून गेल्या. सिंहासनमहालांतील सर्व वस्तु चोरीस गेल्या. हां हां ह्मणतां बेगमेच्या पांचशें शिपायांनीं धारातीर्थीं शयन केलें. बाकीचे शिपाई जिवाच्या भीतीनें पळून गेले.

पुढे इंग्रज सेनापतीनें अयोध्येचा गादीवारस मना जान याच्या हातापायांत बिड्या ठोकून आणि अयोध्येची वृद्ध पादशा बेगम जनाबे आलि हिला कैद करून ह्या दोघां राजकैद्यांस रेसिडेन्सींत नेऊन ठेविलें. या ठिकाणीं तीं चार दिवस बंदिवासांत होतीं पुढें त्यांनां कानपुर येथें अटकेंत ठेविलें. याप्रमाणें नासिरुद्दिनाच्या कारकिर्दीचा अंत होऊन अयोध्येच्या गादीवर वृद्ध महमद अल्ली याची नेमणूक करण्यांत आली. नासीरच्या अमदानींतील सर्व अधिकाऱ्यांस बडतर्फ करून हकीम मेहेंदी अल्लीखाला पुनः प्रधानपदावर नेमण्यांत आलें.

अफझल उन्निसा ही आतां मुसलमानी नांव टाकून गंगा हें नांव धारण करुन आपली आई बुन्दिया हिच्याबरोबर काशीनाथाच्या घरीं राहूं लागली. तिच्या मागच्या वर्तनाबद्दल, त्याचप्रमाणें ती मुसलमान झाल्याबद्दल काशीनाथानें तिचा तिरस्कार न करतां तिला आपल्या घरीं आश्रय दिला व तिचा पुढील आयुष्यक्रम सत्पथाकडे वळविला.

काशीनाथ हल्लीं काशींत रहात होता. त्याला एक पुत्र आणि एक कन्या झाली होती. मुलगा थेट मामाच्या वळणावर गेला होता. त्याचा तोंडवळा कैलासेश्वरीच्या तोंडवळ्यासारखा होता. गेल्या १८५७ सालच्या बंडाच्या वेळीं काशीनाथाच्या ह्या मुलाचें वय सुमारें वीस वर्षांचें होतें. आतां तो हुबेहुब पंडित अयोध्यानाथा-सारखा दिसत होता. काशीनाथाच्या कन्येचा तोंडवळा मात्र आईच्या वळणावर न जातां बापाच्या वळणावर गेला होता. ती हुबेहुब मानकुमारीसारखी दिसत असे. ह्मणून काशीनाथाच्या दोघी बहिणी राणी नारायणकुमारी आणि चांदकुमारी ह्या आपल्या भावाच्या ह्या मुलीला 'मानकुमारी मानकुमारी' ह्मणून मोठ्या प्रेमानें हृदयाशीं धरित असत. काशीनाथाच्या कन्येचें नांव मानकुमारी आणि पुत्राचें नांव अयोध्यानाथ असेंच ठेवण्यांत आलें होतें.

काशींत काशीनाथ आपला काल साधुसंतांच्या सेवेशुश्रुषेंत, धर्मसाधनांत आणि परोपकारांत घालवूं लागला. त्याच्या घरीं रोज कोणीना कोणी साधुसंन्याशी असावयाचाच. काशीनाथाची पत्नी आणि दोघी बहिणी यांनांहि साधुसेवा करण्यांत आपल्या आयुष्याची सार्थकता वाटत असे. याप्रमाणें यांचा नित्यक्रम चालला असतां एके दिवशीं काशीनाथाचा एक नोकर घरांत येऊन सांगूं लागला कीं " बाहेर गाझीपुरचे सच्चिदानंद नांवाचे कोणी एक तेजःपुंज संन्याशी आले आहेत, व आपल्याला भेटण्याची त्यांची इच्छा आहे."

गाझीपुरच्या या सच्चिदानद स्वामीची कीर्ति काशीनाथाने ऐकिली होती, परंतु यापूर्वी त्यांना प्रत्यक्ष कधीहि पाहिले नव्हते. गाझीपुरच्या निबिड अरण्यांत पर्वतांच्या गुहेत सच्चिदानद नांवाचे कोणी महापुरुष ध्यानस्त बसून तपश्चर्या करित असतात; हे कांहीएक खात नाहींत किंवा कोणाशी एक अक्षरहि बोलत नाहीत; सदा सर्वकाळ निमिलित नेत्रानी ईशचिंतनांत निमग्न असतात, इत्यादि त्यांची कीर्ति काशीनाथाने कैक मनुष्यांच्या तोंडून ऐकिली होती असे सत्पुरुष आपण होऊन आपल्या दर्शनाचा अलभ्य लाभ आपल्याला द्यावयाला आले आहेत, हे कळून येताच काशीनाथ व त्याच्या कुटुंबांतील मडळीस जो महदानद झाला त्याचे वर्णन करणे व्यर्थ आहे! या सत्पुरुषाच्या पदरजाने आपली राजधानी पुनित व्हावी म्हणून इंदूरचे राजे होळकर यानी म्हणे यांच्यापाशीं कैक दिवस धरणे धरले होते; परतु सतत तीन वर्षेपर्यंत ह्या महापुरुषाचा ध्यानभग झाला नाही. केव्हां केव्हां तीनतीन चारचार वर्षे हें समाधी लावून बसत असतात, वगैरे वगैरे यांच्याविषयींची अनेक कीर्ति काशीनाथाने ऐकिली होती. असे सत्पुरुष आपल्या घरी चालत आले आहेत ही आपणा अभाग्याच घरी कामधेनूच आली असे वाटून काशीनाथ मोठ्या तांतडीनें उठून सन्याशाला आणण्यास गेला.

काशीनाथ बाहेर येऊन पहातो, तो दरवाजात अयोध्यानाथ उभा आहे! "अयोध्यानाथ, अयोध्यानाथ!" असे गहिंवरून म्हणत काशीनाथाने संन्याशाला गाढालिंगन दिलें. नतर ते उभयतां घरात गेले. आज पचवीस वर्षांनीं आपल्या सहोदर बंधूला पाहून कैलासेश्वरीच्या नेत्रांतून आनदाश्रु वाहू लागले. नारायणकुमारी आणि चांदकुमारी यांनीं स्नेहपूर्वक अयोध्यानाथाला अनेक प्रश्न विचारले वृद्ध बुन्दिया वेडा होऊन अयोध्यानाथाच्या सर्वांगावरून हात फिरवू लागली काशीनाथाचा एकदर परिवार अयोध्यानाथाच्या दर्शनाने आनदसागरांत पोहू लागला.

पुष्कळ वर्षांनी भेटलेल्या आपल्या प्रिय बधूला नानाप्रकारचीं मिष्टान्नें वाढून तृप्त करु अशी कैलासेश्वरीची फार इच्छा होती; परतु अयोध्यानाथानें आज पचवीस वर्षात अन्नोदकाला स्पर्शहि केला नव्हता! मानकुमारीच्या मृत्युसमयीं निराहारानें ईशचिंतन करित आपले शेष आयुष्य घालविण्याची त्याने घोर प्रतिज्ञा केली होती अर्थात्, कैलासेश्वरीची ती इच्छा पूर्ण झाली नाहीं. सात दिवस काशीनाथाच्या घरी वस्ती करून आणि सर्वांस नानाप्रकारें पारमार्थिक विषयाचा उपदेश करून नतर अयोध्यानाथ हिमालयांत निघून गेला.

---